# मराठ्यांचें साम्राज्य

या भूमंडळाचे ठायीं
धर्म रक्षी ऐसा नाहीं।
महाराष्ट्रधर्म उरला कांहीं
तुम्हा कारणें ।।

—समर्थांचें शिवाजीस पत्र

# मराठ्यांचें साम्राज्य


लेखक

प्रो. राजाराम विनायक ओतूरकर, एम्. ए., एस्. टी. सी.

हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास, ब्रिटन सिन्स वॉटर्लू,
हिंदुस्थानची सोपपत्तिक शासनपद्धति इ०
पुस्तकांचे कर्ते



शके १८५९ ] किंमत ८१२ रु. [ सन १९३७

# प्रस्तावना

हिंदुस्थानच्या इतिहासापैकीं (१) प्राचीनभाग, (२) मुसलमानी रियासत, (३) मराठी अंमल, (४) हिंदुस्थानांत ब्रिटिश सत्तेची वाढ यांपैकीं कोणताही एक भाग मॅट्रिकच्या परीक्षेसाठीं विद्यार्थ्यांनीं निवडावा असें मुंबई युनिव्हर्सिटीनें ठरविल्यापासून मुलें विचारावयास येतात 'सर, आम्हीं कोणता इतिहास घ्यावा' वास्तविक 'सर' ना न विचारतांच मुलांनीं स्वप्रवृत्तीनें निवड करावयास हवी. पण तसें होत नाहीं यांत मुलांचा दोष नाहीं. जेमतेम शिवाजी शिकविला कीं पेशव्यांसंबंधीं तुटपुंजें ज्ञान मुलांच्या पदरीं बांधून 'हिंदुस्थानांतील ब्रिटिश साम्राज्याची वाढ' शिकविण्याची शिक्षकांस घाई होते. मग मुलांमध्यें मराठ्यांच्या इतिहासाबद्दल स्वाभाविक आवड व्हावी कशी ?

ही स्थिति पालटली पाहिजे. क्वचित् कोठें ती पालटूंही लागली आहे. मराठ्यांचा इतिहास मराठ्यांनीं शिकावयाचा नाहीं तर कोणीं शिकावयाचा ? इतरांचा इतिहासही अवश्य शिकावा पण मराठ्यांचा इतिहास आपुलकीनें अवश्यतर शिकावा.

हिंदुस्थानचा सोपपत्तिक इतिहास प्रथम १९२९ सालीं लिहिला तेव्हां तो बराच विस्तृत म्हणजे सुमारें ८०० पृष्ठांचा होता. त्यांत मराठ्यांचा इतिहास सविस्तर लिहिला होता. त्याचा उपयोग करून 'मराठ्यांचें साम्राज्य' हें पुस्तक हिंदुस्थानच्या सोपपत्तिक इतिहासांतील प्रकरणें ठिकठिकाणीं वाढवून तयार केलें आहे.

या पुस्तकांत 'इतिहासाचे आधार' म्हणून कांहीं अस्सल पत्रें दिलीं आहेत. ते ज्या ग्रंथांतून घेतले आहेत त्या ग्रंथांच्या संपादकांचे व कर्त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. या पत्रांकडे शिक्षकांनीं विद्यार्थ्यांचें लक्ष वेधावें अशी विनंति आहे.

पुणें, टिळकदिन
१ ऑगस्ट १९३७

**रा. वि. ओतूरकर**

# महाराष्ट्राचे इतिहासकार

आज मनांत आणील त्यास मराठ्यांचा इतिहास लिहिणें फार सोपें झालें आहे. पण हें सोपेंपण कोणीं साधून दिलें? अवघ्या एका पिढीपूर्वीं मराठ्यांचे जे इतिहास लिहिले गेले त्यांतून मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं अनेक भ्रामक गोष्टी लिहिल्या होत्या. शिवाजी लुटारू होता व मराठ्यांचें राज्य अकस्मात् वणव्याप्रमाणें भडकलें व विजलें असें लिहावयाचा व वाचावयाचा तो काळ होता. हा काळ कोणीं बदलला?

या कार्यास अनेक लहान मोठ्या विद्वानांचे परिश्रम कारणीभूत झाले; पण त्या सर्वांत अग्रगण्य कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे होत. ठिकठिकाणीं पायीं प्रवास करून जुनीं दप्तरें व कागदपत्रें तपासून त्यांच्या नकला करून, विवेचक प्रस्तावना लिहून या महापुरुषानें मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांचे २१ खंड प्रसिद्ध केले. प्रसंगीं शिलालेखाचे दगड डोक्यावरून वाहण्यास देखील यांनीं मागें पाहिलें नाहीं. कै. राजवाडे यांच्याप्रमाणेंच कै. काशीनाथ रामचंद्र साने, मिरजचे कै. वासुदेवशास्त्री खरे व सातारचे कै. पारसनीस यांनीं काव्येतिहाससंग्रह, ऐतिहासिक लेखसंग्रह, इतिहाससंग्रह अशीं मासिकें व ग्रंथ प्रसिद्ध केले.

परंतु या ग्रंथांतील कागदपत्रें फुटकळ, पुष्कळ वेळां एकमेकांचा एकमेकांस संबंध नसलेलीं अशीं होतीं. त्यांचा अभ्यास करून मराठ्यांचा सुसंगत इतिहास प्रथमच आमूलाग्र लिहून काढण्याचें कार्य रियासतकार गोविंद सखाराम सरदेसाई यांनीं केलें आहे. रियासतकारांचा गेल्या ४० वर्षांतील उद्योग प्रचंड आहे. आज वयाचीं सत्तर वर्षें उलटल्यावरही या उद्योगांत खंड नाहीं. आपण मराठी इतिहासाचे तरुण वाचक त्यांचें मोठें ऋण लागतों.

ज्यानें त्यानें आपापल्यापरी फुटकळ कार्य करून भागत नाहीं. सर्वांचे यत्न एकत्रित झाले तर ते उपयुक्त होतात. म्हणून लहान मोठ्या

संशोधकांना अभ्यास व संशोधन करण्यास एक जागा व संस्था पाहिजे. अशी पहिली संस्था पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळ होय. या संस्थेचें संगोपन व संवर्धन गु. प्रो. दत्तो वामन पोतदार यांनीं गेलीं पंधरावीस वर्षें आस्थेनें केलें आहे. अशा दुसऱ्याही संस्था आहेत. उदाहरणार्थ, धुळ्याचें सत्कार्योत्तेजक मंडळ व राजवाडे संशोधन मंदिर, साताराचा पारसनीस म्यूझियम वगैरे. या संस्थांत विद्यार्थ्यांनीं जाऊन त्या पाहिल्यास तेथें त्यांना अनेक लक्ष वेधण्याजोग्या जुन्या वस्तू आढळतील.

शिवकालीन इतिहासाच्या अभ्यासास विशेष उत्तेजन इ. स. १९३० पासून मिळालें. तेव्हांपासून व त्यापूर्वी देखील भारत इतिहास संशोधक मंडळांत श्री. दत्तोपंत आपटे यांनीं मराठ्यांच्या इतिहासावर परिश्रम केले. आज महाराष्ट्रांत मराठ्यांच्या इतिहासावर नांव घेण्याजोगे अभ्यासक श्री. दत्तोपंत आपटे, श्री. न. चिं. केळकर, श्री. खरे, श्री. दि. वि. काळे, श्री. वा. कृ. भावे व श्री. शंकरराव जोशी हे होत. महाराष्ट्राबाहेर प्रो. जदुनाथ सरकार, डॉ. सुरेंद्रनाथ सेन यांचीं नांवें उल्लेखनीय आहेत.

सरकारच्या सहानुभूतीनें अलीकडे पेशवेदप्तरांतील निवडक कागदपत्रांचे ४५ खंड प्रसिद्ध झाले आहेत ते संशोधून संपादण्याचें काम रियासतकार सरदेसाई यांच्या नजरेखालीं निवडक संशोधकांच्या साहाय्यानें पुरें झालें.

माझे मित्र श्री. गोविंदराव मोडक यांनीं १८ वर्षांपूर्वी 'मुलांचा महाराष्ट्र' हें स्फूर्तिदायक पुस्तक लिहून मुलांमध्यें मराठ्यांच्या इतिहासाबद्दल प्रेम उत्पन्न करण्याचें उपयुक्त कार्य केलें आहे.

# निवडक वाचनीय ग्रंथ



| | |
|---|---|
| मराठी रियासत भाग १ ला | रियासतकार सरदेसाई |
| मध्यविभाग भाग १ ते ४ | ,, |
| उत्तरविभाग भाग १ व २ | ,, |
| शिवचरित्रनिबंधावलि | शिवचरित्र कार्यालय |
| शिवाजीनिबंधावलि | ,, |
| मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें भाग १ ते २१ | कै. वि. का. राजवाडे |
| ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १ ते १२ | कै. वा. वा. खरे |
| मराठे व इंग्रज | श्री. न. चिं. केळकर |
| इतिहासमंजरी | श्री. द. वि. आपटे |
| पेशवेकालीन महाराष्ट्र | श्री. वा. कृ. भावे |
| विजयनगर स्मारकग्रंथ | विजयनगर महोत्सव मंडळ |
| मुलांचा महाराष्ट्र | श्री. गोविंदराव मोडक |
| Shivaji | Prof. Sarkar |
| History of the Marathas | Grant Duff |
| Shivaji | Dr. Balkrishna |
| ,, | C. V. Vaidya |
| History of the Marathas | Kincaid & Parasnis |
| Administrative System of the Marathas | Surendranath Sen |
| Military System of the Marathas | ,, |
| Selections from Peshaw Daftar | G. S. Sardesai |



# मराठ्यांचें साम्राज्य

## अनुक्रमणिका

# इतिहासाचे आधार

[ इतिहासमंजरी, मुलांचा महाराष्ट्र, शिवचरित्रप्रदीप, शिवकालीन पत्रव्यवहार इ.]





# मराठ्यांचें साम्राज्य

## भाग १ ला

## प्राचीन महाराष्ट्र : हिंदु अंमल

### (इ० सनाचें १ लें शतक ते १३ वें शतक)

१ **दक्षिणापथ**:—अर्वाचीन दळणवळणाचीं साधनें उपलब्ध होण्यापूर्वी हिंदुस्थानचे उत्तर हिंदुस्थान व दक्षिण हिंदुस्थान असे दोन स्वाभाविक विभाग पडत, कारण एवढा अवाढव्य प्रदेश एका सत्तेच्या हातांत एकसारखा क्वचितच राहूं शके. उत्तरेकडील दिग्विजयी राजे उत्तर हिंदुस्थानांत वर्चस्व स्थापन करून दक्षिणेंत येत किंवा दक्षिणेकडील राजे महत्त्वाकांक्षा धरून उत्तरेकडील राजांशीं क्वचित् सामना करीत. उत्तरेंतील मौर्य, हर्ष, अल्लाउद्दीन, अकबर, औरंगजेब, व दक्षिणेंतील आंध्र, पुलकेशी व मराठे यांचे पराक्रम वाचणारास ही गोष्ट लक्षांत येईल.

२ **द्रविडवंशीय लोक**:—नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेशास पूर्वी दक्षिणापथ म्हणत. दक्षिणेंत प्रारंभी आर्यांच्या वसाहती केव्हां झाल्या तें सांगवत नाहीं. परंतु इ. स. पू. ८०० ते इ. स. ३२० या काळांत आर्य-संस्कृतीचा सर्व देशभर प्रसार होत असतां आर्य दक्षिणेंत आले असावेत. रामायणांत राम दंडकारण्यांत हिंडत असतां त्यास अनेक ऋषींचे आश्रम दिसले असें वर्णन आहे; ते आश्रम हचा धाडशी आर्यांच्या पहिल्या पहिल्या वसाहती असाव्यात असा तर्क आहे.

नर्मदेच्या दक्षिणेकडील राज्यांचेही दोन विभाग पडतात. एक, उत्तरेस नर्मदा व दक्षिणेस तुंगभद्रा या नद्यांमधील प्रदेश. यांतच महाराष्ट्रांतील मुख्य भागाचा समावेश होतो व दुसरा, तुंगभद्रेच्या दक्षिणेस हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिण टोकापर्यंत. या भागांत तामीळ, मल्याळी लोकांची वस्ती आहे. तुंगभद्रेच्या उत्तरेस व दक्षिणेस कर्नाटकी लोक राहतात; व नर्मदा व तुंगभद्रेच्या पूर्व भागांत 'आंध्र' किंवा तेलुगु लोकांची वस्ती आहे. कर्नाटक, तेलुगु, तामीळ, व मल्याळी हे द्रविड वंशाचे लोक होत. उत्तरेस हिंदु संस्कृतीवर एका मागून एक परकीयांचे आघात होत असतां दक्षिणेकडील आंध्रादि द्राविडांनी तिचें काळजीपूर्वक जतन केले व काळाच्या प्रवाहांत त्यांची स्वतंत्र राज्यें नाहींशी होत असतां तेंच कार्य मराठ्यांनीं सतराव्या शतकांत पुढें चालविलें.

**३ आंध्रांचें राज्य :**—इसवी सनाच्या पहिल्या शतकांत हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर भागांत यवन, शक, कुशान व पार्थियन इ. परकीयांनीं स्वाऱ्या करून धुमाकूळ माजवून दिला असतां, दक्षिणेस आंध्रांची सत्ता प्रबळ झाली. आंध्रांची गणना आर्य वंशांत केली जात नाहीं परंतु ते रानटी नव्हते. त्यांचें राज्य नर्मदेच्या दक्षिणेकडे गोदावरी व कृष्णा यांच्या मधल्या प्रदेशांत विशेषतः पूर्वेकडील भागावर पसरलेलें होतें. कलिंगाचें राज्य त्यांच्या उत्तर सरहद्दीवर होतें. गोदा–कृष्णेच्या पट्ट्यांत आंध्र फार प्राचीन कालापासून असावेत. कारण त्यांचा उल्लेख ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेल्या एका दंतकथेंत झालेला आढळतो. व ऐतरेय ब्राह्मणाचा काल सुमारें इ. स. पूर्वी ८०० वर्षे असा मानतात. चंद्रगुप्ताच्या काळीं म्हणजे इ. स. पूर्वीं चौथ्या शतकाच्या अखेरीस आंध्रांचें राज्य मोठें प्रबळ असून त्यांच्याजवळ एक लक्ष पायदळ, दोन हजार घोडेस्वार व एक हजार हत्ती होते, असें रोमन इतिहासकार प्लीनी याचें म्हणणें आहे. त्यास ही माहिती मेगॅस्थिनीसकडूनच मिळाली असावी. अशोकाच्या कारकीर्दीत बहुधा आंध्रांचें राज्य त्याच्या साम्राज्यांत मोडत असावें. परंतु त्याच्या मृत्यूनंतर शातवाहन घराण्यांतील सिमूक राजानें मौर्य साम्राज्याची सत्ता झुगारून दिली व आंध्रांचें स्वातंत्र्य प्रस्थापित केलें. शातवाहनांना शाकवाहन, शालिवाहन किंवा शातकर्णी असेंही म्हणतात. शातवाहन किंवा

शालिवाहन हा एक कोणी राजा नसून तें घराणें आहे. त्यांत पुष्कळ व्यक्ती होऊन गेल्या. शातवाहनांची राजधानी प्रथम कृष्णेच्या मुखाशीं धनकटक ही होती. पण पुढें त्यांनी पश्चिमेकडे नाशिकपर्यंत आपला अंमल बसविल्यावर गोदावरीच्या कांठचें प्रतिष्ठान किंवा पैठण हें शहर आपली राजधानी केली.

**४ पुलुमायी शालिवाहन :**—शातवाहनांच्या अंमलाखालीं आंध्रांची सत्ता एकसारखी वाढत चालली व त्यांनीं उत्तरेकडे नजर टाकली. इ. सनाच्या पूर्वी २७ साली त्यांनीं कण्व घराण्याचा शेवटचा राजा सुशर्मा यास पदच्युत करून मगधाचें राज्य बळकावलें. त्या देशावरील त्यांचें राज्य पुढें इ. स. २४९ पर्यंत म्हणजे सुमारें ३०० वर्षेपर्यंत टिकलें. आंध्रांच्या हाती साम्राज्यसत्ता आल्यावर परकीय स्वाऱ्यांची लाट थोपवून धरण्याचें अवघड कार्य त्यांना करावें लागलें. शकांची सत्ता हिंदुस्थानच्या पश्चिमोत्तर भागांत वाढत चालली. त्यांनी पंजाब, राजपुताना, माळवा, काठेवाड, व गुजराथ हे प्रदेश आक्रमण करून नर्मदा नदी ओलांडली व आंध्रांच्या मुलुखांतील नाशिक शहरही काबीज केलें. शकांच्या पुंडाईनें मुलूख उध्वस्त झाला, धर्मबंधनें मोडलीं गेलीं, व सर्वत्र अव्यवस्था माजली. सुदैवानें ह्या वेळीं शातवाहन घराण्यांत एक पराक्रमी पुरुष निर्माण झाला व तो म्हणजे गौतमीपुत्र शालिवाहन हा होय. तो इ. स. १०६ सालीं गादीवर आला. त्यानें शकांचा पराभव करून त्यांना नर्मदापार घालवून दिलें, इतकेंच नव्हे तर काठेवाड, माळवा, राजपुताना ह्या खुद्द शकांच्या प्रांतांत जाऊन तेथेंही त्यांचा पाठलाग केला. ह्या शकांच्या पराभवामुळें पुन्हां सर्वत्र स्थिरस्थावर झालेलें पाहून शालिवाहनाची आई गौतमी हिला फार आनंद झाला, असें कार्ल्याच्या कोरीव लेण्यांतील शिलालेखांवरून दिसून येतें. गौतमीपुत्र शालिवाहनानें २५ वर्षें राज्य केल्यावर इ. स. १३० सालीं त्याचा मुलगा राज्यावर आला. तोच प्रसिद्ध शककर्ता पुलुमायी शालिवाहन होय. त्यानें इ. स. १५८ पर्यंत राज्य केलें. त्याच्या कारकीर्दींत आंध्रांची शकांशीं बरींच युद्धें झालीं. माळवा प्रांतांतील उज्जयिनीचा राजा शकराजा रुद्रदामन् यानें ठिकठिकाणच्या शकांचें ऐक्य घडवून आणलें व आंध्रांना पुन्हां नर्मदापार रेटीत नेलें. रुद्रदामन् यानें आपली मुलगी दक्षमित्रा पुलुमायीला दिली होती. परंतु या शरीरसंबंधामुळें शक

व आंध्र राजांत घडून आलेलें सख्य फार वेळ टिकलें नाहीं. रुद्रदामन्‌नें दक्षिणेंत स्वारी केली. परंतु शालिवाहनानें त्याची डाळ शिजूं दिली नाहीं. तेव्हां रुद्रदामन्‌ला हात हालवीत परत जावें लागलें. मात्र रुद्रदामन् पराक्रमी असल्यामुळें त्याचें उच्चाटण शालिवाहनाच्या हातून झालें नाहीं. या शक–आंध्रांच्या झगडयांत व अर्वाचीन काळांतील मुसलमान-मराठ्यांच्या झगड्यांत अनेक दृष्टीनें साम्य दिसून येतें.

**५ आंध्रांचें कार्य :**—शकांचा पराभव झाल्यावर शालिवाहनाचा अंमल नर्मदेच्या दक्षिणेस पश्चिम समुद्रापासून पूर्व समुद्रापर्यंत पसरला. त्याच्या कारकीर्दींत बौद्ध व हिंदु धर्मांचा प्रसार चालू होता. बौद्धांनीं कार्लें, अजिठा, वेरूळ, पांडव लेणें (नाशिकजवळ) इ. ठिकाणीं डोंगरांतून मोठमोठे विहार व स्तूप खोदले. त्यांनीं विद्वानांना आश्रय दिला. हिंदुस्थानच्या इतिहासांत आंध्रांची कामगिरी फार महत्त्वाची आहे. शकासारख्या परकीय सत्ताधीशांची लाट थोपवून धरण्याचें मुख्य श्रेय आंध्र राजांसच दिलें पाहिजे. इ. सनाच्या दुसऱ्या शतकानंतर आंध्र हे आंध्रभृत्य ह्या नांवानेंही ओळखले जाऊं लागले. इसवी सनाच्या तिसऱ्या शतकांत आंध्रांच्या राज्याचीं तीन शकलें झालीं; व त्यावर अभीर, कदंब व इक्ष्वाकू हे राज्य करूं लागले. त्यांचा इतिहास विशेष उपलब्ध नाहीं. सहाव्या शतकांत चालुक्यांचा उदय झाला. आठव्या शतकांत राष्ट्रकूट पुढें आले. दहाव्या शतकांत पुन्हां चालुक्यांनीं अधिराज्य स्थापन केलें. बाराव्या शतकांत यादव व होयसळ हे उदयास आले व चौदाव्या शतकाच्या प्रारंभापासून मुसलमानी अंमलास सुरुवात झाली त्याचा सतराव्या शतकांत शेवट झाला.

**६ चालुक्य राजे :**—आंध्रांची हकीकत मागें आलेलीच आहे. इसवी सनाच्या सहाव्या शतकांत चालुक्य हें रजपूत घराणें उदयास आलें. यांची राजधानी विजापुराजवळ वातापी ऊर्फ बदामी हें शहर होतें. चालुक्यांचा राजा दुसरा पुलकेशी यानें इ. स. ६०८ ते इ. स. ६४२ पर्यंत राज्य केलें. उत्तरेकडील सम्राट् हर्ष ह्याच्यावर चाल करून आला असतां यानें हर्षाचा पराभव केला. व यानंतर त्यानें 'परमेश्वर' असा बहुमानार्थी किताब धारण केला. पुलकेशीचें राज्य अतिशय भरभराटींत असून त्यानें इराणपर्यंत आपले वकील धाडले होते असा उल्लेख सांपडतो.

पुलकेशीच्या राज्यांत बौद्ध धर्माचा प्रसार फारच कमी प्रमाणावर होता. प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूएनत्संग हा पुलकेशीच्या दरबारीं येऊन गेला. महाराष्ट्रास 'महाराष्ट्र' हें नांव प्रथम त्याच्याच ग्रंथांत सांपडतें. तेथील लोकांविषयींचे त्याचे उद्‍गार वाचनीय आहेत. तो म्हणतो, "मराठे हे आपल्या उपकारकर्त्याशीं कृतज्ञतेनें वागतात, पण शत्रूचा नायनाट केल्या-खेरीज कधीं राहावयाचे नाहींत. त्यांचा कोणीं अपमान केल्यास ते प्राणाचीही पर्वा न करतां सूड घेतील; परंतु त्याबरोबरच दुःखितांस मदत करतांना त्यांना आपल्या श्रमाचें भान राहावयाचें नाहीं." इ. स. ६४२ सालीं कांची ( चोल प्रांताचें मुख्य शहर कांचीवरम् ) येथील नृसिंहवर्मा नांवाच्या पल्लव राज्यकर्त्यानें पुलकेशीवर स्वारी करून त्याचा पराभव केला. परंतु पुढें इ. स. ६५५ त पुलकेशीच्या मुलानें पल्लव राजावर स्वारी करून बापाच्या पराभवाचा सूड उगविला. यानंतर चालुक्यांचें राज्य इ. स. ७५३ पर्यंत चाललें. पुढें राष्ट्रकूटांचा उदय झाला.

७ **राष्ट्रकूट :**—राष्ट्रकूट यांनीं इ. स. ७५३ पासून इ. स. ९७३ पर्यंत महाराष्ट्रावर राज्य केलें. राष्ट्रकूट हे यादव कुळांतील होत असें मानतात. ते स्वतःस रट्ट किंवा रठ्ठ म्हणवितात. त्यावरून महारठ्ठ किंवा 'मराठे' हा शब्द निघाला असावा असें कांहींचें मत आहे. राष्ट्रकूट शिवोपासक असत. त्यांची राजधानी मालखेड ही होती. राष्ट्रकूट वारंवार उत्तर हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत असत.

८ **दुसरे चालुक्य राजे :**—इ. स. ९७३ नंतर दुसरें चालुक्य घराणें उदयास आलें. ह्याचा पूर्वीच्या चालुक्य घराण्याशीं कांहीं संबंध नाहीं. ह्यांचें मुख्य शहर कल्याणी हें होतें. यांच्यांतील विक्रमादित्य राजानें इ. स. १०७६–११२६ पर्यंत राज्य केलें. यानें जयकेशी नांवाच्या राजाचा पराभव केला. कऱ्हाटक अथवा कऱ्हाड येथील राजकन्या चंद्रलेखा इजबरोबर त्यानें लग्न केलें. गौड व कामरूपचे राजे यांच्याशीं तो स्नेहभावानें राहात असे. यानें दक्षिणेचे होयसळ, पांड्य, गोवा इत्यादि ठिकाणचे राजे एकदम चाल करून आले असतां त्यांचा पराभव केला. त्याच्या कारकीर्दीत प्रजेस सौख्य झालें. तो विष्णूचा भक्त होता. काश्मीरचा पंडित बिल्हण यास

दक्षिणेंत विक्रमादित्याच्या दरबारी आश्रय मिळाला. 'मिताक्षरी' या हिंदु कायद्याचा लेखक विज्ञानेश्वर याच्याच पदरीं होता. विक्रमादित्यानंतर चालुक्यांची सत्ता इ. स. ११९० पर्यंत कशीबशी टिकली. दुसऱ्या चालुक्यानंतर देवगिरीचे यादव व द्वारसमुद्र (म्हैसूर) येथील होयसळ ऊर्फ बल्लाळ हे एकाच वेळीं उदयास आले.

९ **देवगिरीचे यादव** :—बाराव्या शतकांत हें घराणे प्रसिद्धीस येण्यापूर्वी हे चालुक्यांचे मांडलिक म्हणून राहात. ते आपणांस कृष्णाचे वंशज मानीत. या यादवांनी व दक्षिणेकडील होयसळांनी चालुक्यांचें राज्य बुडविण्याची खटपट केली व दोघांसही यश आलें. होयसळांच्या वीर बल्लाळाने चालुक्यांचा अमल झुगारून आपले राज्य स्थापन केलें. त्याच्या पाठोपाठ इ. स. ११८७ साली भिल्लम यादवानें चालुक्याचा पूर्ण पराभव करून स्वतंत्र राज्य स्थापन केलें व देवगिरी हे शहर आपली राजधानी केली. भिल्लम इ. स. ११९१ त मरण पावला. नंतर इ. स. १२१० मध्यें त्याचा नातु सिंधण हा गादीवर बसला. सिंधण हा मोठा पराक्रमी होता. त्यानें गुजराथच्या राजावर दोन स्वाऱ्या केल्या व दक्षिणेकडील कोंकणच्या कदंब राजाचाही पराभव केला. सिंधण इ. स. १२४७ त मृत्यु पावला. इ. स. १२७१ त सिंधणाचा पणतु रामदेव हा राज्यावर आला. रामदेवरावाच्या कारकीर्दीत इ. स. १२९४ साली दिल्लीचा सुलतान अल्लाउद्दीन खिलजी यानें देवगिरीवर स्वारी केली. व त्यानंतर त्याचा सेनापति मलिक काफूर यानें इ. स. १३०७ व १३०९ या साली आणखी दोन स्वाऱ्या करून रामदेवाचा पराभव केला. इ. स. १३१८ त अल्लाउद्दिनाचा मुलगा मुबारक यानें देवगिरीच्या राज्याचा शेवट केला.

१० **होयसळ राजे** :—हे देवगिरीच्या यादवांबरोबरच उदयास आले. हेही यादव घराण्यांतील होते. होयसळांची राजधानी म्हैसूर प्रांतांत द्वारसमुद्र येथें होती. यांनीं इ. स. १३२६ पर्यंत स्वतंत्र रीतीनें राज्य केलें व पुढें ते मुसलमानांचे मांडलिक बनले.

११ **लिंगायत धर्माचा उदय** :—चालुक्यांची सत्ता संपुष्टांत येत असतां कर्नाटकांत लिंगायत धर्माचा उदय झाला. लिंगायत हे शिवोपासक आहेत. ते शिवाची पूजा करितात. ह्यांना वीरशैव असेंही म्हणतात. बसव नांवाचा

एक ब्राह्मण चालुक्याचा प्रधान होऊन गेला. इ. स. ११६० त त्यानें हा धर्म स्थापन केला. हे वेदास मानीत नाहीत. पुनर्जन्मावर विश्वास ठेवीत नाहीत. विधवाविवाह ह्यांस समत आहे. जातिभेद मोडण्याच्या हेतूनें या धर्माचा उदय झाला. पण त्याचा प्रसार मर्यादित राहिल्यानें हा हेतु साध्य झाला नाहीं.

**१२ तत्कालीन पंडित व ग्रंथकार :**—यादवांच्या कारकीर्दीत पुष्कळ कवी व पडित उदयास आले. प्रसिद्ध गणिती भास्कराचार्य हा इ. स. ११५० च्या सुमारास होऊन गेला. ह्यानें सिद्धांतशिरोमणी या नांवाचा ज्योतिःशास्त्रविषयक ग्रंथ लिहिला आहे. ह्याचा दुसरा ग्रंथ लीलावती असून त्यात बीजगणिताचे स्पष्टीकरण केलें आहे. ह्या भास्कराचार्याचा नातु चांगदेव हा सिंधण राजाच्या पदरी ज्योतिषी होता. चांगदेवानें आपल्या आजाच्या ग्रंथाचें अध्ययन व्हावें म्हणून चाळिसगांव तालुक्यांत पाटण येथें एक मठ स्थापन केला. ह्याच सिंघण राजाच्या कारकीर्दीत शार्ङ्गधर यानें सगीत शास्त्रावर सगीत रत्नाकर नांवाचा गथ तयार केला. रामदेवरावाचा मंत्री हेमाद्रि ऊर्फ हेमाडपत याचें नांव फार प्रसिद्ध आहे. हेमाद्रि हा वत्स गोत्री विद्वान् ब्राह्मण होता. ह्याने 'चातुर्वर्ण्य चितामणी' नावाचा धर्मग्रथ केला. त्यातील व्रतखंड, व शेवटचें परिशेष खड ही प्रकरणें धर्माचरणाच्या बाबतीत आजदेखील प्रमाणभूत मानली जातात. हेमाडपंताने मोडी लिपी शोधून काढली. ती त्यानें लकेहून आणली असे म्हणतात. महाराष्ट्रांत एक-खांबी नत्रूच्या आकाराची अनेक देवळें आहेत तीं हेमाडपंती पद्धतीनें बांधलेल्या आहेत. हेमाडपंताच्या आश्रयाला बोपदेव नांवाचा वैष्णव ब्राह्मण असे. त्यानें 'मुक्ताफल' व 'हरिलीला' हे ग्रथ लिहिले आहेत.

**१३ ज्ञानेश्वर :**—परंतु ह्या सर्वाहून 'ज्ञानेश्वर' ह्या सत कवीचा प्रामुख्यानें उल्लेख करणें जरूर आहे. ज्ञानेश्वर हा पैठणजवळच्या आपेगांवचे कुळ-कर्णी विठ्ठलपंत यांचा मुलगा. ज्ञानेश्वरास निवृत्ति, सोपान व मुक्ताबाई हीं भावंडें होतीं. ही मंडळीही भगवद्भक्त असून ह्यांचे अभंग सर्वांच्या परि-चयाचे आहेत. ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरी नांवाचा ग्रथ लिहिला, त्यांत भगवद्-गीतेवर विस्तृत टीका आहे. ज्ञानेश्वरी हा मराठी भाषेतील सर्वात प्राचीन मोठा ग्रथ आहे. धर्मग्रंथ होईल तितके सस्कृतांत लिहावयाचे, ही पूर्वापार

पद्धत मोडून प्राकृत जनांना धर्माचें ज्ञान व्हावें म्हणून त्यानें मुद्दाम "माझा मऱ्हाठाचि बोलु कवतिकें। परि अमृतातेंही पैजेसीं जिंके। ऐसीं अक्षरेंचि रसिकें। मेळवीन॥" ही प्रतिज्ञा करून ग्रंथ लिहिण्यास प्रारंभ केला व 'सकलांचें दुरित जावो। विश्व स्वधर्मसूर्ये लाहो। जे जे वांछील तें तें पाओ। प्राणिजात॥' ह्या आशीर्वादपूर्वक वचनानें ग्रंथाचा शेवट केला. 'शके बाराशें बारोत्तरीं' म्हणजे इ. स. १२९० त ग्रंथ समाप्त झाला असें ज्ञानेश्वरानें म्हटलें आहे. ज्ञानेश्वराखेरीज चक्रधर आदिकरून महानुभावपंथी लोकांनीं तेराव्या शतकाच्या प्रारंभीं मराठींत ग्रंथरचना केली, व्याकरण व कोषही तयार केला. परंतु त्यांची ग्रंथरचना गुप्त लिपींत असल्यानें ती बऱ्याच कालपर्यंत अज्ञात होती. हल्लीं तिचें स्वरूप उघडकीस आलें असून त्यावरून महानुभावी ग्रंथांचा विद्वानांनीं अभ्यास चालविला आहे.

**१४ रामानुजम् :**—होयसळांच्या कारकीर्दीत बाराव्या शतकांत प्रसिद्ध द्वैती वैष्णव रामानुजम् हा उदयास आला. होयसळांचा प्रथम जैन धर्माकडे कल असे; परंतु रामानुजम् यानें त्यास वैष्णव पंथाकडे वळविलें. रामानुजम् हा दक्षिणेस चोलांच्या राज्यांतील श्रीरंगम् येथील मूळचा रहिवासी. शंकराचार्यांच्या मताशीं याचा मोठा विरोध होता. शंकराचार्य अद्वैती असत व रामानुजम् हे द्वैती होते. ह्यांनींही उपनिषदांवर लिहिलेल्या टीका फार प्रसिद्ध आहेत.

**१५ तामील राज्यें :**—तुंगभद्रेच्या दक्षिणेकडे तीन राज्यें प्रसिद्ध आहेत.

(१) पूर्व किनाऱ्यावर उत्तरेस नेल्लूरपासून ते दक्षिणेस पदुकोटापर्यंतचा प्रदेश. ह्यास 'चोल' म्हणतात. ह्या प्रांतावर इसवी सनाच्या तिसऱ्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत पल्लव राजे झाले; नंतर चोल राजे झाले व त्यांच्या मागून तेराव्या शतकांत कांहीं काळ मुसलमानांचें वर्चस्व होऊन पुढें विजयनगरचें राज्य उदयास आलें.

(२) पश्चिमेस मलबार किनाऱ्यावर मंगळूरपासून दक्षिणेकडील प्रदेश ह्यास 'चेर' म्हणतात. तेथील राजे फारसे प्रसिद्ध नाहींत. हा प्रांत बहुधा चोलांच्या ताब्यांत असे.

(३) पेन्नार नदीच्या दक्षिणेस पदुकोटापासून केप कामोरीनपर्यंतचा प्रदेश. ह्यास 'पांड्य' म्हणतात. येथें पांड्य नांवाचे राजे राज्य करीत. मार्को

पोलो नांवाचा व्हेनीशियन प्रवासी इ. स. १२८८ त इकडे आला होता. त्यानें पांड्यांचें राज्य भरभराटींत असल्याचें लिहून ठेविलें आहे.

---

# भाग २ रा
# मध्यकालीन मुसलमानी अंमल
## बहामनी राज्य इ. स. १३४७–१५२६

**१ बहामनी राज्याची स्थापना :**—अल्लाउद्दिनाच्या स्वारीपासून यादवांच्या सत्तेचा शेवट होऊन देवगिरीस मुसलमान सुभेदार राज्य करूं लागले. महंमद तघ्लखानें देवगिरीस राजधानी नेण्याचा बेत करून त्याचें नांव दौलताबाद असें ठेवलें ; परंतु तो बेत फसल्यावर त्यानें हसन ऊर्फ झाफरखान यास दक्षिणेच्या बंदोबस्ताकरितां नेमिलें. इ. स. १३४७ साली त्यानें आपलें स्वातंत्र्य पुकारलें व आपली राजधानी दौलताबादेहून बरीच दूर दक्षिणेस कल्बुर्गा येथें नेली. झाफरखान हा उत्तरेंत असतां गंगू नांवाच्या ब्राह्मणाच्या पदरीं गुलाम होता. त्या वेळीं तो मोठ्या इमानीपणानें वागला. तेव्हां गंगूनें त्याची पत्रिका पाहून भविष्य वर्तविलें कीं, 'तूं पुढें राजा होशील.' हें आपल्या पूर्वीच्या धन्याचें वचन खरें झालेलें पाहून कृतज्ञतेनें त्यानें आपल्या राज्यास बहामनी[१] राज्य असें नांव दिलें. झाफरखान स्वतःस अल्लाउद्दीन हसन गंगू बहामनी असें म्हणवीत असे. तो इ. स. १३५७ त मरण पावला. इ. स. १३९६ त बहामनी राज्यांत भयंकर दुष्काळ पडला. त्यास दुर्गादेवीचा दुष्काळ म्हणतात. तो बारा वर्षे टिकला असें वर्णन आहे.

**२ विजयनगरशीं युद्ध :**—झाफरखानानंतर एकामागून एक असे अनेक बादशहा गादीवर बसले. त्यांच्यांतील अहमदशहा (इ. स. १४२२–३४)

---

१ टीप :—इराणांतील बहामनी वंशाशीं आपला संबंध आहे असें त्यास वाटल्यामुळें त्यानें 'बहामनी' हें नांव जोडलें असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

हा फार पराक्रमी निघाला. ह्यानें पूर्वीची राजधानी बदलून बेदर ही नवीन राजधानी स्थापिली व वरंगळच्या राजांशीं युद्धें करून तें राज्य जवळजवळ संपुष्टांत आणिलें (इ. स. १४२५). याच सुमारास विजयनगरचें हिंदु राज्य भरभराटीस येत होतें. तेथील राजांनी युद्ध करून बहामनी राज्याचा विस्तार तुंगभद्रेच्या दक्षिणेस कधींही होऊं दिला नाहीं. तुंगभद्रा ही दोन्ही राज्यांची सरहद्द असल्यामुळें कृष्णा व तुंगभद्रा या दुआवांतील रायचूर, मुद्गल, अदोनी, सोलापूर वगैरे ठिकाणीं एकसारखीं युद्धें होत; व विजयाचें पारडें कधीं या बाजूस तर कधीं त्या बाजूस झुकत असे.

३ **महंमद गवान**:—इ. स. १४५७ ते ६० पर्यंत हुमायून नांवाचा बादशहा होऊन गेला. तो फार क्रूर होता. परंतु त्यास महंमद गवान नांवाचा फार थोर प्रधान लाभला व त्यानेंच बहामनी राज्याच्या उत्तर कालांत त्या राज्याचें रक्षण केलें. महंमद गवान मूळ इराणांतील असून तेथील राजांशीं त्याचा फार जवळचा संबंध होता. परंतु हाच संबंध आपल्या जिवास पुढें-मागें घातक होईल अशी त्यास भीति वाटत होती. विशेषतः याच कारणामुळें त्यानें हिंदुस्थानचा मार्ग सुधारला व बहामनी राज्यांत चढत चढत मुख्य प्रधानाच्या जागेपर्यंत आला. त्या काळीं हिंदुस्थानांतील मुसलमान परदेशी मुसलमानांचा द्वेष करीत; त्याप्रमाणें महंमद गवान हा बहामनी राज्यांतील सरदारांच्या रोषास पात्र झाला व शेवटीं त्या वेळचा बादशहा महंमदशहा ह्यास गवानाविरुद्ध चिथविलें व त्यास ठार मारविलें (इ. स. १४८१). मरतां मरतां तो म्हणाला 'मजसारख्या वृद्ध मनुष्यास मृत्यु येणें कांहीं वाईट नाहीं. परंतु मजबरोबरच राज्याचाही नाश होईल हें मात्र मला दिसतें.' आणि खरोखरच त्याचें भविष्य खरें झालें. त्याच्या मृत्यूपासून बहामनी राज्यास उतरती कळा लागली. महंमद हा मोठा चतुर व स्वामिभक्त होता. त्यास गवान हें नांव कसें पडलें ह्याची अशी गोष्ट सांगतात कीं एकदां दरबार भरला असतां एक गाय मोठ्यानें ओरडूं लागली, त्या वेळीं कांहीं सरदारांनीं कुत्सितपणें विचारलें कीं 'प्रधानजी, ही गाय कां ओरडते ?' त्यानें विचारणारांचा रोख ओळखून उत्तर केलें, 'ती असें ओरडत आहे कीं, तूं माझ्या जातीपैकीं असून गाढवांच्या समाजांत बसतोस हें मला खपत नाहीं ?' हें उत्तर ऐकून सरदार खजिल झाले. तो मोठा दानशूर असे. सायंकाळच्या

वळा वेष पालटून तो आपल्या पैशाच्या पिशवींतून फकीरास दान करीत असे व म्हणत असे कीं, 'हें तुला राजानें दिलें आहे तें घे व त्यास आशीर्वाद दे.' असा स्वामिभक्त व कर्तबगार पुरुष दरबारच्या कुटिल कारस्थानास बळी पडावा हें त्या राज्याचें दुर्दैव होय.

४ **बहामनी राज्याचें स्वरूप**:—बहामनी राज्याचा विस्तार उत्तरेस नर्मदा नदी, पश्चिमेस सह्याद्रि, दक्षिणेस तुंगभद्रा व पूर्वेस तेलंगण एवढा होता. रशियन प्रवाशी 'नितिकिन' हा इ. स. १४७० च्या सुमारास बेदर येथें आला होता. त्यानें बहामनी राज्याचें त्या वेळचें वर्णन लिहून ठेविलें आहे. उत्तरेकडील मुसलमान दक्षिणेत येऊन राज्य करूं लागण्यापूर्वीच कित्येक वर्षें समुद्रमार्गानें मुसलमान लोक तेथें व्यापार वगैरेच्या निमित्तानें येत असत. त्या काळी चौल, दाभोळ, गोवा वगैरे बंदरें व्यापाराकरितां प्रसिद्ध होतीं. तेथून इजिप्त, अरबस्थान वगैरे देशांशी हिंदुस्थानचा मोठा व्यापार चालत असे. दक्षिणेतील मुसलमानाचे हिंदु स्त्रियांशी विवाह होत असत. अशा रीतीनें दक्षिणेत हिंदु व मुसलमान हे केवळ राजकीय सबंधाखेरीज इतर प्रसंगानेंही एकत्र येत असत. ह्यामुळें त्यांचे एकमेकांशीं संबंध उत्तर हिंदुस्थानांतील संबंधाहून जास्त सलोख्याचे असत; तथापि दक्षिणेंतील सुलतानांचें धर्मवेड उत्तरेंतील सुलतानांहून कमी नव्हतें. बहामनी राज्यकर्त्यांत कोणी कर्तबगार पुरुष झाला नाही व कित्येक तर निःसंशय दुर्बलच होते. परंतु त्याचा फायदा घेऊन स्थानिक लोकांनी स्वतःच्या सत्तेच्या पुनरुज्जीवनार्थ उठाव केल्याचें किंवा विजयनगरकडून येणाऱ्या लाटेचा फायदा करून घेतल्याचें दिसत नाहीं. स्वतःच्या राजकीय स्थितीबद्दलच्या वाढत्या औदासिन्याचें हे लक्षण होय. राज्यकर्ते कसेही असले तरी सर्व साधारण जनता शांततेचा उपभोग घेत होती असें निर्तिकिनच्या वर्णनावरून म्हणण्यास हरकत नाही. इ. स. १४८० पासून बहामनी राज्याचे तुकडे पडण्यास सुरवात झाली व इ. स. १५२६ पर्यंत विजापूरची आदिलशाही, अहमदनगरची निजामशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही, वऱ्हाडची इमादशाही व बेदरची बरीदशाही अशीं पांच स्वतंत्र मुसलमानी राज्यें अस्तित्वांत आली. दक्षिणेंतील पुष्कळसे मुसलमान बहामनी राज्यांत बाटलेल्या लोकांचे वंशज आहेत.

# दक्षिणेकडील विजयनगरचें हिंदु साम्राज्य

## इ. स. १३३६–१६७४

**१ विद्यारण्यः**—अल्लाउद्दिनाचा सरदार मलिक काफूर याच्या स्वाऱ्यांमुळें मुसलमानांची सत्ता दक्षिणेपर्यंत जाऊन पोहोंचली व तेथें असलेल्या अनेक हिंदू राज्यांचा विध्वंस झाला. दक्षिणेस शृंगेरी येथें श्रीशंकराचार्यांचा मठ होता, त्यासही मुसलमानांच्या स्वाऱ्यांमुळें उपद्रव पोहोंचला. तेव्हां मुसलमानी सत्तेची लाट परतवून लावावी अशी हिंदु लोकांत जोराची भावना उत्पन्न झाली. ही मनोभूमिका तयार करण्याचें बरेंचसें श्रेय त्या वेळचे शृंगेरीचे शंकराचार्य विद्यारण्य ह्यास दिलें पाहिजे. विद्यारण्य मोठा संस्कृत पंडित होता. त्यानें संस्कृत भाषेंत अनेक ग्रंथ केले. यांमध्यें ' सर्वदर्शनसंग्रह ' व 'पंचदशी' हे दोन ग्रंथ फार प्रसिद्ध आहेत. परंतु विद्यारण्य केवळ धर्मशास्त्रज्ञ नव्हता. त्यास त्या वेळचें राजकारणही कळत होतें. मुसलमानांची दक्षिणेकडे एकसारखी पसरणारी लाट थोपवून न धरल्यास अखिल हिंदुस्थान यवनमय होईल व मग हिंदूंचें धर्मशास्त्र पुस्तकांतल्या पुस्तकांतच राहून जाईल हें जाणून तो थोर पुरुष लोकजागृतीच्या कार्यास लागला.

**२ विजयनगरची स्थापनाः**—इ. स. १३२३ सालीं मुसलमानांनीं वरंगळच्या राज्यावर स्वारी करून तेथील राज्य उध्वस्त केलें; तेव्हां तेथें राहून निभाव लागणार नाहीं असें पाहून संगमाचे पुत्र हरिहर व बुक्क अनेक हिंदू लोकांबरोबर कर्नाटकांत आनेगुंदीच्या राज्यांत आले. आनेगुंदीचें राज्य तुंगभद्रेच्या उत्तरेस होतें व त्याच राज्याच्या सरहद्दींत शृंगेरीचा मठ होता. हरिहर आनेगुंदीच्या राज्यांत आला तेव्हांपासून त्याच्याही मनांत हिंदु राज्याच्या पुनरुज्जीवनाचे विचार एकसारखे घोळत होते. लवकरच हरिहर बंधूंच्या अंतःकरणांत शृंगेरी पीठस्थ शंकराचार्यांबद्दल पूज्यभाव उत्पन्न झाला व यापुढें या उभयतांचें साहचर्य परस्परांस व राज्यवृद्धीस पोषक झालें. हरिहर हा फार कर्तबगार होता. तो आपल्या अंगच्या हुषारीनें आनेगुंदीच्या राज्याचा प्रधान झाला. परंतु हें राज्य फार दिवस टिकलें नाहीं. इ. स. १३३४ सालीं आनेगुंदीच्या राजानें महमद तघ्लखाच्या बंडखोर पुतण्यास आश्रय दिला. यामुळें तघ्लखास राग येऊन त्यानें आनेगुंदीवर स्वारी केली व तें राज्य काबीज करून तेथें आपला अधिकारी नेमला.

हें पाहून हरिहर व विद्यारण्य यांनीं नवीन ठिकाणीं राजधानी स्थापन करण्याचा विचार केला. आनेगुंदीसमोर तुंगभद्रेच्या दक्षिणेस एक बळकट जागा पाहून त्या जागीं विजयनगरची स्थापना केली. ह्या शहराच्या तिन्ही बाजूंनीं टेंकड्या व चौथ्या बाजूस खोल नदी असल्यामुळें ह्या शहरास एक प्रकारें स्वाभाविकच तटबंदी झाली होती. हेंच शहर हरिहरानें आपली राजधानी केलें. हिंदु लोकांत विद्यारण्याचें चांगलेंच वजन असल्यामुळें राज्यस्थापनेचें कार्य सुलभ झालें व महमद तघ्लखानंतरचे दिल्लीचे सुलतान दुबळे निघाल्यामुळें मुसलमानांकडून प्रारंभींच विरोध झाला नाहीं. इ. स. १३३६ सालीं म्हणजे बहामनी राज्य सुरू होण्याच्या अगोदर दहा वर्षें विजयनगरचें राज्य सुरू झालें. विद्यारण्यही[१] आपलें कार्य झालें असें पाहून हरिहर याजवर सर्व कारभार सोंपवून निघून गेला. विद्यारण्याची ही निरिच्छ-बुद्धि त्याच्या कर्तबगारीस अधिकच शोभा देते !

३ **दुसरा देवराय** (इ. स. १४२३–४६):—हरिहर व बुक्क हे पहिले राजे झाले. त्यांच्या कारकीर्दीत राज्याचा विस्तार पूर्व किनाऱ्यापासून पश्चिम किनाऱ्यापर्यंत होऊन खालीं दक्षिणेस त्यांचा एकसारखा अंमल पसरत चाललेला होता. इ. स. १३७४ सालीं बुक्कानें चीनच्या राजाकडे शिष्टमंडळ पाठविल्याचा उल्लेख सांपडतो. बुक्क व हरिहर यांच्यामागून जे राजे झाले त्यांचीं व बहामनी राजांचीं क्षुल्लक कारणांवरून अनेक वेळां युद्धें होत व कित्येक वेळां हिंदू राजांच्या पदरीं अपयशाचा वाटाही येत असे. परंतु ऐश्वर्यानें व विस्तारानें विजयनगरचें राज्य फार मोठें असल्यानें त्या पराभवांचा चिरकालिक असा कांहींच परिणाम झाला नाहीं. फक्त यांच्या राज्याची उत्तरेकडील वाढ खुंटली, एवढाच काय तो परिणाम झाला असें म्हणतां येईल. इ. स. १४२१ ते १५२९ पर्यंत विजयनगरच्या राज्याची चढती कमान होती. इ. स. १४२३ ते ४६ पर्यंत दुसरा देवराय नांवाचा एक राजा होऊन गेला. त्यानें हिंदूंना मुसलमानी युद्धकलेची माहिती करून देण्याकरितां

---

**१ टीप:—विद्यारण्य व विद्यातीर्थ या दोन व्यक्ती असून विद्यारण्य हे विद्यातीर्थांचे शिष्य होत, व विद्यातीर्थ हे हरिहराचे समकालीन होत, असें अलीकडील संशोधकाचें म्हणणें आहे. विद्यातीर्थांस विद्याशंकर असेंही दुसरें नांव आढळतें.**

कांहीं मुसलमान लोक आपल्या चाकरीस ठेवले. परंतु ते इतके कडवे होते कीं, हिंदु राजा काफर म्हणून ते त्यास मुजरा देखील करीत नसत; म्हणून देवराय ती अडचण काढून टाकण्याकरितां आपल्या जवळच कुराणाची प्रत घेऊन बसे व मग ते त्यास मुजरा करीत. असल्या चढेल लोकांच्या धर्माभिमानाचें कौतुक करावें की अशाही लोकांपासून त्यांची युद्धकला हस्तगत करणाऱ्या देवरायाची तारीफ करावी हा प्रश्नच आहे !

**४ कृष्णदेवराय** ( इ. स. १५०९–३० ):—विजयनगरचें राज्य एका घराण्यांत एकसारखें चाललें नाहीं. त्या काळीं इतरत्र दिसून येणारा क्रम येथेंही घडून आला. साळुव घराण्यांतील नरसिंह हा चंद्रगिरीचा राजा होता. त्यानें पूर्वीच्या संगम घराण्यास बाजूस सारून आपण गादी बळकाविली (इ. स. १४८६). साळुव घराण्याचा अंमल इ. स. १५०५ पर्यंत टिकला व त्या सालीं तेथील एका तुळुव घराण्यांतील पुरुषानें विजयनगरचें राज्य बळकाविलें. या तुळुव घराण्यांत कृष्णदेवराय हा फार पराक्रमी राजा होऊन गेला. यानें इ. स. १५०९–३० पर्यंत राज्य केलें. बहामनी राज्य या वेळेस मोडकळीस येत चाललें होतें. कृष्णदेवरायानें आदिलशहाशीं युद्ध करून रायचूर दुआब आपल्या ताब्यांत घेतला व पुढें तर खुद्द कल्बुर्गा शहरही काबीज केलें. कृष्णदेवराय स्वत: वैष्णवधर्मी असून त्यानें इतर धर्मीयांस सहिष्णुतेनें वागविलें. त्याचें खाजगी आचरणही कित्ता घेण्यासारखें होतें. तो विद्येचा अभिलाषी व चाहता होता.

**५ राक्षसतंगडीची लढाई** (इ. स. १५६५):—त्याच्यानंतर त्याचा भाऊ अच्युतराय हा गादीवर बसला. परंतु सर्व सत्ता दिवाण तिम्म याच्या हातांत होती. अच्युतराय इ. स. १५४२ त मृत्यु पावल्यावर त्याचा पुतण्या सदाशिवराय हा गादीवर बसला; परंतु सर्व सत्ता पूर्वीच्या दिवाणाचे तीन मुलगे तिरुमल, रामराजा व व्यंकटाद्रि यांच्या हातीं होती. त्यांचें विजापूरच्या आदिलशहाशीं संगनमत होऊन दोघांनीं मिळून निजामशाहीवर चाल केली. परंतु या लढाईंत रामराजानें आपल्या साह्यकर्त्यांशीं फार चढाईचें वर्तन केलें, व लढाईनंतर तो मुसलमान राजांच्या वकिलांनाही सभ्यपणें वागवीनासा झाला. तेव्हां विजापूर, अहमदनगर, गोवळकोंडें व बेदर येथील मुसलमानी राजांना आपआपलीं भांडणें बाजूस ठेवून हिंदु राज्याचा शेवट केला पाहिजे

असें वाटूं लागलें व आपआपलीं सैन्यें एकत्र करून ते विजयनगरच्या रोखानें निघाले. रामरायानें तिरुमल व व्यंकटाद्रि यांच्या हाताखाली फौजा तयार करून तो त्यांना तोंड देण्याकरितां निघाला. विजयनगरच्या लोकांनीं आजपर्यंत अनेक वेळां मुसलमानांशी दोन हात केले असल्यामुळें त्यांना या लढाईची कांहींच धास्ती वाटली नाहीं. दोन्ही सैन्यांची गांठ तालिकोटपासून २५ मैलांवर कृष्णेच्या कांठी रक्कसगी व तंगडगी या दोन गांवांजवळ पडली, म्हणून या लढाईस 'राक्षसतंगडीची लढाई' असें म्हणतात. प्रत्यक्ष लढाई चालू असतां रामराजा फारच बेसावधपणें वागला व त्यामुळें तो शत्रूच्या हाती सांपडला. शत्रूच्या फौजेनें त्यास मारून त्याचें शिर विजयनगरच्या फौजेस दाखवितांच तिचा धीर खचला. हिंदूंचा पूर्ण पराभव झाला. त्यानंतर मुसलमानांच्या फौजा विजयनगरकडे चाल करून गेल्या. विजयनगर तेथून सुमारें ७५ मैल दूर होतें. पराभवाचें वृत्त कळल्यावरही शहराच्या संरक्षणाची कांहीं तजवीज करतां आली असती, परंतु कोणाचेंच डोकें ठिकाणावर राहिलें नाहीं. तिरुमल हा सदाशिवरायास घेऊन पेनुकोंड्याकडे पळून गेला. त्यांच्यामागें विजयनगरच्या असहाय प्रजेची अनन्वित दुर्दशा झाली व नेववेल तेवढी लूट नेऊन मुसलमानी फौजा परत गेल्या. विजयनगरचे पडीक अवशेष आजही विजयनगरच्या गतवैभवाची साक्ष देतात.

**६ विजयनगरचा अंत :**—या पराजयांतून हिंदूंचें डोकें वर निघालें नाहीं. इ. स. १५६७ त तिरुमलनें पेनुकोंड्यास स्वतंत्र राज्य स्थापन केलें. त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा श्रीरंग हा गादीवर बसला. परंतु मुसलमानांनीं स्वारी करून पेनुकोंडाही काबीज केला (इ. स. १५७९); तेव्हां राजधानीचें पुन्हां स्थलांतर होऊन ती चंद्रगिरी येथें आली. चंद्रगिरीचा शेवटचा राजा श्रीरंग याचें पुढें सतराव्या शतकांत म्हैसूरच्या राजाशीं भांडण झालें व त्या भांडणांतच चंद्रगिरीच्या राजवंशाचा म्हणजे परंपरेनें विजयनगरच्या हिंदु राज्याचा अस्त झाला ( इ. स. १६७४ ).

**७ विजयनगरचें वैभव :**—इटालियन प्रवासी निकोलो कोंटि हा इ. स. १४८७ सालीं देवरायाच्या दरबारीं गेला होता व अबदुल रझक हा तुर्की पुरुष तैमूरलंगाच्या मुलाकडून कालिकतच्या झामोरीनकडे आला असतां तोही इ. स. १४४३ सालीं विजयनगरास येऊन गेला. याशिवाय पंधराव्या शतकाच्या

शेवटीं पोर्तुगीज लोकही विजयनगरच्या दरबारीं येऊन गेले. या प्रवाश्यांनीं विजयनगरचीं वर्णनें लिहून ठेविलीं आहेत, त्यांवरून तेथील वैभवाची साक्ष पटते. त्या कालीं हिंदु कलाकौशल्याच्या निदर्शक अशा अनेक इमारती हिंदू राजांनीं बांधिल्या. परंतु मुसलमानांच्या विध्वंसापुढें त्यांतील फारसें कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. तुंगभद्रा नदीस धरण बांधून कालवे काढलेले होते. इ. स. १४०६ सालीं बहामनी सुलतान फिरोज व देवरायाची मुलगी यांचें लग्न झालें. त्या वेळीं राजधानींतील सहा मैल रस्ता भरजरीच्या वस्त्रांनीं आच्छादित केला होता. राजधानीभोंवतीं सात तट असून अगदीं मध्यावर राजवाडा व खजिना असे. कृष्णरायाच्या वेळीं विजयनगरच्या राज्यांत सात लक्ष पायदळ, बावीस हजार घोडेस्वार व सुमारें ५५१ हत्ती होते असें वर्णन आढळतें. एकंदर राज्याचे दोनशें विभाग असून त्यांवर अधिकारी नेमलेले असत. इ.स. १३८७ सालीं विद्यारण्याचा भाऊ सायणाचार्य यानें वेदांवर भाष्य लिहिलें.

**८ विजयनगरचें कार्य :**—चौदाव्या शतकाच्या प्रारंभीं मुसलमान लोक दक्षिणेंत राज्यकर्ते बनले. परंतु त्याच शतकाच्या मध्यावर हिंदूंनीं एकत्र होऊन आपल्या धर्माचें रक्षण करण्यासाठीं राज्य स्थापन केलें व तें दोन शतकें टिकून राहिलें. विजयनगरचें राज्य नसतें तर मुसलमानी सत्तेची लाट अप्रतिहत दक्षिणेपर्यंत पोहोंचून उत्तरेप्रमाणें दक्षिणही मुसलमानमय झाली असती. या दृष्टीनें विजयनगरच्या राज्याकडे पाहिलें म्हणजे त्याचें कार्य कोणतें तें लक्षांत येतें. मोठमोठीं राज्यें व साम्राज्यें यांच्यामागें कर्तृत्ववान् व्यक्ती उभ्या असतात. ह्या व्यक्ती कांहीं एका विशिष्ट ध्येयाकरितां तळमळत असतात. त्या ध्येयाची सिद्धि हें त्या राष्ट्राचें कार्य. विजयनगर हिंदुत्वाच्या रक्षणाकरितां उभें राहिलें, लढलें व स्मृतिशेष झालें. विजयनगरच्या विनाशा-नंतर हिंदुत्वाच्या रक्षणाचें कार्य कांहीं काळ मागें पडलें. तंजावर, मदुरा, वगैरे ठिकाणीं लहान लहान हिंदू राज्यें जीव धरून होतीं. ह्यांपैकीं पुष्क-ळांस 'पाळेगार' म्हणत असत. शेवटीं चौदाव्या शतकांत हरिहर व विद्यारण्य यांनीं जें कार्य केलें तेंच सतराव्या शतकांत शिवाजी व रामदास यांनीं केलें व हिंदु राज्याची विस्कटलेली घडी पुन्हां नीट बसविली. तोंपर्यंत निरनिराळे मराठे सरदार मुसलमानांच्या पदरीं राहून आपल्या शौर्याचें जतन करून होते. अशा पुरुषांतच शिवाजीचा बाप शहाजी याची गणना होते.

# भाग ३ रा

# मराठी राज्याचा उदय

## स्वराज्यस्थापनेची पूर्वतयारी

**१ महाराष्ट्र :**—हा त्रिकोणाकृति देश नर्मदेच्या दक्षिणेस असून पूर्वी दंडकारण्य या नांवानें प्रसिद्ध होता. ह्याच्या पश्चिमेस दमणपासून कारवारपर्यंतचा समुद्रकिनारा उत्तरेस दमणपासून जवळजवळ थेट समोर अशी नागपूरच्याही पलीकडे जाणारी सरळ रेषा व पूर्वेस कारवार ते नागपूरच्या पलीकडे जाणारी वाकडीतिकडी रेषा ह्या महाराष्ट्राच्या मर्यादा होत.

**२ मराठ्यांच्या उत्पत्तीची मीमांसा:**—ह्या प्रदेशांत राहणारे मराठे लोक मुख्यत: मराठी भाषा बोलतात. मराठे लोकांचा उदय महाराष्ट्रांत कसा झाला याबद्दल कै. राजवाडे यांनीं आपल्या राधामाधवविलासचंपूच्या प्रस्तावनेंत पुढीलप्रमाणें खुलासा केला आहे. मराठे हे मुख्यत: महाराष्ट्रिक व नागक्षत्रिय यांच्या संबंधापासून उत्पन्न झालेले लोक होत. महाराष्ट्रिक लोक मूळ मगधाच्या राज्यांत राहात असत. बौद्ध धर्माचा प्रसार होऊं लागल्यावर व त्याचा मगधाच्या राजांनीं पुरस्कार केल्यावर इसवी सनाच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या शतकांत ते स्वधर्मरक्षणार्थ दक्षिणेंत आले. परंतु ते पूर्वीपासून मगधाच्या महाराज्याचे (साम्राज्याचे) अभिमानी असल्यानें स्वत:स महाराजिक किंवा महाराष्ट्रिक असें म्हणवीत असत. दक्षिणेंत आल्यापासून ह्यांनीं गांवोगांव आपल्या वसाहती स्थापन करून पाटिलकी करून राहूं लागले. दक्षिणेंत त्यांना नागलोक भेटले. हे उत्तरेस जनमेजयानें सर्पसत्र केलें तेव्हां दक्षिणेंत आले होते. अर्वाचीन नायर लोक हे नागांचे वंशज होत. महाराष्ट्रिक व नाग यांचा शरीरसंबंध होऊन मराठे लोक उदयास आले. हे संस्कृतीनें फारसे उच्च दर्जाचे नसल्यानें पोटाला देईल त्याची चाकरी करून आपली पाटिलकी[१] सांभाळून राहात असत. मोठमोठीं स्वतंत्र

---

१ **टीप :**—हा शब्द 'पट्टकील' शब्दापासून झालेला आहे. पट्ट म्हणजे जमिनीच्या मालकाचा कागद. तो कील म्हणजे 'लांकडी नळकांडें' त्यांत घालून ज्याच्याजवळ ठेवावयास देतात तो पट्टकील किंवा पाटील.

राज्यें स्थापन करण्याची ऐपत त्यांच्या अंगीं नव्हती. यांच्यावर उत्तरेकडून आलेल्या चालुक्य, राष्ट्रकूट, यादव इत्यादि उच्च क्षत्रिय कुलांनीं पाठोपाठ राज्य केलें. हे 'मराठे क्षत्रिय' या नांवानें ओळखले जात.[१] यांनीं पाटिलकीहून श्रेष्ठ अशीं देशमुखीचीं वतनें आपल्या ताब्यांत घेतलीं. पुढें मुसलमान राज्यकर्ते आले तेव्हां हे गांवोगांवचे देशमुख फौजबंद राहून जरूर वाटेल त्याप्रमाणें वाटेल त्या मुसलमानी राज्यांत नौकरी करीत. लखूजी जाधव, शहाजी भोसले यांसारखे सरदार मनास येईल त्याप्रमाणें कधीं निजामशाहींत तर कधीं मोगलांकडे, तर कधीं आदिलशाहींत जात याचें कारण हेंच होय. मराठा क्षत्रियांप्रमाणें मराठे हेही आपली पाटिलकी संभाळून अधिक वैभवाच्या आशेनें यवनांच्या पदरीं सेवावृत्ति पतकरून राहिले. ह्या मराठ (कुणबी) लोकांत उच्च संस्कृतीचा अभिमान उत्पन्न केल्याखेरीज त्यांना स्वराज्यस्थापनेची तळमळ लागणार नाहीं; आणि त्यांचें साहाय्य मिळणार नाहीं तोंपर्यंत एकट्या महाराष्ट्र क्षत्रियांच्या हातून ही कामगिरी तडीस जाणें कठीण हें ओळखून महाराष्ट्र क्षत्रियांनीं व त्यांच्याबरोबर आलेल्या महाराष्ट्र ब्राह्मणांनीं मराठ्यांच्या मराठी भाषेंत धार्मिक विषयांवर ग्रंथरचना केली. महाभारत, रामायणादि ग्रंथ मराठींत आणले व धर्माचें ज्ञान व अभिमान हा सामान्य जनांचा विषय करून टाकला. पुढें शहाजी, शिवाजी यांसारख्या महाराष्ट्र क्षत्रियकुलोत्पन्न वीरांनीं ह्यांची मदत घेऊन स्वराज्याची स्थापना केली. कालांतरानें मराठे कर्तृत्ववान् होऊन उच्च पदास चढले व त्यांचा कित्येक ठिकाणीं महाराष्ट्र क्षत्रियांशीं शरीरसंबंध आला म्हणून आजमितीस मराठा या शब्दानें पूर्वींचे मराठा क्षत्रिय व महाराष्ट्रीय नागकुलोत्पन्न मराठे या दोघांचाहि बोध होतो व मराठी राज्य या शब्दानें महाराष्ट्रांत कायम वस्ती करून राहिलेल्या ब्राह्मण–क्षत्रिय–शूद्रांनीं स्थापन केलेलें राज्य असा अर्थ रूढ आहे.

**३ मराठे सरदार**:—फार प्राचीन काळापासून झालेल्या आंध्र, चालुक्य व यादव इत्यादि हिंदू राज्यांचा व त्यानंतरच्या बहामनी राज्य व निजामशाही वगैरे मुसलमानी राज्यांचा इतिहास मागें येऊन गेलेला आहे. दक्षिणें-

---

१ **टीप**:—महाराष्ट्रांत मराठा क्षत्रिय व मराठा कुणबी हे भेद कांहीं ठिकाणीं आढळतात. त्याचें कारण यावरून लक्षांत येईल.

तील मुसलमानी शाह्यांच्या पडत्या कालांत मराठे सरदारांस महत्त्व प्राप्त झालें. मुसलमानांच्या दरबारीं नेहमीं परदेशी मुसलमान व दक्षिणी मुसलमान असे दोन पक्ष असत. ते आपसांतील भांडणांत सुलतानाचा बोज राखीत नसत. त्यांना पायबंद घालण्यास तिसरा पक्ष उत्पन्न करणें जरूर होई व त्याकरितां मुसलमान सुलतान मराठे सरदारांस चुचकारून आपल्या पदरीं राखून ठेवण्याचा यत्न करीत. तसेंच बहामनी राज्याचे तुकडे झाल्या-वर निरनिराळीं राज्यें आपापसांत भांडत, तेव्हां त्या वेळींही फौजबंद मराठे सरदारांचा त्यांना आयता उपयोग होई. निजामशाही व आदिलशाही ह्यांचा लढा चालू असतां निजामशहानें शिवाजीचा आजा मालोजी यास मदती-करितां आपल्या पदरीं बोलावून नेलें, असा शिवभारतांत उल्लेख आहे. भोसल्याखेरीज जाधव, निंबाळकर, शिर्के, घोरपडे वगैरे मराठे सरदार सुलतानांच्या पदरीं असत. त्यांना मुसलमानी राज्यांत चाकरी करतांना आपल्या लष्करी सामर्थ्याची व राजकीय महत्त्वाची जाणीव उत्पन्न झाली व अनुकूल प्रसंग पाहून त्यांनीं त्याचा उपयोग करून घेतला.

४ **दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांचें स्वरूप**:—दक्षिणेंत मुसलमानी अंमलाचीं पाळेंमुळें खोलवर गेलेलीं नव्हतीं. डोंगराळ मुलुखांतील प्रदेशावर अंमल चालविण्यास तेथें स्थायिक झालेल्या मराठ्यांच्या तंत्रानें चालण्या-वांचून गत्यंतर नव्हतें. त्याशिवाय पाटिलकी व देशमुखी अंमलाखालीं देशांतील ग्रामसंस्थांना इतकें संघटित स्वरूप प्राप्त झालें होतें कीं, त्या संस्था गांवचा बहुतेक कारभार पाहत व सरकारी अधिकारी बहुधा देशमुखां-मार्फत सरकारी देणें वसूल करीत. उत्तरेकडील मुसलमानी राज्यांत वायव्ये-कडून येणाऱ्या कडव्या, कर्तबगार व कंटक मुसलमानांचा वारंवार भरणा होई. तसा प्रकार दक्षिणेंत होत नसे. समुद्रमार्गानें थोडेबहुत परकीय मुसल-मान दक्षिणेंत येत असत, नाहीं असें नाहीं; पण मोठा भरणा येथें धर्मांतरानें मुसलमान झालेल्या लोकांचा होता. ह्यांच्यांत हिंदूंच्या पुष्कळ चाली-रीती चालू राहिल्या. अद्यापिही पुष्कळ मुसलमान नवरात्र बसवितात व हिंदू देवास नवस करितात. तसेंच मुसलमान सुलतानांनीं हिंदू स्त्रियांशीं शरीरसंबंध केले. उदाहरणार्थ, विजापूरच्या राज्याचा संस्थापक यूसफ आदिलशहा याची बायको मुकुंदराव नामक ब्राह्मणाची बहीण होती.

बिदरचा अमीर बेरीद याची बायको साबाजी नामक एका मराठे सरदाराची मुलगी होती. ह्या संबंधामुळें त्यांचा व त्यांच्या संततीचा हिंदूंकडे साहजिकच ओढा असे. दक्षिणेंत मुसलमान अगदींच अल्पसंख्य[1] असल्यामुळें त्यांचें हिंदूंच्या मदतीवांचून पदोपदीं अडे. त्यांच्या राज्यांत हिंदू लोक राज्यकारभाराच्या निरनिराळ्या खात्यांत प्रामुख्यानें कारभार करीत असत.

**५ भागवत धर्माचा उदय**:—वरील वर्णनावरून हें लक्षांत येईल कीं, मुसलमानी राज्याच्या टोपणाखालीं हिंदूंना राज्यकारभार चालविण्याची व सैन्यें बाळगून मोहिमा करण्याची व किल्ले लढविण्याची संधि मिळालेली होती. त्यामुळें स्वतंत्र मराठी राज्य स्थापन करण्यास लागणारीं राजकीय व लष्करी साधनें तयार आहेत हेंही त्यांना दिसून आलें. त्याखेरीज त्या काळांत उदय पावलेल्या आणखी एका साधनाचा उल्लेख करणें जरूर आहे. तें म्हणजे तत्कालीन संतमंडळ होय. पंढरीचा विठोबा हे त्यांचें आद्यदैवत होय. पंढरपूरच्या विठोबाच्या दर्शनास जाण्यापूर्वी शंकराचें दर्शन घेण्याची चाल आहे. यावरून येथें शैव व वैष्णव यांच्यांत ऐक्य करून देण्याचाही यत्न झाला असावा असें अनुमान निघतें. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ इत्यादिकांनीं घालून दिलेली भागवतधर्माची परंपरा, तुकारामादि भगवद्भक्तांनीं चालू ठेविली. मनुष्य कोणत्याही जातींत जन्मास येवो, परमेश्वराची अनन्य भावानें भक्ति केल्यास तो उद्धरून जातो हें भागवतधर्माचें सार होय. अशा प्रकारच्या प्रतिपादनास पुष्कळांनीं विरोध केला. मंबाजीबुवासारख्या ब्राह्मणांनीं वेदांचे व श्रुतींचे अर्थ तुकोबाच्या अभंगांत उमटतात व शूद्रांकडून त्याचा उच्चार होतो म्हणून तक्रार केली; परंतु त्यांचें तेज न पडून अभंग हे नांवाप्रमाणें अ–भंगच राहिले. ह्या भक्तिमार्गाचा पुरस्कार करणारे संत त्या काळीं अनेक जातींत उत्पन्न झाले. चोखोबा हा महार होता. सावता माळी होता. गोरा कुंभार होता. रोहिदास चांभार होता. नरहरी सोनार होता. नामदेव शिंपी होता. ज्ञानेश्वर एकनाथ वगैरे ब्राह्मण होते. तुकाराम शूद्रवाणी होता. ह्या संतांची शिकवण बहुतांशीं निवृत्तिपर होती म्हणजे संसार असार आहे, त्यांत विरक्तपणें राहावें, सर्व लक्ष परमेश्वराकडे असावें,

---

१ **टीप**:—राजवाड्यांच्या मताप्रमाणें फार तर एक लाख.

असा त्या शिकवणीचा भावार्थ होता. ह्या दृष्टीनें पाहतां स्वराज्य-स्थापनेच्या प्रवृत्तिपर कार्यास त्यांच्या शिकवणुकीचा फारसा उपयोग झाला नाहीं असें कित्येकांचें मत आहे. परंतु हिंदुधर्मावरील भक्तीचीं पाळेंमुळें हिंदुमात्राच्या अंतःकरणांत खोल नेऊन रुजविण्याचें आणि जाती व वर्ण यांचा उच्चनीच भाव बाजूस ठेवून निःस्वार्थपणें एकत्र येण्याची बुद्धि उत्पन्न करण्याचें काम भागवत धर्मानेंच केलें यांत शंका नाहीं.

**६ समर्थांची कामगिरी :**—ह्या सर्व संतांची शिकवणूक निवृत्तिपर असल्यामुळें हें व्यंग काढून टाकण्याकरितांच कीं काय, समर्थ रामदास स्वामींचा उदय झाला व त्यांनी महाराष्ट्र धर्माची स्थापना केली. "म्लेंछ दुर्जन उदंड। बहुता दिसांचें माजलें बंड।" हें पाहून व "तीर्थक्षेत्रें मोडिलीं। ब्राह्मण-स्थानें भ्रष्ट झालीं। सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला॥" ही स्थिति लक्षांत घेऊन, "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा।" किंवा "बहुत लोक मिळवावे। एक विचारें भरावें। कष्टें करून घसरावें। म्लेंछावरी॥" व "आहे तितुकें जतन करावें। पुढें आणिक मिळवावें। महा-राष्ट्र राज्य करावें। जिकडे तिकडे॥" ह्या वचनांचा समर्थांनीं पुरस्कार केला. अशा प्रकारचें कार्य करणारे श्री शिवाजी महाराजांसारखे पुरुष पाहिल्यावर तळमळ वाटून ते तुळजाभवानीची प्रार्थना करतात कीं 'तुझा तूं वाढवी राजा। शीघ्र आम्हाची देखतां.' पुढें शिवाजी महाराजांनीं मुसलमानांचा पराभव करून स्वराज्याची स्थापना केली, तेव्हां त्यांच्या डोळ्यांत आनंदाश्रु येऊन त्यांनीं 'बुडाला औरंग्या पापी। म्तसंहार जाहला। मोडिलीं मांडिलीं छत्रें। आनंदवनभूवनीं॥' असे सद्‌गदित अंतःकरणानें उद्‌गार काढले. त्यांच्या शिकवणुकीचें सार "मुख्य तें हरिकथानिरूपण। दुसरें तें राजकारण। तिसरें तें सावधपण सर्व-विषयीं॥" ह्या ओंवींत येऊं शकेल. त्यांनीं पुरस्कार केलेल्या महाराष्ट्र-धर्माचेंही सार हेंच होय. यासच कै. राजवाड्यांनीं 'जयिष्णु हिंदु धर्म' असें नांव दिलें आहे व तुलनेनें भागवतधर्मास 'सहिष्णु हिंदुधर्म' असें म्हटलें आहे. उड्डाण करणारा मारुती ही त्यांच्या मतें जयिष्णु हिंदु धर्माची खूण होय व पंढरीचा विठोबा ही भागवत धर्मीयांची खूण होय. महाराष्ट्र धर्माच्या प्रसारार्थ समर्थांनीं एकंदर ११०० मठांची स्थापना करून तेथें

आपल्या शिष्यांची योजना केली. गांवोगांव मारुतीचीं देवळें स्थापन करून बलोपासनेचा प्रचार केला. व स्वराज्य स्थापनेस अनुकूल असें वातावरण देशांत उत्पन्न केलें. सारांश, संत व समर्थ ह्यांच्या उपदेशाची जोड लाभल्यामुळें 'स्वराज्यस्थापनेची तीव्र आकांक्षा व ती सिद्धीस नेण्यास लागणारें लष्करी सामर्थ्य' हीं दोन्हीं एकाच वेळीं महाराष्ट्रांत तयार झालीं व तिचा उपयोग करून घेणारा शिवाजीसारखा चौफेर पुढारीही महाराष्ट्रांत त्याच वेळीं उत्पन्न झाला.

**७ शिवाजी व रामदास :**—अशा ह्या समर्थांचा व शिवाजी महाराजांचा संबंध काय होता? त्यांची प्रथम भेट केव्हां झाली वगैरे प्रश्न महाराष्ट्राच्या इतिहासांत बरेच वादग्रस्त आहेत. समर्थांचा जन्म इ. स. १६०८ मध्यें झाला. पुढें १२ वर्षें बालपण, १२ वर्षें पुरश्चरण व १२ वर्षें तीर्थाटन होऊन इ. स. १६४४ च्या सुमारास ते कृष्णेच्या काठीं वस्ती करावयास आले असावे. त्यानंतर त्यांनीं आपल्या उद्योगास सुरवात केली. शिवाजी व रामदास यांची पहिली भेट इ. स. १६४९ मध्यें झाली, असें 'वाकेनिशी प्रकरण' नांवाच्या टिपणाच्या आधारें एका पक्षाचें म्हणणें आहे; व हें टिपण समर्थांच्या मृत्यूनंतर चारच दिवसांनीं त्यांचे पट्टशिष्य दिवाकर गोसावी यांच्या सांगण्यावरून केलेलें आहे. ही भेट इ.स. १६७२ त झाली असे दुसऱ्या पक्षाचें म्हणणें आहे व त्यास आधार केशव गोसावी यांनीं दिवाकर गोसावी यांस जें पत्र शके १५९४ त लिहिलें 'त्यांत राजे यांची ही पहिलीच भेट आहे' असे शब्द आहेत त्या पत्राचा होय. परंतु इ. स. १६७८ सालीं महाराजांनीं समर्थास देवस्थानच्या इनामाची जी सनद करून दिली, तिच्यांत इ. स. १६४८ त समर्थांनीं चाफळ येथें देवाची स्थापना केल्यापासून त्यांचा व स्वतःचा जो संबंध आला त्याचें समालोचन केलें आहे. त्यावरून बरेच वर्षांपूर्वीं समर्थ शिवाजी यांचा संबंध घडला होता हें उघड दिसतें. तें कसेंही असो; शिवाजीची व समर्थांची भेट इ.स. १६४९ त किंवा त्याहूनही अलीकडे झाली हें सिद्ध झालें तरी, त्यांच्या भेटीच्या अगोदरच शिवाजीचे गुरू दादाजी कोंडदेव यांचा शिवाजीच्या नांवानें स्वराज्यस्थापनेचा उद्योग चालू होता हें निर्विवाद होय. कारण पुणें प्रांतीं आपला अंमल बसविण्याकरितां तेथील किल्लेदारांस व वतनदारांस शिवाजीच्या

शिक्क्याच्या सनदा देण्याचा उपक्रम बहुधा इ. स. १६४२ पासून चालू होता. सारांश, रामदास व शिवाजी या दोघांचेही एकाच दिशेनें आपापल्या पद्धतीप्रमाणें उद्योग चालू होते, दोघांचीही वारंवार भेट होई, व रामदासाच्या कार्याचा शिवाजीस आपल्या कामांत फार मोठा उपयोग झाला एवढें मर्यादित विधान करण्यास तरी कांहींही बाध येत नाहीं.

**८ भोसल्यांचें पूर्ववृत्त:**—भोसले घराण्याचें मूळ चितोडच्या शिसोदे या नांवाच्या मानी व शुद्ध राजघराण्यांत सांपडतें. अल्लाउद्दीन खिलजीस तोंड देणारा चितोडचा राजा लक्ष्मणसिंह. याचा नातू सुजनसिंह चितोड सोडून निघाला. त्याचा वंशज देवराजजी इ. स. १४१५ च्या सुमारास दक्षिणेंत आला. त्याच्या कुळांत भोसाजी म्हणून पुरुष होऊन गेला. त्याच्या नांवावरून ह्या कुळास भोसले हें आडनांव पडलें. भोसले घराण्यांतील पुरुष भीमेच्या कांठीं हिंगणी, बेरडी, देऊळगांव वगैरे गांवाच्या पाटिलक्या करून राहूं लागले. त्यांच्या कुलांत इ. स. १५५० सालीं मालोजीचा जन्म झाला. मालोजीस निजामशहानें बोलावल्यावरून तो त्याच्या पदरीं राहून पराक्रमाच्या जोरावर तेथें मोठा मातबर सरदार बनला. मालोजीस इ. स. १५९४ सालीं शहाजी नांवाचा पुत्र झाला. तो १३ वर्षांचा असतांना मालोजी इंदापूरच्या लढाईत निजामशहाचे वतीनें आदिलशहाशीं लढत असतां मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याची जहागिरी शहाजीकडे आली. शहाजी १४–१५ वर्षांचा झाला, तेव्हां निजामशहाच्या पदरचा दुसरा सरदार लखूजी जाधवराव याची मुलगी जिजाबाई[१] हिच्याशीं त्याचें लग्न झालें. पुढें शहाजी मोठा झाल्यावर निजामशहानें त्यास योग्यतेस चढविलें.

**९ शहाजीचें चरित्र:**—इ. स. १६३६ पर्यंतचा शहाजीच्या आयुष्याचा बहुतेक काळ निजामशाहींत गेला. निजामशाहींत चांदबिबी, मलिकंबर व शहाजी ह्या तीन कर्तबगार व्यक्ती होऊन गेल्या. मोगल सम्राट् अकबर याच्या हल्ल्यास तोंड देण्यास चांदबिबी ही शूर स्त्री जातीनें सिद्ध झाली. पुढें निजामशाहीच्या दुर्दैवानें तिचा खून झाला. तेव्हांपासून म्हणजे ठोकळ मानानें इ. स. १६००

---

१ टीप:—रंगपंचमीच्या सणाची मनोरंजक हकीकत नवीन पुराव्यावरून विश्वसनीय ठरत नाहीं. शहाजीच्या लग्नसमयीं मालोजी जिवंत नव्हता.

पासून ते इ. स. १६२६ पर्यंत निजामशाहीच्या रक्षणाचें कार्य मलिकंबर ह्या हबशी[१] पुरुषाकडे होतें. शहाजीचें त्यास फार साह्य झालें. इ. स. १६२४ सालीं मोगल व विजापूरकर हे एक होऊन त्यांनीं निजामशाहीवर हल्ला केला. त्या वेळीं भातवडी येथें घनघोर युद्ध झालें. त्यांत शहाजीच्या पराक्रमामुळें निजामशाहीस विजय मिळाला. मलिकंबरनें आपल्या हयातींत निजामशाहीच्या राज्यांत जमीनमहसुलाची पद्धत व्यवस्थित घालून दिली. पुढें तो इ.स.१६२६ त मरण पावला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा फत्तेखान हा कर्तृत्वशून्य परंतु कारस्थानी असे. त्याच्यामुळें दरबारांत अनेक भांडणें उत्पन्न झालीं. त्यानें राज्यांतील लखूजी जाधवासारख्या प्रबळ सरदारांचे खून करविले व पुढें तर खुद्द मूर्तजा निजामशहास कैद करून मोगलाशीं सख्य केलें. पण मूर्तजा कैदेंतही कारस्थानें करील असें वाटून त्यानें मूर्तजास ठार मारलें. यानंतर त्यानें हुसेनशहा नामक एका बाहुल्यास गादीवर बसविलें व त्याच्यासह तो मोगल सरदार महाबतखान याच्या अंकित झाला.अशा रीतीनें त्याच्या मूर्खपणामुळें निजामशाहीचें राज्य इ.स. १६३० च्या सुमारास जवळ जवळ संपुष्टांत आलें. परंतु शहाजीस निजामशाहीचा अभिमान होता. त्यानें आपल्या कर्तृत्वानें मूर्तजा नामक दुसऱ्याच एका मुलास हाताशीं धरून जुन्नर येथें नवी राजधानी स्थापिली व निजामशाहीचें राज्य चालू केलें. या त्याच्या कृत्यावरून इतिहासकार त्यास 'किंगमेकर' असें म्हणतात. यापुढील ६ वर्षांत त्यानें निजामशाहीचा मोगली हल्ल्यापासून बचाव करण्यासाठीं प्रयत्नाची पराकाष्ठा केली. या वेळीं 'उत्तरेस शहाजहान व दक्षिणेस शहाजी' अशी शहाजीची थोर कीर्ती झाली. पण मोगलांच्या प्रबल शक्तीपुढें अखेर शहाजीचें कांहीं चाललें नाहीं व निजामशाही १६३६ त बुडाली. ह्या काळांतील शहाजीचा उद्योग पाहून आपणांस स्वतंत्र राज्य चालवितां येईल ही जाणीव मराठ्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. ती पुढें वाढत जाऊन शिवाजीच्या उपयोगी पडली.

**१० आदिलशाहींतील कामगिरी :**—इ.स.१६३६ त निजामशाहीचें राज्य बुडाल्यावर शहाजी आदिलशहाच्या पदरीं आला त्यानें प्रथम कर्नाटकांतील बहुतेक लहान मोठे पाळेगार आपल्या ताब्यांत आणले व बंगलोर येथें वास्तव्य

१ टीप :—मूळ अबिसिनीयांतून आलेल्या इसमास हबशी म्हणतात.

करून राहूं लागला. जिंकलेल्या प्रदेशांत त्यानें वसुलाची उत्तम व्यवस्था लावून दिली; परंतु आदिलशहास त्याचा आनंद वाटण्याऐवजीं उलट त्याच्या वाढत्या सामर्थ्याची भीति वाटूं लागली. शिवाय ह्याच वेळीं पुणें प्रांतांतील शिवाजीचे पराक्रम आदिलशहाचे कानीं आले. तेव्हां त्यास शहाजीची फूस असली पाहिजे, असा कयास बांधून आदिलशहानें मुस्तफाखान नामक सरदा-राच्या मदतीनें शहाजीस दग्यानें कैद केलें. हें वर्तमान कळतांच शहाजीचा वडील मुलगा संभाजी हा बंगलोरास होता, त्यानें मुस्तफाखानास जर्जर करून सोडलें व आदिलशहानें शिवाजीवर पाठविलेला सरदार मुसेखान ह्याच्याशीं पुरंदर येथें शिवाजीनें हातघाईची लढाई करून त्यास ठार मारिलें. पुढील वर्षी शहाजीनें आदिलशाहीशीं बोलणें करून आपली सुटका करून घेतली, पण त्यास आपल्या दरबारीं ठेवून घेतलें. हेतु हा कीं, त्यामुळें शिवाजीच्या उद्योगास पायबंद बसावा. पुढें गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या पदरीं मीरजुम्ला नामक सरदार होता, तो विजापूरच्या ताब्यांतील बंगळूरच्या राज्यांत घुसला. त्याच्याविरुद्ध पाठविण्यास आदिलशहाजवळ शहाजीखेरीज दुसरा तोलाचा सरदार नव्हता, तेव्हां आदिलशहानें त्यास मीरजुम्ल्याविरुद्ध स्वारीवर पाठविलें. तिकडे लढतां लढतां तो मरण पावला, तर ब्याद गेली असाही आदिलशहाचा अंतःस्थ हेतु असावा. शहाजीनें मीरजुम्ल्याचा पराभव करून त्यास त्याच्या मुलुखांत रेटीत नेलें. ह्यानंतर किरकोळ मोहिमा केल्यावर शहाजी नांवाला आदिल-शहाचें स्वामित्व पतकरून जवळ जवळ स्वतंत्रपणें कर्नाटकांत राहूं लागला. इ. स. १६५४ त शहाजीचा थोरला मुलगा संभाजी ह्याचें विजापूरचा सरदार अफझलखान याच्याशीं भांडण होऊन शेवटीं त्यांत तो मारला गेला. तेव्हां-पासून तर शहाजीनें आदिलशहाकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं. तो इ. स. १६६४ त घोड्यावरून पडून मृत्यु पावला. त्या वेळीं तो ७० वर्षांचा होता. शहाजीस शिवाजीची स्वातंत्र्याची दृष्टि नसली तरी केवळ कर्तृत्वाच्या दृष्टीनें पाहिलें तर शहाजी शिवाजीहून कमी नव्हता हें त्याच्या बहुविध उद्योगांवरून लक्षांत येईल.

# भाग ४ था

# स्वराज्यसंस्थापक शिवाजी

## ( इ. स. १६३०–१६८० )

**१ शिवाजीचा जन्मः**—" शके १५५१ शुक्ल संवत्सरे फाल्गुण व॥ त्रीतीया शुक्रवार नक्षत्र हास्त घटी १८ पळे ३१ गड ५ पळे ७ ये दिवसी राजश्री सिवाजी राजे सिवनेरीस उपजले " असा शिवाजीच्या जन्मासंबंधीं ' जेधे शकावली ' नांवाच्या अस्सल ऐतिहासिक कागदांत उल्लेख सांपडतो; व कवींद्र परमानंद-कृत ' शिवभारत '[१] या ग्रंथांतही हीच तिथि दिली आहे. शिवाजीच्या जन्मापूर्वी कांहीं महिने निजामशाहीच्या दरबारांत लखूजी जाधवरावाचा खून झालेला होता. म्हणून शहाजी मोगलांकडे गेला, परंतु पुन्हां परिस्थितीची आलटापालट झाल्यामुळें शहाजी पुन्हां निजामशाहीच्या रक्षणाकरितां धांवून येणार होता. अशा त्या गडबडीच्या प्रसंगांत शहाजीनें आपला थोरला मुलगा संभाजी याचें शिवनेरीचा सरदार श्रीनिवासराव याच्या मुलीशीं लग्न केलें व आपली गरोदर पत्नी जिजाबाई हीस शिवनेरीच्या किल्ल्यावर ठेवून दिलें. तेथेंच शिवाजीचा जन्म झाला. शिवनेरीच्या किल्ल्यावर जन्म झाला म्हणून त्याचें नांव ' शिवाजी ' असें ठेवण्यांत आलें.

**२ शिवाजीचें शिक्षणः**—शिवाजीच्या जन्मापासून पहिलीं सहा सात वर्षें शहाजी निजामशाहीच्या रक्षणार्थ प्रयत्न करीत होता. पुढें इ. स. १६३६ सालीं निजामशाही बुडाल्यावर शहाजी विजापूरच्या दरबारीं गेला तेव्हां त्यानें शिवाजीस व जिजाबाईस बरोबर नेलें. लवकरच शहाजीनें कर्नाटकांत अंमल बसविल्यावर तो आपल्या कुटुंबासह बंगळूर येथें राहूं लागला.

---

१ टीपः—' शिवभारत ' हा शिवचरित्रवर्णनपर ग्रंथ कवींद्र परमानंदानें शिवाजीच्या हयातींत रचला. त्यावरून शिवाजीचा जन्म १९ फेब्रुवारी १६३० रोजीं झाला असें ठरतें व इ. स. १६२७ हें शिवाजीच्या जन्माचें साल त्याज्य मानावें लागतें.

तेथें तो 'लिपिग्रहणयोग्य' झाला असें पाहून त्यास मुळाक्षरें[१] शिकविण्यांत आलीं. त्या लहान वयांतच शिवाजीची आई जिजाबाई हिनें शिवाजीस रामायण-महाभारतांतील वीरांच्या कथा सांगितल्या. त्यांचा शिवाजीच्या मनावर योग्य परिणाम होऊन त्याच्या अंगीं दृढ स्वधर्मनिष्ठा बाणली व आपण धर्मरक्षण करण्यास झटलें पाहिजे ही भावना त्याच्या मनांत उत्पन्न झाली.

**३ दादाजी कोंडदेवाची कामगिरी :**—शिवाजी बारा वर्षांचा झाला तेव्हां शहाजीनें त्याची पुणें प्रांतीं रवानगी केली व बरोबर त्याची आई जिजाबाई व आपला 'शहाणा व चौकस' कारभारी दादाजी कोंडदेव मलठणकर यांस पाठवून दिलें. शहाजीनें आपली बंगळूरची जहागीर संभाजीस दिली, तेव्हां पुण्याच्या जहागिरीचें काम पाहण्यास कोणी तरी हवा होता. म्हणून तेथे शिवाजीची योजना झाली. दादाजी कोंडदेव हा फार हुषार व करारी असे. त्यानें जहागिरीची उत्तम व्यवस्था लाविली; जमिनीची पाहणी केली व त्याबरोबरच शिवाजीस आवश्यक असें सर्व प्रकारचें शिक्षण दिलें. घोड्यावर बसणें, नेम मारणें, दांडपट्टा खेळणें यांत तो लवकरच प्रवीण झाला व पुढें पुढें दादाजीपंत त्यास बरोबर घेऊन 'हजीर मजलसी बैसून' 'निवाडपत्रें' करीत, म्हणजे गांवच्या प्रमुख लोकांच्या संस्थेंत बसून तेथील तंट्यांचा निकाल करीत. पुढें शिवाजीनें जी राज्याची उत्तम व्यवस्था लाविली तिचें मूळ त्यास ह्या वेळीं मिळालेल्या शिक्षणांत सांपडतें. शिवाजी मोठा झाल्यावर त्यानें हलकें हलके स्वराज्य स्थापनेचा उपक्रम सुरू केला. प्रथम तो मावळच्या देशमुखांची मनें वश करून घेऊं लागला. या उद्योगास इ. स. १६४३ पासून म्हणजे शिवाजी अवघा तेरा वर्षांचा असतांना सुरुवात झाल्याचें दिसून येतें. तेव्हां स्वराज्य स्थापनेचा बेत शिवाजीस पुरतें कळूं लागण्यापूर्वीच शहाजीच्या सम्मतीनें ठरला असावा असें अनुमान निघतें. त्याच वेळीं शिवाजीच्या नांवाची एक मुद्राही उपयोगांत येत होती. तिच्यावर पुढील

---

१ **टीप :**—शिवाजीस लिहितां वाचतां येत नव्हतें हें खरें नाहीं. कारण सुरत येथील समकालीन इंग्रज वखारवाल्या व्यापाऱ्यांना शिवाजीनें स्वदस्तुरचीं पत्रें लिहिल्याचे अनेक उल्लेख त्यांच्या 'फॅक्टरी रेकॉर्ड्स्' मध्यें सांपडतात. —(डॉ. बाळकृष्ण 'शिवाजी' व्हॉ. २ पृ. १०-१३ पहा)

श्लोक होता. 'प्रतिपच्चंद्र रेखेव वर्धिष्णुर्विश्व वंदिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते' ॥[१]

## राज्यस्थापनेचे उद्योग

**४ राज्यस्थापनेस प्रारंभ :**—कोकण पट्टीचा सुपीक प्रदेश, सह्याद्रीच्या घाटमाथ्यावरील किल्ले व मावळचा डोंगराळ प्रदेश या भागांत शिवाजीनें राज्यस्थापनेस प्रारंभ केला. वास्तविक भोसले मूळ देशावरील भीमेच्या कांठच्या प्रदेशांत राहणारे. पण त्या मैदानी मुलुखांत मोगल, विजापूरकर इत्यादि मुसलमानांस तोंड देणें कसें जमणार? म्हणून शिवकालीन राज्यसंस्थापकांनीं पश्चिमेकडील डोंगराळ मुलूखच पसंत केला. मोगल व विजापूरकर या दोन्ही सत्ताधीशांस तो सारखाच दूर व अंमल करण्यास अवघड असा होता. पुढील काळांत शिवाजीनें मी मी म्हणविणारे मोगल व आदिलशाही सरदार ह्या मावळी मुलुखाच्या जोरावर कसे खेळविले तें लक्षांत घेतां तत्कालीन लोकांनीं भौगोलिक पाहाणी करूनच राज्यस्थापनेसाठीं योग्य जागा निवडली असा तर्क सुचतो. कोकणपट्टी ही सुपीक, एकाबाजूनें समुद्र मर्यादित व दुसऱ्या बाजूनें पर्वताची रांग, यामुळें या प्रदेशांतील वसूल शिवाजीस नियमित मिळे व तेथील लोक बाहेरील कारस्थानास बळी पडण्याचा संभव कमी असे.

शिवाजीस त्याच्या विचाराचे कांहीं जिवलग स्नेही मिळाले. ते एसाजी कंक, तानाजी मालुसरे व बाजी फसलकर हे होत. त्यांनीं मावळची पाहाणी करून नाक्यांचीं ठिकाणें कोणतीं तें ठरवून ठेवलें. मावळसारख्या डोंगराळ प्रदेशाचें रक्षण करण्यास त्या काळीं किल्ल्यांचें महत्त्व फार होतें, हें जाणून त्यांनीं इ. स. १६४६ त आपल्या जहागिरींतील तोरणा किल्ल्याची डागडुजी करण्यास आरंभ केला. त्या वेळीं त्यास मोहरांचा हंडा सांपडला. त्या द्रव्याच्या मदतीनें त्यानें जवळच राजगड नांवाचा दुसरा किल्ला बांधला व पदरीं हजार

**१ टीप :**—अर्थ–शहाजीचा मुलगा शिवाजी याची ही मुद्रा. ही प्रतिपदेच्या चंद्रकलेप्रमाणें वाढत जाणारी असून जगास वंदनीय आहे व ती लोकांच्या कल्याणासाठीं शोभत आहे.

बाराशें मावळे जमविले. ह्या प्रकरणाची बातमी शिरवळच्या ठाणेदारानें विजापूरच्या दरबारीं पोहोंचविली. त्यावर दरबारकडून दादाजीपंतास जरबेचीं पत्रेंही आलीं. परंतु दादाजीनें तें प्रकरण कसें तरी निभावून नेलें. पुढील वर्षी तो मृत्यु पावला (इ. स. १६४७). त्याच्या मृत्यूनंतर शिवाजी त्याचा सर्व कारभार आपल्या जबाबदारीवर पाहू लागला. लवकरच विजापूरच्या दरबारशीं युद्धप्रसंग उद्भवणार हें तो ओळखून होता. त्याबद्दल तयारी म्हणून त्यानें झपाटयानें एकामागून एक किल्ले ताब्यांत घेतले व पुढील लढाईकरितां पैसा मिळवून ठेविला. कोंडाणा व चाकण हे किल्ले तेथील किल्लेदारांस वश करून घेतले. इतक्यांत त्यास बातमी कळली कीं, कल्याणचा सुभेदार मुल्लाना अहंमद हा विजापूरकडे खजिना पाठवीत आहे. त्याबरोबर शिवाजीनें आपले लोक पाठवून तो खजिना लुटला व मुल्लानास कैद केलें.[१] यानंतर त्यानें लोहगड, राजमाची हे किल्ले घेऊन कोकणांत राजापुरापर्यंत स्वारी केली व परत आला. ह्या सर्व उद्योगांत शिवाजीस शहाजीचें आंतून साह्य असलेंच पाहिजे अशी कल्पना करून घेऊन विजापूरच्या दरबारनें शहाजीस दगा करून कैद केलें (इ. स. १६४८) व शिवाजीचा बंदोबस्त करण्याकरितां मुसेखान नामक सरदारास पाठविलें. परंतु शिवाजीनें पुरंदरनजीक मुसेखानाचाच पराभव करून त्यास ठार मारलें. पुढील वर्षी शहाजीनें आदिलशहाशी बोलणें करून आपली सुटका करून घेतली व त्या करारप्रमाणें शिवाजीनें कोंडाणा किल्ला आदिलशहास देऊन टाकला.

**५ चंद्रराव मोऱ्यांचें पारिपत्य :**—परंतु एवढयानें शिवाजी व आदिलशहा यांच्यामध्यें सलोखा होणें शक्य नव्हतें. त्यानें शिवाजीच्या उद्योगास पायबंद बसविण्याकरितां शहाजीस दूर कर्नाटकांत न पाठवितां विजापुरास दरबारीं ठेवून घेतलें व इ. स. १६५२ त बाजी शामराज यास शिवाजीस पकडण्याकरितां पाठवून दिलें. शहाजी विजापूरच्या दरबारीं आहे हें

---

१ **टीप:**—या प्रसंगीं सुभेदाराची सूनही कैद झाली व तिला शिवाजीच्या लोकांनीं त्याच्यासमोर नेलें. तेव्हां त्यानें उद्गार काढले कीं, 'अशा सुंदर स्त्रीच्या पोटीं मी जन्मास आलों असतों तर अधिक सुंदर झालों असतों' असें म्हणून शिवाजीनें तिला सन्मानानें परत पाठवून दिलें. ही गोष्ट चिटणिशी बखरींत दिलेली आढळते.

लक्षांत घेऊन शिवाजी विजापूरकरांची कुरापत काढण्याचें टाळीत होता. या काळांत त्याचें जिंकलेल्या प्रदेशाची व्यवस्था लावण्याचें काम चालूं होतें. शिवाजी त्या वेळीं कोंकणांत असल्याचें कळल्यावरून बाजी शामराज तिकडे गेला, परंतु शिवाजी त्यास चुकवून राजगडीं आला व तेथून त्यानें बाजी शामराजवर सैन्य पाठवून त्याची दाणादाण केली. तेव्हां बाजी शामराज जीव घेऊन पळून गेला. पुढील वर्षी मीरजुम्ल्याचा बंदोबस्त करण्याकरितां शहाजीची कर्नाटकांत रवानगी झाली, तेव्हां शिवाजीनें पुन्हा धिटाईनें आपला उद्योग सुरू केला. इ. स. १६५४ त त्यानें पुरंदर किल्ला घेतला व त्यानंतर जावळीचे चंद्रराव मोरे याच्यावर स्वारी केली. तेव्हां चंद्रराव पळून रायरीस ( नंतरचा रायगड किल्ला ) गेला. पुढील वर्षी शिवाजीनें तोही किल्ला घेतला. तेव्हां चंद्रराव शरण आला. (परंतु त्याचे विजापूरच्या दरबारशीं गुप्त बेत चालू असल्याचें उघडकीस आल्यावरून शिवाजीनें त्यास व त्याच्या दोन मुलांस ठार मारलें, व जावळीचा प्रदेश हस्तगत केला.) जावळीच्या पश्चिमेस दोन मैलांवर त्यानें प्रतापगडचा किल्ला बांधला. ह्या किल्ल्यावरून पश्चिमेच्या बाजूला कोंकणचा मोठा प्रदेश दृष्टीच्या टप्प्यांत येतो. येथेंच शिवाजीनें आपली कुलस्वामिनी तुळजापूरची अंबाबाई हिची एक प्रतिमा बसविली व तिच्या दर्शनास तो नित्य जाऊं लागला. अशा रीतीनें राजकीय व धार्मिक हेतु एकत्र करण्यांत त्याचें चातुर्य दिसून येतें.

चंद्रराव मोरे हा जावळी प्रांतांत फार दिवसांचा वजनदार सरदार होता. त्याचा पाडाव झाल्यानें शिवाजीचा सगळीकडे वचक बसला. इ. स. १६५६ त (शिवाजीनें संभाजी मोहिते यास कैद करून सुपें प्रांत काबीज केला व त्याच वर्षी हिरडस मावळच्या बांदल नांवाच्या देशमुखाशीं लढाई करून त्यास ठार मारलें, त्याचा रोहिडा किल्ला सर केला) व त्याचा दिवाण बाजी प्रभु यास शिवाजीनें आपल्या पदरीं ठेवून घेतलें. आतां शिवाजीच्या राज्याचा विस्तार बराच मोठा झाला. त्याच्या ताब्यांत पश्चिमेस चौलपासून राजापुरापर्यंतचा समुद्र किनारा व तेथून पूर्वेस इंदापूरपर्यंतच्या त्रिकोणांतील सर्व प्रदेश म्हणजे हल्लींच्या पुणें जिल्ह्यांतील चाकणपर्यंतचा दक्षिणेकडील अर्धा भाग, सातारा जिल्ह्यांतील पश्चिम व दक्षिणेकडील बहुतेक भाग,

कुलाबा व ठाणें जिल्ह्यांतील कांहीं भाग व उत्तरेकडील रत्नागिरी जिल्हा एवढा प्रदेश आला.

## विजापूरकरांशीं झगडा

**६ विजापुरांतील परिस्थिति :**—शिवाजीचे हे उद्योग चालू असतां मोगल व विजापूरकर यांचा झगडा सुरू झाला. तेव्हां शिवाजीनें आपल्या बाजूस मिळावें अशी दोघांचीही इच्छा होती व औरंगजेबानें त्यास पत्रही लिहिलें. परंतु शिवाजीनें विचारपूर्वक विजापूरकरांस साह्य करण्याचें ठरविलें. कारण औरंगजेबानें विजापूरची सत्ता नष्ट केल्यावर तो आपलाही नाश करण्यास चुकणार नाहीं हें शिवाजी जाणून होता. म्हणून त्यानें औरंगजेब बिदरकडे लढण्यांत गुंतला आहे असें पाहून, मोगलांचें जुन्नर शहर लुटलें. तेव्हां औरंगजेबास फार राग आला व विजापूरचें पारिपत्य होतांच शिवाजीचें पारिपत्य करावयाचें असा त्यानें निश्चय केला. पुढें विजापूरच्या दरबारनें दिल्लीस शहाजहानकडे संधान बांधून तह करून आपली सुटका करून घेतली त्यामुळें शिवाजी उघडा पडला; परंतु सुदैवानें औरंगजेबास ह्या वेळीं दक्षिणेंत राहण्यास फुरसत नव्हती. यामुळें शिवाजीचा बचाव झाला. औरंगजेबाचे हातून आपलें वांकडें होण्याचा संभव नाहीं हें लक्षांत येतांच शिवाजीनें एकदम उलट खाऊन विजापूरकरांवर सूड उगविला. त्यांचा तळ कोंकणांतील कल्याण भिवंडीपासून चौलपर्यंतचा प्रदेश काबीज केला व औरंगजेबाशीं गोडीगुलाबीचें तहाचें बोलणें लाविलें. औरंगजेबानेंही 'चोराच्या हातची लंगोटी' ह्या न्यायानें "हा तळ कोंकणांतील मुलूख मोगलांचा असून त्यांच्या तर्फेनें शिवाजीनें त्याची वहिवाट करावी" असें कबूल करून घेऊन शिवाजीशीं वरपांगीं सख्य केलें व तो उत्तरेस निघून गेला.

**७ प्रतापगडचें युद्ध :**—शिवाजीचे हे उद्योग पाहून त्याच्या बंदोबस्ताकरितां विजापूर दरबारनें अफझलखानाची नेमणूक केली. अफझलखान हा वाईचा सुभेदार असल्यामुळें त्यास तिकडील प्रदेशाची माहिती होती. तो विजापूरकरांच्या दरबारांतील बडा वजनदार सरदार असून त्यानें कर्नाटकांत पुष्कळ लढाया मारलेल्या होत्या. शहाजीचें व त्याचें वांकडें असून इ. स. १६५४ त त्याच्या हातून शहाजीचा वडील मुलगा संभाजी हा कर्नाट-

कांत मारला गेला. 'शिवाजीशीं वरपांगीं नरमाईचें बोलणें करून त्यास जिवंत कैद करून आणावें किंवा ठार मारावें[१]' असा अफझलखानास विजापूर दरबारचा हुकूम होता. ठरल्याप्रमाणें खान उत्तरेस निघाला, निघतांना त्यानें मोरे घराण्यांतील प्रतापरावास बरोबर घेतलें होतें. कारण शिवाजी-पासून जावळी घेऊन तेथें प्रतापरावाची स्थापना करावी म्हणजे जावळी-वरून वाईचें आयतेंच नीट रक्षण होईल, असा खानाचा उद्देश होता. तेव्हां निघतांना (१) शिवाजीस जिवंत पकडावें किंवा मारावें, (२) जावळी घ्यावी व (३) तेथें प्रतापरावाची स्थापना करावी असे त्याचे तीन उद्देश होते. ह्या उद्देशांची भेसळ केल्यानें खानाचें कार्य कठीण झालें. असो. खान जावळीकडे निघाला हें पाहून शिवाजी प्रतापगडीं आला, तेव्हां जावळी आतां छाप्यानें मिळणार नाहीं, त्याकरितां शिवाजीशीं युद्ध किंवा तडजोडीचें बोलणें केलें पाहिजे अशी खानाची खात्री झाली. वाटेनें येत असतां पंढरपुरीं 'क्षेत्रास खाने अजम अफझलखानाची तसवीस लागली' म्हणजे खानानें पंढरपूरच्या मूर्तीस इजा केली. ह्यामुळें लोकांच्या मनांत खानाबद्दल तिरस्कार वाटूं लागला. वाईस येऊन पोहोंचल्यावर खानानें शिवाजीस किल्ले देऊन शरण येण्यास निरोप पाठविला. तो ऐकून शिवाजीनें उलट निरोप पाठविला कीं, 'आपण जावळीस याल तर बरें होईल, आपण मागत आहां ते किल्ले मी देतों. आपण येथें याल तर माझी तरवार मी आपणांपुढें करीन' (शिव-भारत). हा शिवाजीचा निरोप ऐकून खानानें शिवाजीची भेट घेण्याचें ठरविलें व तो जावळीकडे निघाला. जावळीसारख्या मुख्य रस्त्यापासून दूर अशा शिवाजीच्या मुलुखांत आपण होऊन तो गेला ही खानानें दुसरी चूक केली. असो. अफझलखानाची व शिवाजीची भेट प्रतापगडच्या किल्ल्या-वर तारीख १० नोव्हेंबर इ. स. १६५९ रोजीं गुरुवारीं तिसरे प्रहरीं झाली. प्रत्यक्ष भेटीच्या प्रसंगीं महालांत दोघेही सडेच होते. त्या वेळच्या शिरस्त्या-प्रमाणें हात पसरून छातीस छाती लावून भेट घेण्याची वेळ आली. खान हा उंच असल्यामुळें शिवाजीचें शिर त्याच्या खांद्याजवळ आलें, तें त्यानें

१ टीप:—ही माहिती राजापूरच्या व्यापाऱ्यांनीं सुरतेस आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यास लिहिलेल्या पत्रावरून मिळते. हें पत्र १० डिसेंबर इ. स. १६५९ चें म्हणजे खानाच्या वधानंतर एक महिन्यानें लिहिलेलें आहे.

डाव्या बगलेंत दाबून धरलें व आपलें हत्यार शिवाजीच्या कुशींत खुपसण्याचा यत्न केला. परंतु शिवाजीच्या अंगांत चिलखत असल्यानें तो फुकट गेला. हा दगा पाहून शिवाजीनें प्रसंगावधान राखून आपल्या तरवारीचें टोंक खानाच्या पोटांत खुपसलें. खानानें अंगांत फक्त झिरझिरीत सदरा घातला असल्यानें त्या तरवारीचें टोंक पाठीपर्यंत गेलें. त्याबरोबर खान 'दगा' म्हणून मोठ्यानें ओरडला. परंतु शिवाजीनें लागलीच आणखी एक वार करून खानास यमसदनास पाठविलें व ताबडतोब सूचना देऊन आपल्या सैन्यांस खानाच्या सैन्यावर तुटून पडण्याची आज्ञा केली. त्याबरोबर खानाच्या फौजेंत एकच गोंधळ उडून प्रत्येकजण जीव बचावण्यासाठीं वाट फुटेल तिकडे पळूं लागला. या लढाईत विजापूरच्या पक्षाकडील तीन चार हजार लोक ठार झाले असावेत. खानानें येतांना बरोबर पस्तीस हजार फौज आणली होती. एवढ्या मोठ्या तयारीनिशीं आलेल्या सरदाराशीं तोंड देण्याचा शिवाजीवर हा पहिलाच प्रसंग; त्यांतून यश घेऊन बाहेर पडल्यावर शिवाजी समर्थांच्या दर्शनास गेला. तेव्हां त्यांनीं त्यास 'बरें ईश्वर आहे साभिमानी। विशेष तुळजा भवानी। परंतु प्रसंग पाहोनी । कार्य करणें॥' असा गंभीर व अर्थपूर्ण उपदेश केला.

८ **पन्हाळगडचा वेढा** :—पुढील वर्षी शिवाजीनें पन्हाळगड काबीज केला तेव्हां त्याजवर विजापूरच्या दरबारनें रस्तुमजमा ह्यास पाठविलें. त्या वेळीं शिवाजीनें कोल्हापूरच्या लढाईत रस्तुमजमाचा पराभव केला तेव्हां तो पळून गेला. पुढें शिवाजीचा सरदार नेताजी पालकर हा खुद्द विजापूरच्या मुलुखांत शिरून एकामागून एक गांवें घेत सुटला. तेव्हां त्याजवर सिद्दी जोहार नांवाच्या सरदाराची योजना झाली. त्यानें शिवाजीस पन्हाळगडीं पकडलें. तेथेंच शिवाजी पांच महिने अडकून पडला व ह्याच सुमारास उत्तरेस राज्यावर निराळें संकट उपस्थित झालें. औरंगजेब तख्तावर येतांच त्यानें आपला मामा शाइस्तेखान ह्यास दक्षिणेंत पाठवून दिलें व त्यानें शिवाजीचे पुणें, सुपें, इंदापूर, चाकण हे उत्तरेकडील प्रदेश काबीज केले. अशा रीतीनें मोगल व विजापूरकर यांच्याशीं एकाच वेळीं तोंड देण्याची पाळी शिवाजीवर आली. तेव्हां प्रथम त्यानें जोहाराशीं तहाचें बोलणें लाविलें. त्यामुळें जोहाराला शिवाजी शरण येईल असें वाटून त्याचें वेढ्याचें काम

ढिलें पडलें. हें पाहून शिवाजी निवडक लोक बरोबर घेऊन मध्यरात्रीं गडावरून निसटून गेला. ही बातमी जोहारास कळतांच त्यानें शिवाजीवर एकामागून एक सैन्याच्या तुकड्या पाठविल्या. शिवाजी पन्हाळ्याहून नजीकच्या खिंडींतून विशाळगडीं गेला. वाटेंत त्यानें विजापूरच्या सैन्यास थोपवून धरण्याकरितां बाजी देशपांडे याच्या हाताखालीं एक तुकडी ठेविली. ह्या तुकडीनें विजापूरच्या सैन्याचे तीन हल्ले परतवून लाविले. पण पुढें तीस दम निघेना. चौथ्या हल्ल्याच्या वेळीं बाजी देशपांडे ह्यास गोळी लागून तो मरणोन्मुख पडला. इतक्यांत विशाळगडावर शिवाजी पोंचल्याच्या खुणेचे तोफांचे बार त्यास ऐकूं आले तेव्हां 'आतां मी सुखानें मरतों,' असें म्हणून त्या स्वामिभक्त पुरुषानें प्राण सोडला ! विजापूरच्या सैन्यानें विशाळगड काबीज करण्याचा यत्न केला, परंतु तो व्यर्थ गेला. शेवटीं शिवाजी तेथून रायगडीं सुखरूप येऊन पोहोंचला. इकडे पन्हाळ्यावर राहिलेले मराठे किल्ला लढवीतच होते. परंतु शिवाजीनें मोगल व विजापूरकर यांच्याशीं एकदम लढाई करणें जुळणार नाहीं हें ओळखून पन्हाळगड सिद्दी जोहाराच्या हवालीं करून त्याच्याशीं तह केला. पुढें कांहीं दिवसांनीं विजापूर दरबारनें शिवाजीचें वाढतें सामर्थ्य ओळखून सिद्दी जोहाराशीं शिवाजीनें केलेला तह कायम केला (इ. स. १६६२). कारण मोगलांची स्वारी दक्षिणेंत आल्यास तिचा पहिला मारा सहन करण्यास शिवाजी उपयोगी पडेल असें त्यांना आतां वाटूं लागलें.

## मोगलांशीं सामना

९ **शाइस्तेखान** :—सिद्दी जोहाराशीं तह करून तेथून आपली सुटका करून घेतांच शिवाजी उत्तरेस मोगलांकडे वळला. एवढ्या अवकाशांत शाइस्तेखानानें शिवाजीचा पुणें जिल्ह्यांतील उत्तरेकडील प्रदेश काबीज करून तो पुणें येथें राहूं लागला. हा प्रदेश मूळचा विजापूरकरांच्या ताब्यांतील असून त्यांनीं तो मोगलांस देऊन टाकलेला होता. परंतु येथें मोगलांचा अंमल बसण्यापूर्वीच शिवाजीनें तो मधल्यामधेंच लाटलेला होता. तेव्हां शिवाजीनें शाइस्तेखान तो प्रदेश जिंकीत असतां तिकडे दुर्लक्ष केलें. शाइस्तेखानाशीं असें वागण्यांत त्याचे तीन उद्देश होते. (१) तो प्रबळ आहे हें ओळखून त्याच्याशीं

होतां होईतों युद्ध टाळावें, (२) त्यानें आपल्या मुलखास इजा देऊं नये व (३) त्यानें मराठे व विजापूरकर यांच्या भांडणांत पडूं नये. ह्या उद्देशा-प्रमाणें शिवाजी, त्याचे पुणें व चाकण हे प्रांत गेले तरी गप्प बसला. पण पुढें शाइस्तेखानानें कारतलबखानाच्या हाताखालीं सैन्य देऊन कोंकणांतील शिवाजीचा प्रदेश जिंकण्याकरितां पाठविलें. तेव्हां मात्र शिवाजीनें युद्धाची तयारी केली. त्याच्या मराठी फौजांनीं कारतलबखानास लोहगड नजीकच्या उंबरखिडींत गांठून सर्व सैन्य गारद करण्याची वेळ आणली, तेव्हां कारतलब-खान शरण आला. तें पाहून शिवाजीनें फक्त खंडणी घेऊन उदार मनानें सर्व सैन्यास परत जाऊं दिलें. ह्या प्रसंगामुळें शिवाजीचा आपल्या मुलुखाचा बंदोबस्त पक्का आहे हें ओळखून, शाइस्तेखानानें यापुढें शिवाजीस त्रास दिला नाहीं.

जवळजवळ दोन वर्षें (इ. स. १६६१–६३) शाइस्तेखान पुण्यांत स्वस्थ होता. तेवढ्यांत शिवाजीनें राजापूर येथें इंग्रजांच्या वखारीवर हल्ला करून खंडणी वसूल केली. कारण त्यांनीं पन्हाळगडच्या वेढ्यांत सिद्दी जोहाराला दारूगोळा पुरविला होता. तेथून परत आल्यावर शिवाजीनें एक धाडशी बेत मनाशीं ठरविला. ता. ५ एप्रिल १६६३ रोजीं तो निवडक लोक बरोबर घेऊन पुण्याकडे निघाला व मोगल शिपायांनीं ओळखूं नये म्हणून त्याचे लोक फुटून लग्नाच्या मिरवणुकींत सामील झाले व गांवांत शिरले. खान शिवा-जीच्या वाड्यांत राहात होता. रात्रीच्या सुमारास मागील बाजूनें भिंत पाडून शिवाजी वाड्यांत शिरला व थेट खानाच्या महालांत जाऊन उभा राहिला. खान त्यास पाहतांच घाबरून जनानखान्यांत शिरला. इतक्यांत एका चाणाक्ष स्त्रीनें सर्व दिवे मालविले, त्याबरोबर खान खिडकींतून निसटला. पण शिवाजीनें तरवारीनें त्याचीं बोटें छाटलीं. त्याचा मुलगा मात्र मारला गेला. ह्यापुढें मोगल सैन्य सावध होऊन आपला पाठलाग करूं लागेल हें शिवाजीस माहीत होतें. त्यास चुकविण्याकरितां शिवाजीनें आगाऊ योजना करून ठेविली होती. त्यानें कात्रजच्या घाटांत बैलांच्या शिंगांस पोत बांधून उजेड करविला व आपण अंधारांत सिंहगडच्या वाटेनें निघून गेला. तेव्हां मोगली सैन्य शिवाजीस पकडण्याकरितां कात्रजच्या दिशेनें धांव घेऊं लागलें. सकाळ उजाडेपर्यंत आपण रस्ता चुकलों हें मोगलांस कळलें नाहीं.

आपली चूक लक्षांत आल्यावर सकाळीं मोगल सिंहगडाकडे गेले. तेव्हां शिवाजीनें गडावरून तोफांचा मारा केला. त्यामुळें मोगली सैन्यास धीर न निघून तें परत फिरलें. शाइस्तेखान तर जीव बचावण्यासाठीं औरंगाबादेस निघून गेला. शाइस्तेखान ह्या खुद्द औरंगजेबाचा मामा व मोगलांचा बडा सरदार त्याचा शिवाजीनें पराभव केला. हें पाहून औरंगजेबाचा खानावर रोष झाला व त्यानें त्याची बंगालकडे बदली केली.

**१० सुरतेवर हल्ला**:—शाइस्तेखानाच्या पराभवामुळें शिवाजीचा चोहीकडे विलक्षण दरारा बसला. तो केव्हां कोठें उत्पन्न होईल याची त्याच्या शत्रूंस भीति वाटूं लागली. शाइस्तेखान गेल्यावर मोगलांची विशेष हालचाल नव्हती म्हणून शिवाजीस अवधि मिळाला. तेवढ्यांत त्यानें सुरतेवर हल्ला केला व चार दिवस तें शहर लुटलें. तेथील मोगल अधिकाऱ्यानें शहराचें रक्षण करण्याची कांहींच तजवीज केली नाहीं. इंग्रज व्यापाऱ्यांनीं मात्र, आपल्या दोनशें लोकांनिशीं आपल्या वखारीचें धैर्यानें रक्षण केलें. शिवाजीला खुद्द सुरत शहरांत इतकी लूट सांपडली कीं, इंग्रजांशीं लढून प्राणहानि करून घेऊन आणखी लूट मिळविण्याची त्याची इच्छा नव्हती.

**११ शिवाजीस आग्रा येथें कैद**:—इ. स. १६६५ च्या प्रारंभीं औरंगजेबानें जयसिंग व दिलेरखान ह्या सरदारास शिवाजीवर पाठविलें. जयसिग हा वृद्ध व अनुभवी सेनापति मोगलांच्या पदरीं इ. स. १६१७ पासून होता. त्यानें मोहिमेचीं सर्व सूत्रें आपल्या हातीं घेऊन काम चालविलें व पुरंदरास वेढा घातला. दिलेरखानही त्याच्याच बरोबर होता. पुरंदरच्या किल्ल्यावर मुरारबाजी देशपांडे महाडकर हा होता. त्यानें आपल्या सातशें लोकांनिशीं दिलेरखानाच्या फौजेवर तुटून हल्ला केला. या लढाईंत मोगलांचें पुष्कळ नुकसान झालें, पण शूर मुरारबाजी लढतां लढतां रणांगणावर पडला, परंतु किल्ल्यावरील लोकांनीं धीर सोडला नाहीं. 'एक मुरारबाजी पडला म्हणून काय झालें, आम्हीही तसेंच लढूं' असा त्यांनीं निश्चय केला. पण मराठ्यांचा या वेळीं निभाव लागणें शक्य नव्हतें. कारण जयसिंगानें सर्व बाजूंनीं अगदीं नाकेबंदी केलेली होती. ही स्थिति पाहून शिवाजी दूरवर विचार करून जयसिंगाच्या भेटीस गेला व त्यानें "तेवीस किल्ले मोगलांच्या हवालीं करतों, फक्त बारा किल्ले मजकडे ठेवावे; ते सांभाळून मी मोगलांना विजापूरकरांच्या

सुलतानाशीं लढण्यास मदत करीन; आदिलशहाचा पन्हाळगडाकडील मुलूख जिकण्यास व तो माझ्या ताब्यांत ठेवण्यास परवानगी दिल्यास मी मोगलांस चाळीस लक्ष होन देण्यास तयार आहें " अशा प्रकारचें बोलणें लाविलें. जयसिंगास हा तह सर्व दृष्टींनीं फायदेशीर वाटत होता. डोंगराळ मुलुखांत लढाई चालविण्याचा त्याचा खटाटोप वाचला, पुढील मोहिमेसाठीं पैसे मिळाले आणि शिवाजी व विजापूरकर यांच्यांत भांडण लावून दिल्यामुळें ते मोगलांविरुद्ध एक होण्याची धास्ती राहिली नाहीं. तेव्हां जयसिंगानें तहाच्या या अटी एकदम मान्य केल्या. ठरल्याप्रमाणें शिवाजीनें मोगलांस विजापूरकरांशीं लढण्यास मदत केली व पन्हाळगडास वेढा घातला. परंतु तरीसुद्धां जयसिंगास वाटलें कीं, विजापूरकरांशीं युद्ध चालू असतां शिवाजी नसेल तर बरा. म्हणून त्यानें आग्र्यास बादशहाची समक्ष भेट घेण्याविषयीं शिवाजीचें मन वळविलें. शिवाजीलाही एकवार उत्तरेंतील स्थिति प्रत्यक्ष पाहण्याची उत्कंठा होती. तेव्हां त्यानें त्याचें म्हणणें मान्य केलें. मात्र स्वतःच्या सुरक्षितपणाची त्याजपासून हमी घेतली. ठरल्याप्रमाणें शिवाजी आपला पुत्र संभाजी ह्यास बरोबर घेऊन आग्र्यास निघाला (इ. स.१६६६). ता. १२ मे रोजी चांद्रमानाप्रमाणें औरंगजेबाच्या ५० व्या वाढदिवसानिमित्त दरबार होता, तेव्हां शिवाजीची बादशहाशीं भेट होण्याचें ठरलें. ठराविक वेळीं जयसिंगाचा मुलगा रामसिंग यानें शिवाजीस पुढें केलें. शिवाजीनें बादशहापुढें नजराणा ठेवून त्यास सलाम केला. तेव्हां बादशहानें त्यास तिसऱ्या प्रतीच्या सरदारांत उभें केलें. हा प्रकार पाहतांच शिवाजीस संताप आला व त्यानें मोठमोठ्यानें रामसिंगाशीं बोलणें सुरू केलें कीं, 'हा अपमान सहन करून घेण्यास मी येथें आलों नाहीं!' पुढें तर त्याचा संताप अनावर होऊन तो बेशुद्ध पडला. ती स्थिति पाहतांच दरबारांत गडबड झाली. तेव्हां दरबार घाईघाईनें बरखास्त झाला. पुढें रामसिंगानें त्यास दरबारांतून एकीकडे नेलें. बादशहास एकंदर प्रकार कळतांच त्यानें शिवाजीस कैदेंत टाकलें.

**१२ युक्तीनें सुटका :**—शिवाजीनें खुद्द आग्र्यासारख्या बादशाही **कडेकोट बंदोबस्ताच्या शहरांतून कशी सुटका करून घेतली ती हकीकत कादंबरीप्रमाणें अद्भूत आहे. त्यानें आपल्याबरोबर आणलेलें सैन्य दक्षिणेंत**

पाठवून देण्याची परवानगी मागितली. बादशहानें ती मोठ्या खुषीनें दिली. पुढें त्यानें अगदीं शरण असल्याचें दाखवून दरबारच्या सरदारांस व ब्राह्मणांस मेवामिठाईचे पेटारे नजराणे म्हणून तो पाठवूं लागला. प्रथम प्रथम पहारेकरी ते तपाशीत असत, पण त्यांत मिठाईच असते ह्याची खात्री पटल्यावर ते तिकडे दुर्लक्ष करूं लागले. नंतर शिवाजीनें आजारी असल्याचें सोंग केलें व ठराविक दिवशीं एका पेटाऱ्यांत आपण व दुसऱ्या पेटाऱ्यांत संभाजीस बसवून आपल्या बिछान्यावर हिरोजी फर्जद यास पांघरूण घेऊन निजवून ठेविलें व आपण तेथून निसटला! थोड्या वेळानें हिरोजीही पहारेकऱ्यांस 'महाराज निजले आहेत, गडबड करूं नका' असें बजावून निघून गेला. पेटारे आग्ऱ्याबाहेर आल्यावर तेथें दोन घोडे तयार होते. त्यांवर बसून शिवाजी व संभाजी दोघेही पसार झाले. कांहीं वेळानंतर पहारेकरी आंत पाहतात तों काय? शिवाजी निसटला! लागलीच औरंगजेबानें चोहोंकडे त्याचा पाठलाग चालविला. परंतु शिवाजी हातीं लागला नाहीं. तो दक्षिणेंत जाण्याचा सरळ रस्ता टाकून प्रथम उत्तरेस निघून पूर्वेच्या बाजूनें वळसा घेऊन, मथुरा, काशी, गया, जगन्नाथपुरी, गोंडवण, हैद्राबाद या मार्गानें संन्याशाच्या वेषानें रायगडास परत आला (डिसेंबर १६६६). तो सुमारें १० महिने आपल्या राज्याच्या बाहेर होता. परंतु त्या काळांत त्याच्या लोकांनीं योग्य बंदोबस्त ठेविला होता. राजमाता जिजाबाई व पेशवे मोरोपंत पिंगळे हे मोठ्या हुषारीनें सर्वांवर देखरेख ठेवीत होते.

**१३ परस्परांचे डावपेंच :**—उत्तरेंतून परत आल्यावर शिवाजीस आपल्या मुलुखाची व्यवस्था लावण्याकरितां कांहीं वर्षें स्वस्थतेचीं हवीं होतीं. म्हणून त्यानें औरंगजेबाचा मुलगा मुअज्जम दक्षिणेंत होता, त्याजकडे आपण होऊन तहाचें बोलणें लाविलें. शिवाजी हातचा निसटून गेलाच होता, तेव्हां त्यानें होऊन तहाची मागणी केली ती औरंगजेबानें मान्य केली. त्यानें शिवाजीची राजा ही पदवी मान्य केली. त्यास वऱ्हाड प्रांतांत जहागीर दिली. त्याच्या मुलास पंचहजारी सरदारांत दाखल केलें व शिवाजीचा सेनापति प्रतापराव गुजर ह्याच्या हाताखालीं शिवाजीचें १००० सैन्य मोगलांच्या चाकरीस औरंगाबाद येथें राहूं लागलें. अशा प्रकारें तह झाला खरा; परंतु तो फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. कारण औरंगजेबास पुढें संशय पडला कीं, न जाणो

आपला मुलगा मुअज्जम व शिवाजी हे एक होऊन आपल्याच विरुद्ध उलटतील. म्हणून त्यानें कुरापत काढण्याकरितां मोगल सैन्यास शिवाजीच्या जहागिरीवर हल्ला करण्यास हुकूम केला (इ. स. १६६९). त्याबरोबर शिवाजीनें आपलें सैन्य औरंगाबादेहून बोलाविलें व आपले गेलेले चोवीस किल्ले मोगलांपासून परत मिळविण्याच्या उद्योगास तो झपाट्यानें लागला.

**१४ सिंहगडावर हल्ला:**—ह्या सर्व किल्ल्यांत कोंडाणा ऊर्फ सिंहगड[१] किल्ला फार महत्त्वाचा व जिंकण्यास अवघड असा होता. येथें उदयभानु नांवाचा रजपूत सरदार त्याची राखण करीत असे. हा किल्ला जिंकण्याच्या कामगिरीवर तानाजी मालुसरे याची नेमणूक झाली. तो, शेलारमामा व त्याचा भाऊ सूर्याजी यांस घेऊन, निवडक मावळ्यांसह तिकडे निघाला. माघ वद्य नवमीच्या रात्रीं किल्ल्याच्या अवघड बाजूनें आपण घोरपड लावून दोरानें वर चढला व दुसऱ्या बाजूनें शेलारमामास व सूर्याजीस कल्याण दरवाज्यानें वर येण्यास सांगितलें. मावळे तटावर चढतांच गडबड उडाली व लढाईची एकच धुमश्चक्री झाली. खुद्द तानाजी व उदयभानु यांचें निकराचें द्वंदयुद्ध होऊन दोघेही गतप्राण झाले. एवढ्या अवकाशांत सूर्याजी कल्याण दरवाज्यानें वर येऊन पोहोंचला. तानाजी पडला हें पाहतांच मावळें धीर खचून पळूं लागले. परंतु सूर्याजीनें वीरश्रीयुक्त भाषण करून त्यांस मागें फिरविलें व शेवटीं रजपुतांचा मोड करून गड सर केला.

**१५ साल्हेरचें युद्ध:**—सिंहगडप्रमाणें लवकरच पुरंदरचा किल्लाही सर झाला व त्यानंतर कल्याण, भिवंडी, कोंकण, माहुली हीं ठिकाणें त्यानें हस्तगत केलीं. सुरतेस जाऊन दुसऱ्यांदा तें शहर लुटलें. शिवाजीचे हे उद्योग चालू असतां मोगल सरदार दिलेरखान व राजपुत्र मुअज्जम यांचीं आपसांत भांडणें चालूं होतीं. तेव्हां शिवाजीच्या लोकांस अवसान चढून त्यांनीं आतां मोगल फौजेवर हल्ले करण्यास सुरवात केली व ते मोगल मुलुखांत शिरले. नाशिक जिल्ह्यांत शिरून त्यांनीं वणी, दिंडोरी येथें मोगल सरदार दाऊदखान याचा पराभव केला. थेट वऱ्हाडापर्यंत मुलुखगिरी केली व तिकडील

१ **टीप:**—तानाजीसारखा 'सिंह' पडून गड सर झाला म्हणून त्यास 'सिंहगड' हें नांव पडलें, अशी आख्यायिका आहे ती खरी नाहीं. कारण कोंडाण्यास सिंहगड हें नांव इ. स. १६७० च्या पूर्वीच्या कागदपत्रांतही सांपडतें.

कारंजा हें शहर लुटलें. इ. स. १६७२ त मोगल व मराठी फौजेचें नाशिक जिल्ह्यांत साल्हेर येथें घनघोर युद्ध झालें व मोगल फौजेचा जंगी पराभव झाला. मराठे हे अशानें आटपत नाहींत हें पाहून बहादूरखान यानें भीमेच्या कांठीं पेडगांव येथें खुद्द शिवाजीच्या मुलुखांत तळ दिला. तेव्हां कोठें त्याच्या हालचालींस अंमळ पायबंद बसला. मोगल मुलुखांत हालचाल करितां येत नाहीं असें पाहतांच शिवाजी दक्षिणेस विजापूरकरांकडे वळला. लवकरच त्यानें साताऱ्यापासून पन्हाळगडापर्यंत बहुतेक महत्त्वाचीं ठिकाणें घेतलीं. इ. स. १६७३ त शिवाजीचा सरदार प्रतापराव गुजर यानें हुबळी हें महत्त्वाचें व्यापारी शहर लुटलें. शिवाजीनें तर थेट कर्नाटकापर्यंत लूट केली.

## राज्यस्थापना

**१६ राज्याभिषेक :**—याप्रमाणें मोगल व विजापूरकर ह्या दोघांच्याही हल्ल्यांपासून आपलें स्वराज्य सोडवून त्यांचा बराचसा मुलूख काबीज केल्यावर शिवाजीनें स्वतःस राज्याभिषेक करवून घेण्याचा निश्चय केला. ह्याचीं कारणें मुख्यतः तीन होतीं. (१) शिवाजीनें मोगल व विजापूरकर यांविरुद्ध अनेक विजय मिळविले, तरी ते त्यास स्वतंत्र राजा म्हणून मानीत नसत, तेव्हां स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व एकवार समारंभानें जाहीर करावयाचें. (२) शिवाजीच्या पदरीं कित्येक जाधव, घाटगे, माने, निंबाळकर यांच्यासारखे जुने सरदार असत, ते पूर्वीं निजामशाहींत व आदिलशाहींत वाढलेले होते. शिवाजीही प्रारंभीं अशाच एका सरदाराचा मुलगा होता, तेव्हां तें जुनें नातें लक्षांत घेऊन हे सरदार शिवाजीशीं बरोबरीच्या नात्यानें वागण्याचा आव आणीत. त्यांनाही शिवाजीला एकवार आपलें वरिष्ठपण जाहीर करणें जरूर होतें. व (३) आपण स्थापन केलेलें राज्य हें एका मराठे सरदारानें स्वतःसाठीं कमाविलेलें राज्य नसून तें गोब्राह्मणांच्या प्रतिपालनाकरितां स्थापन झालेलें 'हिंदवी स्वराज्य' आहे हें जगास व आपल्या लोकांस जाहीर व्हावें.

**१७ समारंभाचें वर्णन :**—ह्या उद्देशाप्रमाणें त्यानें आपल्या राज्याभिषेकाची तयारी केली. त्याकरितां त्यानें रायगड हें ठिकाण पसंत केलें व तेथेंच पुढें आपली राजधानी स्थापिली. याकरितां काशीहून गागाभट्ट

नांवाचा विद्वान् ब्राह्मण बोलावून आणला व समारंभास सुरवात झाली. प्रथम त्याचा व्रतबंध झाला. त्यानंतर ज्येष्ठ शु. १३ शके १५९६ (ता. ६ जून इ. स. १६७४) रोजीं राज्याभिषेक समारंभ झाला. ह्या दिवशीं रायगडावर गडबड उडून गेली होती. ठिकठिकाणचे लोक हजर होते. इंग्रजातर्फे ऑक्झेंडन हजर होता. प्रातःकाळीं शिवाजी स्त्रीपुत्रांसह मंगलस्नान करून आसनावर विराजमान झाला. शेजारीं राणी सोयराबाई ही पटबंधन करून बसली व मागें राजपुत्र संभाजी स्थानापन्न झाला. अष्टप्रधान निरनिराळ्या अभिषेकद्रव्यांनीं युक्त कलश हातीं घेऊन भोंवतीं अष्ट दिशांस उभे राहिले. मध्यें वैदिक ब्राह्मण महानद्यांचें व समुद्राचें उदक घेऊन उभे होते. त्यांनीं मंत्र म्हणण्यास सुरवात केली व समोर आसनावर बसलेल्या मंडळीवर त्याचा अभिषेक केला. त्यानंतर शिवाजी सिंहासनावर आरूढ झाला. त्या वेळीं वाद्यांचा गजर झाला. कित्येक शतकांत असा आनंदाचा दिवस महाराष्ट्रांत उगवला नव्हता. महाराष्ट्रांतील आबालवृद्धांना ह्या समारंभानें धन्य धन्य वाटलें. ह्या समारंभास एकंदर १० लक्ष होन किंवा ५० लक्ष रुपये खर्च झाला.

**१८ महत्त्वाचीं कृत्यें**:—समारंभानिमित्त शिवाजीनें कित्येक महत्त्वाच्या गोष्टी केल्या. (१) स्वतःस 'क्षत्रियकुलावतंस शिवछत्रपती महाराज सिंहासनाधीश्वर' असा किताब घेतला. (२) ह्या दिवसापासून 'राज्याभिषेक शक' नांवाचा नवीन शक सुरू झाला; व (३) संस्कृत ग्रंथांतून सांगितलेल्या तत्त्वानुसार त्यानें अष्टप्रधानांची योजना केली. हा राज्याभिषेक समारंभ पाहण्यास जिजाबाई हजर होती, तिला तो समारंभ पाहून किती आनंद झाला असेल याची कल्पनाच केली पाहिजे. ह्या समारंभानंतर १२ दिवसांनीं ती मृत्यु पावली.

## दक्षिणच्या सत्ताधीशांशीं सख्य

**१९ कर्नाटकावर स्वारी**:—राज्याभिषेक समारंभ झाल्यानंतर भीमेच्या कांठीं छावणी देऊन त्यानें कर्नाटकावर स्वारी करण्याचा विचार केला. शहाजी मृत्यु पावल्यापासून त्याच्या ताब्यांतील कर्नाटकांतील मुलुखाचा कारभार शिवाजीचा धाकटा भाऊ एकोजी ऊर्फ व्यंकोजी

तंजावरास राहून पाहत असे. त्याच्या पदरीं रघुनाथपंत हणमंते हा वृद्ध, अनुभवी कारभारी होता. त्यास व्यंकोजीचें धोरण आवडत नसे. एके प्रसंगीं त्याचें व व्यंकोजीचें भांडण होऊन तो व्यंकोजीच्या दरबारास रामराम ठोकून उत्तरेकडे निघाला. वाटेंत हैद्राबाद येथें कुतुबशहाच्या दरबारीं तेथील मुख्य प्रधान मादण्णा ऊर्फ मदनपंत हा त्यास भेटला. दोघेही उत्तम संस्कृत पंडित असल्यानें त्यांची मैत्री जमली. मादण्णाच्या मध्यस्थीनें रघुनाथपंतांनीं कुतुबशहाची भेट घेतली. कुतुबशहास मोगलांविरुद्ध शिवाजीची मदत मिळावी अशी फार अपेक्षा होती, तेव्हां रघुनाथपंतानें शिवाजीचें व कुतुबशहाचें सख्य जुळवून देण्याचें कबूल केलें व तो शिवाजीच्या दरबारीं आला. तेथें त्यानें कुतुबशहाची मदत घेऊन कर्नाटकावर स्वारी करण्याचा महत्त्वाकांक्षी ेत शिवाजीस सुचविला व शिवाजीसही तो फार पसंत पडला. कर्नाटकांत आदिलशाही सरदारांतील दुफळीचा फायदा घेऊन तेथील विजापूरची सत्ता कमी करावी व आपलें वर्चस्व प्रस्थापित करावें, कारण न जाणो मोगलांचें मोठें सैन्य येऊन त्यांनीं महाराष्ट्रांतील सगळ्याच मराठी राज्याचा घास गिळला, तर प्रसंगीं तिकडे जातां यावें; व्यंकोजीशीं सख्य करावें व तें न जमल्यास त्याच्याशीं युद्ध करून वडिलांच्या जहागिरीचा अर्धा हिस्सा घ्यावा, इत्यादि कल्पना शिवाजीच्या दूरदर्शी डोळ्यांपुढें होत्या. प्रो. सरकार म्हणतात त्याप्रमाणें कर्नाटकांतील स्वारींतून लूट आणावी असाच केवळ उद्देश होता असें त्याच्या तिकडील उद्योगावरून दिसत नाहीं. असो. ठरल्याप्रमाणें शिवाजी हैद्राबादकडे निघाला. तेथें त्याचें फार चांगलें स्वागत झालें. शिवाजीनें मोगलांच्या हल्ल्यांपासून कुतुबशाहीचें रक्षण करण्याचें कबूल केलें; व कुतुबशहानें शिवाजीस कर्नाटकांतील स्वारीकरितां तोफा व पैसा पुरविण्याचें कबूल केलें. तेथून तो पूर्व कर्नाटकांत शिरला. जिंजीचें ठिकाण घेतलें व वेलोरला वेढा घातला. त्यानंतर त्यानें पश्चिमेकडे वळून बंगळूरच्या आसपासचा मुलुख काबीज केला व व्यंकोजीकडे जाण्यास निघाला. व्यंकोजीनें शिवाजीशीं सामोपचारानें वागण्याचें सोडून देऊन मुसलमान सरदाराची मदत घेऊन तंजावरनजीक शिवाजीचा सरदार हंबीरराव मोहिते याजवर छापा घातला. परंतु हंबीररावानें तो परतवून लावला व व्यंकोजीचा चांगलाच पराभव केला.

ही बातमी शिवाजीस कळतांच त्यास फार वाईट वाटलें. त्यानें व्यंकोजीची भेट घेऊन त्यास स्वराज्याची कल्पना समजावून सांगितली व त्यास त्याच्या जहागिरीवर कायम केलें आणि परत उत्तरेकडे निघाला. अवघ्या दीड वर्षांत त्यानें आपल्या राज्यापासून ७०० मैल दूर असें दुसरें एक मोठें राज्य कमाविलें.

२० विजापूरकरांस साह्य:—ह्या सुमारास त्यास आणखी एक कामगिरी उत्पन्न झाली. बहादूरखानाच्या हातून म्हणण्यासारखी कामगिरी झाली नाहीं, हें पाहून औरंगजेबानें पुनः मुअज्जम व दिलेरखान यांची नेमणूक केली. त्यांनीं शिवाजीचा नाद सोडून देऊन विजापूरकरांवर हल्ला करावयाचें ठरविलें. तेथील कारभार अगदीं वाईट स्थितीस येऊन पोहोंचला होता. शिवाजीनें नुकताच बराच मोठा प्रदेश काबीज केला होता. इतक्यांत दिलेरखानाची धाड आली. दरबारीं तर कोणाचा पायपोस कोणाच्या पायीं नव्हता. शेवटीं तेथील मुख्य प्रधान सिद्दी मसाऊद यानें मोठ्या काकुळतीनें शिवाजीस साह्यास बोलाविलें. तेव्हां शिवाजीनें विजापूरकरांस मदत करण्याचें ठरविलें, ह्याच सुमारास शिवाजीचा थोरला मुलगा संभाजी हा बंड करून दिलेरखानास जाऊन मिळाला होता. परंतु लवकरच संभाजीचें मोगलांशीं न पटून तो बापाकडे आला, तेव्हां शिवाजीनें त्यास शिक्षा म्हणून पन्हाळगडीं कैद केलें. या प्रसंगीं दिलेरखानास शिवाजीनें अगदीं हैराण करून सोडलें. तेव्हां तो औरंगाबादकडे पळून गेला. शिवाजीच्या या कामगिरीबद्दल विजापूर दरबारनें व्यंकोजीवरील आपले सर्व हक्क सोडून दिले आणि कृष्णा नदीपासून तंजावरपर्यंत त्यानें जिंकलेल्या सर्व प्रदेशावरील त्याची मालकी मान्य केली. त्याच्या आयुष्यांतील हें शेवटचेंच महत्त्वाचें कृत्य होय.

२१ मृत्यु:—यानंतर शिवाजी आजारी पडून ५ एप्रिल इ. स. १६८० चैत्र शुद्ध १५ शके १६०२ रोजीं रविवारीं दुपारीं मृत्यु पावला. त्यास नुकतेंच ५१ वें वर्ष लागलें होतें. त्याच्या मृत्युसमयीं त्याच्या ताब्यांत दमणपासून गोंव्यापर्यंत पश्चिम किनारा व पूर्वेकडे पन्हाळगड, सातारा, इंदापूर, चाकण इत्यादि ठिकाणांवरून जाणारी वाकडीतिकडी रेषा यांनीं मर्यादित असा प्रदेश होता. त्याची उत्तरदक्षिण लांबी ७०० मैल असून पूर्वपश्चिम

रुंदी १५० मैल होती. याखेरीज त्यानें कर्नाटकांत काबीज केलेले कोपळ, बल्लारी, वेलोर, जिंजी हेही प्रदेश त्याच्या ताब्यांत होते, पण त्याचा पुरता बंदोबस्त त्याच्या हातून झाला नाहीं.

**२२ शिवाजीचें कुटुंब** :—शिवाजीस आठ बायका होत्या. पैकीं वडील सईबाई ही निंबाळकरांची कन्या. हिलाच इ. स. १६५७ त संभाजी हा पुत्र झाला. शिवाजीची दुसरी बायको मोहित्यांची कन्या पुतळाबाई. ही शिवाजी-बरोबर सती गेली. शिवाजीची तिसरी बायको शिर्के घराण्यांतील मुलगी सोयराबाई ही होय. हिला इ. स. १६६१ त राजाराम नांवाचा मुलगा झाला. शिवाजीस सखूबाई नांवाची एक मुलगी होती, तीस त्यानें बजाजी निंबाळ-कराचा मुलगा महादजी निंबाळकर ह्यास दिली होती. बजाजी हा आपल्या वतनाच्या रक्षणासाठीं एक वेळ मुसलमान झाला होता. त्यास पश्चात्ताप होऊन स्वधर्मांत येण्याची इच्छा झाली. तेव्हां शिवाजीची आई जिजाबाई हिनें "जातगंगा" बोलावून त्यास शुद्ध करून घेतलें व त्याच्या मुलास आपल्या मुलाची मुलगी देवविली. तत्कालीन हिंदु समाजाची ही व्यापक दृष्टि लक्षांत ठवण्याजोगी आहे.

## राज्यव्यवस्था

**२३ राज्याचें संरक्षण** :—(१) **किल्ले**—राज्याच्या संरक्षणासाठीं शिवा-जीस किल्ल्यांचा फार उपयोग होई. त्याच्या राज्यांत तीनशेंहून अधिक किल्ले होते. त्यावर मराठा किल्लेदार, प्रभू कारखानीस व ब्राह्मण सबनीस असे. सबनीस लिहिण्याचें काम करी व कारखानीस किल्ल्यावरील धान्य, दारूगोळा, शिबंदी ह्यांच्याकडे लक्ष ठेवी.

(२) **लष्कर**—प्रारंभीं डोंगराळ मुलुखांत लढण्याकरितां त्याच्या-जवळ पायदळाचा भरणा असे. पुढें 'मुलुखगिरी' सुरू झाल्यावर घोडेस्वारां-चाही भरणा झाला. पायदळांत कोंकणांतील हेटकरी व घाटमाथ्यावरील मावळ्यांचा भरणा होता. घोडेस्वारांत शिलेदार व बारगीर असे दोन प्रकार होते. शिलेदार हे स्वतःचीं घोडीं व हत्यारें घेऊन चाकरीस येत व बारगिरास हे जिन्नस सरकारांतून मिळत. शिवाजीच्या पदरीं त्याच्या

मृत्युसमयीं एक लक्ष पायदळ व साठ हजार घोडेस्वार होते. सैन्यांतील शिस्त कडक असून तेथें बायकांस नेण्याची सक्त मनाई होती.

(३) **आरमार**—शिवाजीच्या अनेकविध उद्योगांतूनही त्याचें आरमाराकडे दुर्लक्ष झालें नाहीं. कोंकण प्रांतांत त्याची पहिली मोहीम इ. स. १६५७ त झाली. त्या वेळीं त्यानें कोंकणपट्टीवरील अनेक किल्ले काबीज करून राजापुरापर्यंत लूट केली. कोंकणांत त्या वेळीं सिद्दी[१] लोकांचा अंमल होता. त्यांच्या ताब्यांत पश्चिमेकडील समुद्रकिनारा असे व तेथें ते आदिलशहाच्या वतीनें राज्यकारभार पाहत असत. शिवाजीनें प्रथम जमिनीच्या बाजूनें सिद्द्यांच्या ताब्यांत असलेलीं बहुतेक ठिकाणें काबीज केलीं. दंडा-राजपुरी हें मोठें तटबंदीचें ठिकाण, राघो बल्लाळ अत्रे यानें इ. स. १६५९ मध्यें घेतलें. सिद्द्यांच्या ताब्यांत फक्त जंजिऱ्याचा बळकट किल्ला तेवढा राहिला. त्यावर हल्ला करण्यापूर्वी शिवाजीनें आपलें आरमार तयार केलें. "लवकरच राजियांनी जहाजें पाणियांतील सजिलीं. गुराबा व तरांडी, तारवे व गलबतें, शिवाडे, पगार अशी नाना जातीचीं जहाजें केलीं." सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग इत्यादि जुने किल्ले दुरुस्त केले. मालवण येथें सिधुदुर्ग नांवाचा बळकट किल्ला बांधला. आरमारावर कोळी, भंडारी व कांहीं मुसलमान लोकांची भरती केली. दर्यासागर व मायनाक भंडारी आरमाराचे मुख्य अधिकारी असत. पुढें प्रसिद्धीस आलेला कान्होजी आंग्रे हा त्या वेळीं आरमारांत लहानशा अधिकारावर होता.

अशी तयारी करून इ. स. १६७० त शिवाजीनें जंजिऱ्यावर जमिनीवरून व पाण्यांतून निकराचा हल्ला चढविला. शेवटीं सिद्द्यानें सुरत येथील मोगल अधिकाऱ्यांस मदतीस बोलाविलें. व यापुढें आपण मोगलांचे नोकर आहोंत असें कबूल केलें. तेव्हां मोगल सुभेदाराची त्यास मोठी मदत मिळाली. त्यामुळें मराठ्यांस जंजिऱ्याचा वेढा उठविणें भाग पडलें. मोगलांची मदत मिळाल्यापासून सिद्दी अधिक धीट झाले. ते इंग्रजांच्या मुंबई बेटांत उतरून मराठ्यांच्या मुलुखांत लुटालूट करीत. त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां मराठ्यांनीं मुंबईच्या तोंडावर असलेलीं खांदेरी व उंदेरी हीं बेटें ताब्यांत

---

१ टीप:—सिद्दी हा सय्यद शब्दाचा अपभ्रंश असावा.

घेऊन त्यांची तटबंदी करण्याचा विचार चालविला. खांदेरीची तटबंदी चालू असतां इंग्रजांनीं मराठ्यांस विरोध केला; तेव्हां मराठी आरमारास इंग्रजाविरुद्ध लढावें लागलें (इ. स. १६७८). पण पुढें इंग्रजांनीं आपण होऊनच युद्ध आवरतें घेऊन मराठ्यांशीं तह केला. खांदेरीची तटबंदी होत असतांना सिद्द्यानें शेजारचें उंदेरीचें ठिकाण आपल्या ताब्यांत घेतलें. यामुळें मराठ्यांस सिद्दी व इंग्रज यांच्या उद्योगास वेळींच पायबंद घालतां आला नाहीं. पुढें कान्होजी आंग्र्यानें सिद्द्यांचा मोड करून त्यास मराठ्यांस खंडणी द्यावयास लाविलें.

**२४ राज्यव्यवस्था:**—शिवाजीनें स्थापन केलेली अष्टप्रधानांची पद्धत पुढीलप्रमाणें होती.

| संकृत नांव | उर्दू | काम |
|---|---|---|
| १. पंतप्रधान | पेशवा | मुख्य प्रधानकी; छत्रपतीच्या गैरहजेरींत मुख्य अधिकारी. |
| २. पंत अमात्य | मुजुमदार | वसूल व हिशेब. |
| ३. पंतसचिव | सुरनीस | दप्तराचा सभाळ. |
| ४. मंत्री | वाकनीस | खाजगी कारभारी. |
| ५. सेनापति | सरनोबत | लष्करावरचा मुख्य. |
| ६. सुमंत | डबीर | परराज्यांशीं व्यवहार. |
| ७. न्यायाधीश | | न्यायखात्याचा मुख्य. |
| ८. पंडितराव | | धर्मखात्याचा मुख्य. |

ह्यांपैकीं न्यायाधीश व पंडितराव हे युद्धनिपुण नसत. बाकीच्या सर्वांस प्रसंग पडल्यास लढाईसाठीं सज्ज व्हावें लागे. कोष्टकांत दिलेले संस्कृत शब्द त्यानें राज्याभिषेकसमारंभसमयीं उपयोगांत आणले. उर्दू शब्दांच्या जागीं संस्कृत शब्द उपयोगांत आणण्याकरितां त्यानें एक 'राज्यव्यवहार-कोष' तयार करविला होता.

**२५ राजनीतीचें सामान्य स्वरूप:**—शिवाजीच्या राजनीतींत तीन सूत्रें प्रामुख्यानें दिसून येतात. पहिलें सूत्र सरकारी अधिकारी पगारी असा-

वेत. त्यांची त्यांच्या लायकीवर निवड व्हावी व त्यांची नेमणूक वंशपरंपरागत असूं नये. ह्या तत्त्वानुसार सर्व प्रधानमंडळाच्या नेमणुका व बदल्या होत. राज्यांतील वसूल गोळा करतांनाही त्यानें देशांतील परंपरागत असलेल्या देशमुख देशपांड्यांचें महत्त्व कमी करून कमाविसदार, महालकरी, सुभेदार वगैरे पगारी अंमलदार नेमले. ह्यामुळें राज्यांत सरंजामी सरदारांच्या शिरजोरीस वाव राहिला नाहीं. दुसरें सूत्र असें कीं, प्रधान मंडळांतील सर्व अधिकारी राजास सारखेच जबाबदार असून त्यांना एकमेकांवर वरिष्ठपणा गाजविण्यास वाव नसावा. ( पुढें छत्रपतींच्या दुबळेपणामुळें पेशवे प्रमुख झाले व अष्टप्रधानपद्धति मोडकळीस आली.) ह्या दुसऱ्या सूत्रामुळें प्रत्येकजण आपापल्या क्षेत्रांत चोख राहून राजास खूष करून योग्यतेस चढण्याचा यत्न करी. या चढाओढींत एकमेकांविरुद्ध मत्सरास जागा राहिली नाहीं. त्याचें तिसरें सूत्र असें कीं, राजा हा एकतंत्री असला तरी राजांनीं "परलोकचें भय बाळगून राहून, नेहमीं सत्पुरुष व विद्वान यांची आज्ञा पाळून सर्वेंगितज्ञ, प्रधान व सरकारकून यांची भीड चालवावी." राजानें स्वतःसच ईश्वराचे प्रतिनिधि समजून बेफामपणाचें वर्तन करूं नये. सारांश, राज्य हें देवाब्राह्मणांचें आहे, त्यांत राजानेंही ठराविक नियमांप्रमाणेंच चाललें पाहिजे, या सूत्रत्रयीच्या आधारावर उभारलेली राज्यसंस्था किती चोख व बळकट होती हें दोन वेळां दिसून आलें. शिवाजी आग्र्यास अटकेंत पडला असतां सर्व राज्यसूत्रें ठराविक नियमानुसार हालत होतीं. पुढें शिवाजीच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांनीं संभाजीचा वध झाल्यावर, औरंगजेबानें मराठी राज्याचा नाश करण्याकरितां आपली सर्व शक्ति एकवटून खर्च केली, परंतु शिवाजीच्या तालमींत तयार झालेल्या मुत्सद्यांनीं त्याही संकटांतून मराठी राज्य बचाविलें व औरंगजेबास नामोहरम केलें. उत्तम संस्था ह्या कर्तबगार व निःस्वार्थी पुरुष निर्माण करण्याच्या शाळाच असतात.

**२६ शिवाजीची योग्यताः**—मुसलमानी राज्यांत नोकरीस राहून त्यांच्या छत्राखालीं मोठें व्हावें व स्वतःच्या गौरवार्थ मोठी मांडलिकी जहागीर संपादन करावी, ही पिढ्यानपिढ्या बद्धमूल झालेली संवय झुगारून देऊन स्वतःच्या हिंमतीवर स्वतंत्र राज्य स्थापन करून हिंदु संस्कृतीस उजळा देणारा पुरुष शिवाजी होय. हा हेतु साध्य करतांना, कधीं धैर्यानें तोंड देऊन, तर वेळीं प्रसंगा-

वधान राखून, कधीं गुप्तपणें छापा घालून,तर कधीं युक्तीनें शत्रूवर मात करून, कधीं शौर्यानें तरवार गाजवून, तर कधीं दगलबाजांच्या हातावर तुरी देऊन, अनेकविध प्रसंगांतून तो निसटला. तो विजयानें धुंद झाला नाहीं, पराभवानें निराश झाला नाहीं किंवा संकटानें डगमगलाही नाहीं. एकामागून एक कामगिऱ्या तडीस नेऊन आपलें उद्दिष्ट साधण्याकडे त्याचें सारें लक्ष होतें. ह्या कार्यांत त्यानें अनेक युक्त्या योजिल्या. त्यास त्याचे शत्रू कपटविद्या म्हणतील व त्याचे पक्षपाती राजकारणी धूर्तपणा म्हणतील परंतु ज्या काळांत तो जन्मास आला, त्या काळांत प्रसंगीं, असल्या युक्त्याप्रयुक्त्यांचा आश्रय करण्यावांचून गत्यंतर नव्हतें. त्याच्या शुद्धाचरणाबद्दल त्याचे शत्रुसुद्धां ग्वाही देतात. त्याच्या धार्मिक सहिष्णुतेची साक्ष, देवळांप्रमाणें पिरांनाही त्यानें इनामें करून दिलीं यावरून पटण्यासारखी आहे. परंतु त्याचें सर्व लक्ष यावनी अंमल, यावनी संस्कृति व यावनी शब्द यांचें उच्चाटन करून प्राचीन संस्कृतीची पुन्हां स्थापना करणें, या गोष्टीकडे सतत लागून राहिलें होतें ; हीच त्याच्या चरित्राची गुरुकिल्ली होय. स्वतःच्या महत्त्वाकांक्षेसाठी परक्यांचें स्वातंत्र्य हरण करून स्वतः दिग्विजयी म्हणून गाजविणाऱ्या शिकंदर, ज्यूलियस सीझर, नेपोलियन इत्यादि पुरुषांची, स्वदेशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या शिवाजीशीं तुलना करतां येणार नाही. शिवाजीची तुलना करतांना 'स्वातंत्र्यार्थ खटपट करणाऱ्या पवित्र महापुरुषांचाच तेवढा प्रवेश होणें योग्य आहे' असें कै. राजवाडे म्हणतात तें अगदीं बरोबर आहे. परंतु मुत्सद्दीपणा, शौर्य व शुद्धाचरण या तिन्ही गुणांचा मधुर संगम शिवाजीप्रमाणें इतरांत क्वचितच पाहावयास सांपडतो. या गुणांनीं त्यानें स्वतःस अलौकिकत्व प्राप्त करून घेतलें, स्वदेशास स्वातंत्र्य प्राप्त करून दिलें, आपल्या पिढीतील लोकांस भाग्याचा दिवस दाखविला व पुढील पिढ्यांना आशेचा आधार व संतत स्फूर्तीचा ठेवा करून दिला, यांत शंका नाहीं.

# भाग ५ वा

# छत्रपति संभाजी

## (इ. स. १६८०-८९)

**१ संभाजीविरुद्ध कट :**—शिवाजी रायगडावर मृत्यु पावला, तेव्हां संभाजी पन्हाळगडास होता. संभाजी एक वेळ मोगलांस फितूर झाल्यापासून मराठमंडळांत त्याच्यासंबंधीं चांगलें मत नव्हतें. त्यांनी संभाजीस बाजूस सारून त्याचा धाकटा भाऊ राजाराम यास गादीवर बसविण्याची तयारी केली. राजाराम हा त्या वेळीं अल्पवयी होता, परंतु त्याची आई सोयराबाई हिनें पुढाकार घेऊन कटाची उभारणी केली व तो सिद्धीस जाईपर्यंत त्यासंबंधीं गुप्तता राखण्याची शक्य ती खटपट केली. परंतु लवकरच त्याचा परिस्फोट होऊन, संभाजीस पन्हाळगडीं हें वर्तमान समजलें. तेव्हां त्यानें पन्हाळगड येथील किल्लेदारास धमकावणी देऊन खरी हकीकत काढून घेतली व तो गड आपल्या ताब्यांत घेतला आणि तेथून तो रायगडाकडे निघाला. हें वर्तमान जाहीर होतांच, हलके हलके सोयराबाईच्या पक्षाकडील एकएक मंडळी फुटूं लागली. शेवटीं हंबीरराव मोहिते सेनापति हाही संभाजीस येऊन मिळाला. दुसऱ्यांदा केलेला आपला कट फुटला; आतां संभाजीविरुद्ध आपला निभाव लागणार नाहीं हें पाहून सोयराबाईनें आत्महत्या केली. तेव्हां त्यास रायगड येथें फारसा विरोध न होतां तो गादीवर बसला. संभाजीनेंही आपल्या विरुद्ध कटांत सामील झालेल्या मंडळीस शिक्षा देण्यास सुरवात केली. व त्यांच्यापैकीं प्रमुख अशा मोरोपंत पिंगळे, बाळाजी आवजी चिटणीस व आण्णाजी दत्तो सचिव ह्यांना कैदेंत टाकलें.

**२ कटवाल्यांचा सूड :**—हें सूडाचें सत्र बहुधा इतक्यावरच थांबलें असतें. परंतु कैदेंत पडलेल्या मंडळींनीं आणखी कारस्थानें केलीं. औरंगजेबाचा मुलगा अकबर ह्यानें बापाविरुद्ध बंड पुकारून तो दक्षिणेंत संभाजीच्या आश्रयास आला तेव्हां संभाजीच्या गैरहजेरींत बाळाजी आवजी वगैरे मंडळींनीं, संभाजीस कैदेंत टाकून राजारामास गादीवर बसविण्याविषयीं त्याच्याशीं

कारस्थान आरंभिलें. परंतु अकबरानें संभाजीच्या कानावर ह्या कारस्थानाची इत्थंभूत हकीकत घातली. मग काय ? संभाजीचा राग अनावर झाला व बापाच्या वेळचे सर्व मुत्सद्दी आपल्याविरुद्ध आहेत अशी खूणगांठ बांधून त्यांचा निःपात करण्यास त्यानें सुरुवात केली. बाळाजी आवजी व आण्णाजी दत्तो ह्यांस हत्तीच्या पायीं देऊन ठार मारलें. राजारामास कैदेंत टाकलें; व सोयराबाईच्या शिर्के घराण्यांतील पुरुषांचा त्यानें क्रूरपणें वध केला. ( यावरून 'शिरकान' हा शब्द प्रचारांत आला आहे). ह्या वेळीं त्यानें सुमारें दोनशें कर्त्या पुरुषांची वाट लाविली व इ. स. १६८१ च्या फेब्रुवारी महिन्यांत स्वतःस राज्याभिषेक करून घेतला. ह्या क्रूर कत्तलीचें वर्तमान समर्थांस समजलें तेव्हां त्यांस अत्यंत वाईट वाटून त्यांनीं संभाजीस एक उपदेशपर पत्र पाठविलें.[१] ह्याखेरीज कर्नाटकांतील वृद्ध मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते ह्यानें उत्तरेस येऊन संभाजीस बोध करण्याचा यत्न केला. वास्तविक ही वेळ फार आणीबाणीची होती. कारण उत्तरेंतून औरंगजेब आपलें सर्व सैन्य घेऊन दक्षिणेंत आला होता. अशा वेळीं संभाजी, अकबर, आदिलशहा व कुतुबशहा ह्या सर्वांनीं एकत्र होऊन त्यास तोंड देणें अगत्याचें होतें. हें ऐक्य घडवून आणण्यास लागणारा मुत्सद्दीपणा रघुनाथपंताच्या अंगीं होता व त्यानें आपल्याकडून कर्नाटकांतून ह्या संघास चांगलें साहचही केलें असतें. ही कल्पना पुढें मांडण्यास तो स्वतः उत्तरेस आला होता. परंतु संभाजीस तें

---

१ टीपः—त्यांतील उतारा खालीं दिला आहे.

मागील अपराध क्षमावे । कारभारी हातीं धरावे ॥
　　सुखी करूनि सोडावे । कामाकडे ॥ १ ॥
श्रेष्ठीं जें जें मेळविलें । त्या साठीं भांडत बैसलें ॥
　　तरी मग जाणावे फावलें । गनीमासी ॥ २ ॥
ऐसे सहसा करूं नये । दोघे भांडतां तिसऱ्या जये ॥
　　धीर धरूनी महाकार्य । समजूनि करावे ॥ ३ ॥
आहे तितुके जतन करावें । पुढें आणिक मेळवावें ॥
　　महाराष्ट्र राज्यचि करावे । जिकडे तिकडे ॥ ४ ॥
शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा प्रताप ॥
　　शिवराजाचा आठवावा साक्षेप । भूमंडळी ॥ ५ ॥

फारसें रुचलें नाही, कारण शिवाजीच्या वेळच्या मुत्सद्यांनीं त्याजविरुद्ध कट केल्यापासून त्याचा त्या सर्वांवरचा विश्वास उडाला होता.

**३ कलुषा:**—संभाजी धाडसी, शूर, पण विलासी व अविचारी होता. एकदां करून घेतलेला ग्रह त्यानें फिरून बदलला नाहीं. त्यानें एका कविकुलेश नांवाच्या काश्मिरी ब्राह्मणावर आपला सर्व विश्वास टाकला. ह्याचें मूळचें नांव 'कबकलश' होतें असें म्हणतात. ह्याचा मंत्र, जादुटोण्यांवर विश्वास असून तरुण संभाजीच्या विकारवश मनावर त्यानें चांगलाच पगडा बसविला. आपल्या मंडळीविषयीं साशंक चित्त असा संभाजी, व परक्या मुलुखांत चुकल्या चुकल्याप्रमाणें राहणारा वृद्ध कविकुलेश ह्यांची मैत्री जुळण्यास वेळ लागला नाहीं! संभाजीनें त्यास 'छंदोगामात्य' नांवाचा किताब दिला. मात्र अष्टप्रधानांपैकी कोणतीच जागा दिल्याचें दिसून येत नाहीं. 'कविकुलेश' ह्याचा अपभ्रंश मराठींत 'कब्जी कलुशा' असा झाला व त्याच नांवानें तो मराठी बखरींतून प्रसिद्ध आहे. कलुशानें राज्याच्या हिताहिताकडे विशेष लक्ष न देतां संभाजीच्या तंत्राप्रमाणें वागून आपलें स्थान कायम ठेवण्या-पलीकडे कांही केलें नाहीं. मात्र त्यानेंच शेवटीं फितूर होऊन संभाजीस मोगलांच्या हवालीं केलें वगैरे त्याजवरील आरोप निराधार वाटतात.

**४ संभाजीचें धोरण :**—त्याच्या कारकीर्दीत पहिल्या तीनचार वर्षांत त्यानें मोठ्या धडाडीनें हालचाली केल्या. त्यानें केलेल्या मोहिमांतून त्याचें शौर्य, धाडस व चपळाई हे गुण चांगले निदर्शनास येतात. मात्र त्यांत पोक्त-पणा व दूरदृष्टि यांचा अभाव असल्यामुळें त्याच्या मोहिमांतून श्रमाच्या मानानें विशेष फलनिष्पत्ति झालेली दृष्टीस पडत नाहीं. त्यास मुख्यत्वें-करून तीन शत्रू होते. सिद्दी, पोर्तुगीज व मोगल. त्यांपैकीं सर्वांत बलिष्ठ शत्रु मोगल ; व त्यांची तयारीही जंगी होती. शिवाजीच्या साऱ्या आयुष्यांत त्यास लढावें लागलें नसेल एवढ्या मोठ्या प्रमाणावर ह्या वेळीं मोगलांची तयारी होती. खुद्द औरंगजेबच दक्षिणेंतील राज्यांचा एकदां कायमचा सोक्षमोक्ष करून टाकण्यास आलेला होता. त्याच्या धाकाखालीं त्याचे सरदार चळचळ कांपत असत. अशा शत्रूशीं तोंड देण्यांत संभाजीनें शिवाजी-प्रमाणें आदिलशहा व कुतुबशहा यांना साह्य करून जमल्यास त्यांचा एक संघ निर्माण करणें जरूर होतें. परंतु हा पोक्त विचार सोडून देऊन संभाजी

सिद्दी व पोर्तुगीज यांच्याशीं झुंज घेत बसला. दोन्हीही सत्ता समुद्रकिनाऱ्यावर होत्या व दोघेही औरंगजेबाच्या चिथावणीवरून व त्याच्या भरंवशावर भांडत होते. त्यांनीं फार तर कोंकणपट्टीवरील चार गांवें अधिक घेतलीं असतीं व इंग्रजांच्या बंदरांत उतरून चार अधिक छापे घातले असते. मोठ्या धोरणाचा विचार करून संभाजीनें या चिमट्यांना दाद देण्याची जरूर नव्हती. पण दुर्दैवानें तसें झालें नाहीं.

**५ संभाजी व अकबर** :—प्रारंभीं मात्र मराठी सैन्यानें मोगलांचें लक्ष उत्तरेस रजपूत युद्धाकडे गुंतलें आहे हें लक्षांत घेऊन थेट बऱ्हाणपूरपर्यंत दौड मारली व तेथें जवळच बहादुरपूर येथें स्वस्थपणें लूट मारून ते औरंगाबादेकडे वळले. परंतु त्या ठिकाणीं मराठ्यांस फारसा लाग साधला नाही. इ. स. १६८१ त अकबर संभाजीच्या आश्रयार्थ आला. कारण त्या वेळी उभ्या हिंदुस्थानांत मोगल सत्तेस मान न वांकविलेलें एक मराठ्यांचें राज्य तेवढें होतें. अकबराच्या आगमनानें मराठ्यांची इभ्रत वाढली. संभाजीनें अकबराचा चांगला सन्मान केला व त्यास कोंकणांत पालीजवळ सुरक्षित राहावयास जागा दिली. अकबराच्या मनांतून संभाजीनें सैन्य घेऊन उत्तरेकडे यावें व त्यास दिल्लीच्या तख्तावर बसण्यास मदत करावी असें फार होतें. पण संभाजीच्या दृष्टीनें हा विचार फारसा सुरक्षित नव्हता, कारण तो साधला तर ठीक; पण न साधल्यास स्वतःच्या डोंगराळ व सुरक्षित जागेंतून बाहेर पडून, शत्रूस आपल्या पाठीमागें आपल्या राज्यावर मोकळा सोडून आपण उत्तर हिंदुस्थानांतील अपरिचित उघड्या मैदानांत गेल्यावर काय बनाव बनेल कोणीं सांगावें? म्हणून संभाजी हे बेत लांबणीवर टाकूं लागला, तसतसा अकबर अधीर होऊन संभाजीस सोडून जाण्याचा विचार करूं लागला. संभाजीनें त्यास कसेंबसें १६८६ पर्यंत थोपवून धरलें. परंतु पुढें तो निराश होऊन समुद्रमार्गानें इराणकडे गेला.

**६ जंजिऱ्याची मोहीम** :—इ.स. १६८० त रायगडास आल्यावर संभाजी प्रथम सिद्द्यांकडे वळला. शिवाजीनें इ. स. १६७९ त सिद्द्याचा उपद्रव बंद पाडण्यासाठीं मुंबईच्या तोंडावर असलेलें खांदेरी हें बेट घेतलें व तेथें तटबंदी केली. परंतु सिद्द्यानें त्यास शह देण्याकरितां खांदेरीच्या समोर असलेलें उंदेरी हें बेट काबीज करून आपण तेथें तटबंदी केली. संभाजीनें

सिद्द्यास उंदेरीहून हुसकून लावण्याचा बेत केला. ह्या कामीं त्यास इंग्रजांचें साह्य हवें होतें, पण तें त्यांस मिळालें नाहीं. कारण त्यांनीं अथपासून इतिपर्यंत सर्वांशीं गोडीगुलाबीनें वागण्याचा प्रयत्न केला होता. संभाजीनें उंदेरीवर जोराचा हल्ला केला पण तो निष्फळ झाला; म्हणून पुढील वर्षी त्यानें खुद्द जंजिऱ्यावरच जमिनीवरून हल्ला केला. परंतु जंजिऱ्याचा किल्ला पाण्यांत असल्यामुळें, त्यावर नीटसा मारा लागूं पडला नाहीं. तेव्हां संभाजीनें २४०० फूट रुंद व ९० फूट खोलीची समुद्राची खाडी मातीनें बुजविण्याचा धाडसी बेत केला. पण ह्याच सुमारास मोगलांनीं संभाजीच्या मुलुखावर चढाई केल्यामुळें तो मोगलांकडे वळला व मोठ्या शौर्यानें त्यानें मोगलांचा हल्ला परतवून त्यांनीं काबीज केलेला मुलूख परत मिळविला.

७ **पोर्तुगीजांशीं युद्ध** :—जंजिऱ्याचें काम चालू होतें, पण त्यांत मराठ्यांस म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. याचें कारण किनाऱ्यावरील पोर्तुगीज बादशहाच्या भरंवशावर त्यास कित्येक वेळां उघड उघड विरोध करीत. मराठ्यांनीं कारवारजवळ किल्ला बांधण्यास एक सोयीस्कर जागा पाहिली होती, परंतु पोर्तुगीजांनीं ती आधींच अडवून टाकली. इतकेंच नव्हे तर, त्यांनीं मराठ्यांच्या ताब्यांतील चौल बंदरावर हल्ला करून तें काबीज केलें. तेव्हां मराठ्यांनीं चौलला वेढा घातला (इ. स. १६८३); व पोर्तुगीजांचीं उत्तरेकडील दमण, वसई वगैरे ठिकाणें उध्वस्त केलीं आणि त्यांची मुख्य राजधानी गोवा या शहरावरच हल्ला केला. त्याबरोबर गोव्यांतील लोक घाबरून पळू लागले. पोर्तुगीजांचा चहूंकडून कोंडमारा झाला. त्यांचीं उत्तरेकडील बंदरें उध्वस्त झालीं व दक्षिणेस गोव्यावरही मराठ्यांचा मारा सुरू झाला. पण इतक्यांत त्यांच्या सुदैवानें औरंगजेबाचें सैन्य कोंकणांत पोर्तुगीजांच्या मदतीसाठीं येत असल्याची बातमी लागली. तेव्हां संभाजीच्या हल्ल्याला प्रतिशह लागूं झाला व त्याचा गोव्याकडील जोर लटका पडला.

८ **मोगलांचा पराभव** (इ. स. १६८४) :—ह्या दुसऱ्या हल्ल्याची तयारी मोगलांनीं मोठ्या कुशलतेनें केली होती. त्यांच्या सैन्याची एक तुकडी अजीमच्या हाताखालीं देशावर बागलाणांत होती. दुसरी मुअज्जम ऊर्फ शहाअलम ह्याच्या हाताखालीं बेळगांवावरून रामघाटानें दक्षिण कोंकणांत उतरत होती व तिसरी शहाबुद्दीन नामक सरदाराच्या हाताखालीं

कल्याणनजीक उत्तर कोंकणांत उतरत होती. ह्या दुसऱ्या आणि तिसऱ्या तुकडीनें विरुद्ध दिशेनें येऊन एकत्र व्हावयाचें, व मराठ्यांचा कोंकणांतील मुलूख मारून काढावयाचा; व ह्या प्रसंगीं सिद्द्यानें समुद्रमार्गानें सैन्यास धान्याचा पुरवठा करावयाचा असा मोगलांचा विचार होता. असा तिन्ही चारीकडून मारा झालेला पाहतांच, संभाजी गोव्याहून निघून उत्तरेस गेला व त्यानें मोगल सैन्याच्या रस्त्यावरील मुलूख उजाड करून टाकला व सिद्द्याच्या हालचालीवर लक्ष ठेवून त्यानें मोगलांकरितां आणविलेली सामग्री लुटून नेली. इकडे मुअज्जम रामघाटांतून गोव्याकडे आला व त्यानें पोर्तुगीजांचें रक्षण करण्याबद्दल त्यांच्याजवळ जबर खंडणी मागितली. पण ते मराठ्यांच्या एकसारख्या हल्ल्यांनीं बेजार झाल्यामुळें त्यांच्याजवळ खंडणी देण्यास त्राण नव्हतें. मुअज्जमच्या ह्या कृत्यामुळें त्यानें पोर्तुगीजांशीं वैर मात्र संपादिलें व ते त्यास साह्य करीनात. इकडे संभाजीनें अगोदरच रसद बंद केली व मराठी सैन्याचे वारंवार छापे होऊं लागले. ह्यामुळें मुअज्जम इतका घाबरा झाला कीं, त्यानें आल्या मार्गानें पळ काढावयाचें ठरविलें. परंतु घाटांतून परत जात असतांही त्याची फार दुर्दशा झाली व तो मोठ्या कष्टानें जिवानिशीं बचावला.

**९ दक्षिणेंतील मुसलमानी राज्याचा शेवट** :—अशा रीतीनें दोन वेळां अंगावर आलेले मोगलांचे हल्ले संभाजीनें मोठ्या धडाडीनें परत लावले. आतां मात्र औरंगजेबाची पुरी खात्री झाली कीं, मराठ्यांची सत्ता सहजासहजीं मोडणारी नाहीं. तेव्हां त्यानें मराठ्यांचा नाद कांहीं काळ सोडून दिला व तो विजापूर व गोवळकोंड्याच्या राज्यांकडे वळला. इ. स. १६८५–८७ हीं तीन वर्षें औरंगजेब त्या उद्योगांत गुंतला हें पाहून संभाजीनें कलुशास विजापूरच्या मदतीस व दुसऱ्या एका सरदारास कुतुबशहाच्या मदतीस पाठवून आपण राज्यांत विरोध करणाऱ्या शिर्के-आदिकरून सरदारांचा पाडाव करण्याच्या उद्योगांत गुंतला. परतु औरंगजेबास तीं दोन्ही राज्यें बुडविण्यांत थोड्याच अवधींत यश आलें. व तिकडील स्वारी आटोपून तो फिरून उत्तरेस संभाजीशीं युद्ध करण्यास आला (इ. स. १६८७.)

**१० संभाजीस कैद** :—पहिल्या प्रथम औरंगजेबानें पन्हाळ्यास वेढा

घालण्याचें ठरविलें व ह्या कामगिरीवर त्यानें शेख निजाम ऊर्फ मुकर्रबखान याची नेमणूक केली. त्यानें चहूंकडे गुप्त हेर पाठवून संभाजीच्या हालचालीची बातमी ठेविली होती. संभाजी खेळण्याहून रायगडीं निघाला असतां वाटेंत संगमेश्वरीं त्याचा मुक्काम असल्याचें वृत्त त्यास समजलें. त्याबरोबर तो झपाट्यानें निवडक तीन हजार लोक बरोबर घेऊन घाटमाथा ओलांडून तिकडे जाण्यास निघाला. हें नव्वद मैलांचें अंतर त्यानें अवघ्या तीन दिवसांत ओलांडलें व तो संगमेश्वरांत घुसला. कलुशा तेथें होताच. त्यानें मोगल फौजेशीं लढाई केली पण तो जखमी झाला. तेव्हां तो संभाजीसह एका तळघरांत लपला. तेथून मुकर्रबखानाच्या मुलानें त्यास व संभाजीस बाहेर काढलें व कैद केलें. मुकर्रबखान त्या सर्वांस घेऊन औरंगजेबाकडे गेला व त्यानें संभाजीस बादशहापुढें उभें केलें.

११ **क्रूर वध:**—आतां संभाजीचे डोळे साफ उघडले व तो तेजस्वी बापाचा तेजस्वी मुलगा बंदिवान वाघाप्रमाणें गुरगुरूं लागला. औरंगजेबाच्या मनांत त्यास जिवंत ठेवून मराठ्यांना शरण आणावयाचें होतें, पण त्यानें मुसलमानी धर्म स्वीकारल्यास त्यास जीवदान मिळेल असा निरोप त्यानें कैदेंत संभाजीकडे पाठविला. संभाजीला आतां असल्या लाजिरवाण्या जिवापेक्षां मरण येईल तर बरें असें वाटूं लागलें होतें. तेव्हां त्यानें मुद्दाम औरंगजेबास चीड येईल असा निरोप पाठविला कीं, "तुझी मुलगी मला देशील तर मी मुसलमान होईन." औरंगजेबाच्या कानीं ही वार्ता जातांच त्यानें त्याचे हालहाल करून त्यास ठार मारण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें ता. ११ मार्च १६८९ रोजीं भीमेच्या कांठीं कोरेगांव येथें संभाजीचा मोठ्या क्रूरपणानें वध झाला.

१२ **संभाजीची योग्यता:**—संभाजीच्या योग्यतेसंबंधीं आज इतिहासज्ञांस काय वाटत असेल तें वाटो, परंतु तत्कालीन परिस्थितींत त्याच्या क्रूर वधामुळें मराठे त्याचे दोष व अपराध विसरले व असा धर्मासाठीं प्राण देणारा वीराचा बच्चा आपल्या वयाच्या अवघ्या बत्तिसाव्या वर्षी मराठ्यांस सोडून गेला, ह्याबद्दल उभें महाराष्ट्र त्याच्यासाठीं हळहळलें. त्यानें जिवंतपणीं कांहींही कृत्यें केलेलीं असोत, परंतु त्याच्या अंतकाळच्या बाणेदार वर्तनाची चाड राखून त्याच्या वधाचा सूड घेतलाच पाहिजे असें प्रत्येकास वाटून लोक खडबडून जागे झाले. संभाजीच्या कृत्यांपेक्षां त्याचा मृत्यूच

अधिक सामर्थ्यवान् ठरला ! आतां निकराचा यत्न न केला तर छत्रपतींनीं उभारलेलें हें मराठी राज्य अल्पावधींतच नष्ट होणार असें सर्वांस दिसूं लागलें व जो तो स्वराज्याच्या रक्षणार्थ सिद्ध झाला. संकटसमयीं अवघे मतभेद विलयास जातात तसा प्रकार होऊन, पुढील अठरा वर्षांत ज्यानें त्यानें आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. राष्ट्रीय धर्मभावनेनें प्रेरित होऊन स्वातंत्र्यासाठीं जिवावर उदार होऊन झगडल्याचीं व पहिल्या प्रतीचा पुढारी नसतांही त्याची वाण भासूं न देतां यशस्वी झाल्याचीं जीं थोडीं उदाहरणें इतिहासांत सांपडतील, त्यांत मराठ्यांच्या पुढील अठरा वर्षांच्या झटापटींची प्रामुख्यानें गणना करावी लागेल.

---

## भाग ६ वा

## १ छत्रपति राजाराम व २ छत्रपति दुसरा शिवाजी

( इ. स. १६८९–१७०० ) ( इ. स. १७००–१७०८ )

**१ पुढील कार्याची योजना :**—संभाजीच्या पाठीमागें त्याची बायको येसूबाई ही रायगडावर होती. महाराष्ट्रांतील अतिशय कर्त्या स्त्रियांत तिची गणना केली पाहिजे. तिनें संभाजीच्या हयातींतच, त्याच्या दुष्कृत्यांमुळें दुखावलेले शिवकालीन मुत्सद्दी परत बोलावून त्यांची समजूत केली व व्यक्तीपेक्षां राज्याकडे नजर देण्यास सांगितलें. त्यामुळें बाळाजी आवजी चिटणिसाचा मुलगा खंडो बल्लाळ आपल्या बापाच्या वधाकडे लक्ष न देतां पुन्हां स्वामिकार्यार्थ झटूं लागला व एकदां तर त्यानें खुद्द संभाजीचा जीव मोठ्या संकटांतून बचावला. ह्याखेरीज तिनें दुसरींही कर्तीं माणसें जवळ केलीं ; व संभाजीचें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष झालें असतां तिकडे तिनें लक्ष घातलें. राजाराम कैदेंत होता, परंतु त्याच्याशीं तिनें प्रेमळपणाचें वर्तन ठेवलें. संभाजी मृत्यु पावल्यावर पुढें कशी व्यवस्था करावी याचा विचार

सुरू झाला. तिला एक शिवाजी नांवाचा नऊ वर्षांचा मुलगा होता. तेव्हां त्यास राज्यावर बसविण्यांत राज्याचें हित नाहीं हें ओळखून, तिनें निःस्वार्थी-पणानें राजारामास राज्यावर बसवावें असें सुचविलें. रायगडास लवकरच मोगलांचा वेढा पडेल असा संभव होता. तेव्हां सर्वांनीं एकत्र राहूं नये. येसू-बाईनें आपल्या मुलासह रायगडींच राहावें, राजारामानें रायगडापासून पन्हाळ्यापर्यंत फिरतें राहावें. संताजी घोरपडे व धनाजी जाधव या वीरांनीं आपलें सैन्य फिरतें ठेवून मोगल फौजांस त्रास द्यावा व त्यांची रसद मारावी, प्रल्हाद निराजी व खंडो बल्लाळ यांनीं राजारामाबरोबर राहावें. राम-चंद्रपंत अमात्य यांनीं विशाळगड येथें राहून किल्ल्यांची पाहणी करून प्रत्येक किल्ला लढविण्याची तरतूद करून ठेवावी अशी योजना सर्वानुमतें ठरली. या काळांत मराठेशाहींतील सर्वच माणसें राज्याच्या जिवावरील संकट ओळखून जबाबदारीनें वागत होतीं. राजारामही या प्रसंगास पाहिजे तसा पुरुष होता. त्याच्या अंगीं प्रखर गुण नव्हता पण गुणी माणसें जवळ राखून त्यांना कामास लावावयाचें व त्यांना प्रसंगीं पदव्या व इनामें देऊन उत्तेजित करावयाचें हें तो चांगल्या रीतीनें करी.

**२ रायगड सर झाला** :—मराठ्यांच्या कल्पनेप्रमाणें लवकरच मोगलांनीं रायगडास वेढा घातला. या मोहिमेवर इतिकदखानाची नेमणूक झाली. त्यास कोंकणांतून सिद्दी मदत करीत होता. परंतु रायगडचा बंदो-बस्त चांगला असल्यानें किल्ला हस्तगत होईना. शेवटीं सूर्याजी पिसाळ नांवाच्या इसमानें फितुरीला बळी पडून किल्ल्याच्या चोरवाटा दाखविल्या व त्याबद्दल वांईच्या देशमुखीचें वतन मोगलांपासून मिळविलें. या फितुरी-मुळे किल्ला सहज सर झाला. इतिकदखानानें येसूबाई व शिवाजी यांना कैद करून बादशहाकडे नेलें. शिवाजीस त्यानें सात हजारी सरदार केलें, परंतु आपल्याजवळच नजरकैदेंत ठेवून दिलें. इतिकदखानाच्या कामगिरी-बद्दल त्यास झुल्फिकरखान हा किताब मिळाला. दक्षिणेंत आल्यापासून हा वेळपर्यंत बादशहाच्या वैभवाची चढती कमान होती. विजापूर व गोवळ-कोंड्याचीं राज्यें बुडालीं. संभाजी ठार झाला. रायगड ही मराठ्यांची राजधानी सर झाली व संभाजीची स्त्री व पुत्र हेही कैद झाले. राजाराम अद्याप त्याच्या हातीं लागला नव्हता, परंतु त्याचें बूड स्थिर नव्हतें, तेव्हां

औरंगजेबास त्याची फारशी तमा राहिली नाहीं. सगळीकडून औरंगजेबाचे ग्रह उच्चीचे दिसूं लागले.

३ **जिंजीकडे प्रवास** :—आतां फक्त राजारामाचा पाडाव करावयाचा राहिला. ह्या हेतूनें त्यानें आपला मोर्चा तिकडे फिरविला. तेव्हां राजाराम दक्षिणेकडे कर्नाटकांत निघाला. औरंगजेबानें ठिकठिकाणच्या मोगल सरदारांना राजारामास पकडण्याबद्दल पत्रें लिहिलीं. विजापूरच्या सुभेदारानें राजारामास बिदनूरच्या सरहद्दीवर गांठण्याचा यत्न केला, पण तो फुकट गेला. यापुढें उघडपणें प्रवास करणें राजारामास व त्याच्या साथीदारांस अशक्य झालें. तेव्हां सर्वांनीं संन्यासी यात्रेकरूंचा वेष घेतला,तरी पण बंगलूर येथें असतांना त्यांजवर संकट ओढवलेंच.राजाराम व त्याचे साथीदार एका धर्मशाळेंत उतरले, तेव्हां राजारामास पाय धुवावयाचे होते. त्या वेळी एकानें त्याच्या पायावर पाणी घालण्यास सुरवात केली. एक संन्यासी यात्रेकरू दुसऱ्याच्या पायावर पाणी घालतो हा प्रकार दुसऱ्या बैराग्यांनीं पाहिला व ते आपापसांत कुजबुजूं लागले. त्याबरोबर राजाराम एक दोघांस घेऊन पुढे निघाला, व खंडो बल्लाळ बाकीच्यासह स्वयंपाक करीत मागें राहिला. मोगल ठाणेदाराच्या कानावर ह्या यात्रेकरूंचें वर्तमान जाऊन त्यानें त्या सर्वांस पकडून चौकीवर नेलें व तेथें त्यांचा छळ करून 'तुम्ही कोण आहांत? असें विचारलें ; पण खंडो बल्लाळ व त्याचे साथीदार आपल्या स्वामीभक्तीपासून यत्किंचित ढळले नाहींत. त्यांनीं शेवटपर्यंत एकच उत्तर दिलें कीं, 'आम्ही रामेश्वरचे यात्रेकरू आहोंत ? शेवटीं ठाणेदारानें त्यांस सोडून दिलें. अशा रीतीनें वाटेंत अनेक संकटें सोशीत सर्व मंडळी इ. स. १६८९ च्या अखेरीस जिंजी येथें सुखरूप पोहोंचली. तेथें गेल्यावर राजारामानें आपणास राज्याभिषेक करून घेतला. प्रल्हाद निराजी याच्या कर्तबगारीबद्दल त्यास 'पंत प्रतिनिधि' असा नवाच किताब देऊन अष्टप्रधानांहून त्याची योग्यता श्रेष्ठ ठरविली. निळो मोरेश्वर (मोरोपंत पिंगळे यांचा मुलगा) यास मुख्य प्रधानाची जागा दिली. संताजीस सेनापतीची जागा दिली. अशा रीतीनें नेमणुका केल्यावर राजारामानें संताजीस कर्नाटकांत पाठवून बाजूच्या पाळेगारांपासून वसूल गोळा केला व किनाऱ्यांवरील इंग्रज व फरेंच व्यापाऱ्यांकडेही पैशाची मागणी केली.

**४ संताजी व धनाजी** :—राजारामाचें जिंजी येथील आसन स्थिर झाल्यावर संताजी व धनाजी यांची जोडी उत्तरेस रामचंद्रपंतांच्या मदतीस आली. कारण एकटया रामचंद्रपंतास मोगल फौजेचा प्रतिकार करणें अशक्य झालें. रायगडानंतर पन्हाळा व विशाळगड हे दोन्ही किल्ले मोगलांच्या हातीं पडले व दुसराही पुष्कळ मुलूख मोगलांनीं व्यापून टाकला होता. तेव्हां उत्तरेस आल्याबरोबर मोगलांनीं जिंकलेला मुलूख परत घेण्यास त्यांनीं आरंभ केला. ह्या काळांतील ह्या दोघांची कामगिरी फारच कौतुकास्पद होती. संताजीनें तर एकदां धिटाईनें बादशहाच्या तंबूचे तणावे कापले व सोन्याचे कळस कापून नेले. धनाजीचा मोगल सरदारांवर एवढा वचक होता कीं त्यांचे घोडे पाणी पिईनासे झाले तर, ते घोडयास विचारीत कीं 'का रे? तुला पाण्यांत धनाजी दिसतो का?' ह्या जोडीनें उत्तरेस नर्मदेपासून दक्षिणेस जिंजीपर्यंतच्या प्रदेशांत एकसारखा धुमाकूळ माजवून दिला व मोगल फौजेस अगदी सतावून सोडलें. औरंगजेबास आतां सर्व ठिकाणीं फौज पुरवावी लागे. प्रथम त्यानें उत्तरेकडील मराठी फौजेशीं लढण्याचा प्रयत्न केला, परंतु मराठे मैदानावर लढण्यास कधीच येत नसत. त्यांचा मुख्य धंदा बादशहाची फौज सावध नसली म्हणजे तिच्यावर हल्ला करावयाचा व ती सावध होऊन लढण्यास सिद्ध झाली कीं, चोहींकडे पांगून जावयाचें व मोगल छावणीस मिळणारी रसद मारावयाची. ह्यामुळें औरंगजेब कंटाळून गेला. तेव्हां त्यानें जिंजीस वेढा घालण्याकरितां झुल्फिकरखान यास पाठविलें व वेढयाचें काम जोरांत चालावें म्हणून आपण स्वतः विजापूरनजीक गलगलें येथें छावणी करून राहिला. तेथें त्याचा मुक्काम इ. स. १६९५ पर्यंत होता, परंतु तेवढया अवधींत जिंजीच्या वेढयाचें काम तर आटोक्यांत आलें नाहींच; पण उत्तरेस मराठे सरदारांनीं इतका त्रास दिला कीं त्यास पुन्हां गलगल्याहून आपली छावणी हालवून भीमेच्या कांठीं पंढरपुरानजीक न्यावी लागली. त्याबरोबर संताजीनें मोगलांच्या ताब्यांतील दक्षिणेंतील मुलुखावर स्वारी करून चौथाई वसूल करण्यास आरंभ केला.

**५ जिंजीचा वेढा** :—इ.स.१६९१ त झुल्फिकरखानानें जिंजीस वेढा घातला. हें वेढयाचें काम सात वर्षें रेंगाळत चाललें होतें. पण किल्ला सर होण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं औरंगजेबानें खानास चांगलीच तंबी दिली. तेव्हां वेढयाचें

काम जोरांत सुरू झालें. आतां जिंजीचा पाडाव होणार असें स्पष्ट दिसं लागलें, त्याबरोबर राजाराम वगैरे मंडळी तेथून कसें निसटावें या चिंतेंत पडली. झुल्फिकरखानाच्या सैन्यांत गणोजी शिर्के वगैरे मंडळी होती. संभाजीनें शिर्के घराण्यांतील प्रमुख पुरुषांची कत्तल ( शिरकाण ) केल्यापासून ते भोसल्यांचे अगदीं हाडवैरी बनले होते. त्यांजकडे खंडो बल्लाळ गुप्तपणें गेला व राजारामास निसटून जाण्यास वाट देण्याविषयीं त्यानें शिर्क्यांचें मन वळविलें. प्रथम त्यांनीं ही गोष्ट साफ नाकारिली. तेव्हां खंडो बल्लाळानें समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या. संभाजीच्या कृत्याबद्दल हिंदु राज्यावर संकट आणूं नये म्हणून विनविलें. शेवटीं स्वतःचें दाभोळचें वतन शिर्क्यास दिलें व राजारामाची जिंजीहून सुटका करून घेतली. खंडो बल्लाळासारखीं स्वामिभक्त व स्वार्थत्यागी माणसें देशांत उत्पन्न होतात तेव्हांच असल्या संकटांतून देशाची मुक्तता होते. राजाराम व त्याची मंडळी निघून गेल्यावर झुल्फिकरखानानें जिंजी काबीज केली (इ. स. १६९८ ).

६ ***नवी राजधानी सातारा*** :—कर्नाटकांतून निघाल्यावर राजाराम उत्तरेस परत आला. या वेळीं महाराष्ट्रांत बरेंच स्थिरस्थावर झालें होतें. राजारामानें रायगड हें राजधानीचें ठिकाण बदलून सातारा येथें आपली राजधानी स्थापिली; व तेथें पुनश्च अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्या. संताजीचा इ. स. १६९७ त अपघातानें खून झाला, तेव्हां धनाजी सेनापति झाला. त्याच वर्षी प्रल्हाद निराजी मृत्यु पावल्यामुळें प्रतिनिधीचें पद परशुराम त्र्यंबक कुळकर्णी यास देण्यांत आलें. हाच प्रतिनिधि घराण्याचा मूळ पुरुष होय. संकराजी नारायण यास सचिवाची जागा मिळाली. हाच भोरच्या पंतसचिवाचा मूळ पुरुष होय. रामचंद्र निळकंठ[1] यास अमात्याची जागा दिली. याखेरीज ज्यांनीं ज्यांनीं गेल्या आठ वर्षांत राज्याच्या रक्षणाची शिकस्त केली त्यांस त्यानें वतनें, इनामें व जहागिरी दिल्या. यामुळें होतांहोईतों नवे वतनदार निर्माण करूं नयेत ह्या शिवाजीच्या तत्त्वास धक्का बसला खरा; परंतु लोकांस उत्तेजन देण्यास तसें करण्यावांचून गत्यंतर नव्हतें.

७ ***मराठ्यांचा संचार***:—याप्रमाणें स्वराज्यांत जम बसविल्यावर राजारामानें

१ ***टीप*** :—यानें लिहिलेला राजनीति नामक ग्रंथ उपलब्ध असून त्यावरून मराठ्यांच्या राजनीतिविषयक कल्पनांवर उत्तम प्रकाश पडतो.

मराठ्यांचा दरारा बसविण्याकरितां खानदेश वऱ्हाडकडे पुन्हां मोहिमा सुरू केल्या. त्यानें शाहू व येसूबाईस सोडविण्याचाही यत्न केला, परंतु त्यांत त्यास यश आलें नाहीं. या मोहिमेवर असतां राजारामानें परसोजी भोसले यास वऱ्हाडांत, नेमाजी शिंदे यास खानदेशांत, खंडेराव दाभाडे यास बागलाणांत, व निंबाळकर यास गोदावरीच्या कांठच्या प्रदेशांत अशा ठिकठिकाणीं आपल्या सरदारांच्या नेमणुका केल्या. तेथें त्या सरदारांनीं राहावें, आपला अंमल बसवावा व ठराविक वसूल साताऱ्यास पाठवावा, असा उपक्रम पाडला. यामुळें त्याच्या सरदारांत चढाओढ उत्पन्न होऊन प्रत्येकाच्या कर्तबगारीस स्वतंत्र क्षेत्र उत्पन्न झालें. इ. स. १७०० च्या प्रारंभीं राजाराम या मोहिमेवरून परत आला व नंतर थोडे दिवसांनीं सिंहगडावर मरण पावला. राजारामास दोन बायका होत्या. एक हंबीरराव मोहित्यांची मुलगी ताराबाई, हिला राजारामाच्या मृत्यूसमयीं शिवाजी नांवाचा दहा वर्षांचा मुलगा होता; व दुसरी घाटगे घराण्यांतील राजसबाई. हिला संभाजी नांवाचा तीन वर्षांचा मुलगा होता.

## (२) छत्रपति दुसरा शिवाजी

### (इ. स. १७०० ते १७०७)

८ **दुसरा शिवाजी** :—राजारामाच्या मृत्यूनंतर राज्याचा खरा वारस संभाजीचा मुलगा शिवाजी हा गादीवर यावयाचा; परंतु तो औरंगजेबाच्या कैदेंत होता व राजारामाची स्त्री ताराबाई हिला आपल्या मुलास राज्य मिळावें असें वाटत होतें, तेव्हां तिनें आपल्या मुलासच गादीवर बसविण्याविषयीं आग्रह धरिला, तेव्हां तिच्या उलट कोणी गेलें नाहीं.

९ **औरंगजेबाची जंगी मोहीम** :—मोगलांशीं युद्ध अद्याप चालूं होतें. जिंजीचा पाडाव झाला तरी मराठे जेरीस आले नाहींत, हें पाहून औरंगजेबानें एका नवीन उपायाचा अवलंब केला. त्यानें आपल्या फौजेच्या दोन टोळ्या करून एकीनें मराठ्यांचे किल्ले सर करावे व दुसरीनें मोगल मुलुखांत रसद मारण्यास किंवा चौथाई गोळा करण्यास येणाऱ्या मराठ्यांचा बंदोबस्त करावा अशी योजना केली. कारण मराठ्यांचें सामर्थ्य या दोन गोष्टींवर अवलंबून होतें हें त्यानें ओळखिलें

होतें. एक, किल्ल्याच्या बळावर ते स्वतःच्या राज्याचें रक्षण करितात व दुसरें, दुसऱ्यांच्या मुलुखांतून पैसा आणून राज्यें चालवितात. आपला बेत उत्तम प्रकारें तडीस जावा म्हणून किल्ले जिंकणाऱ्या टोळीचें अधिपत्य त्यानें स्वतःकडे घेतलें. या वेळीं तो ऐंशीं वर्षांचा होता. दुसरी तुकडी झुल्फिकर-खानाच्या हाताखालीं काम करीत होती. औरंगजेबानें प्रथम कोल्हापूरनजीकचा वसंतगड काबीज केला व लगेच मराठ्यांची नवी राजधानी सातारा येथील किल्ल्यास वेढा घातला. सातारचा किल्लेदार प्रयागजी फणसे प्रभू होता. त्यानें चार महिने दाद दिली नाहीं, पण शेवटीं सातारचा किल्ला मोगलांचे हातीं आला. ही गोष्ट राजारामाचे मृत्यूनंतर अवघ्या एकाच महिन्यांत घडली. राजाराम मृत्यु पावला व त्याची राजधानी सातारा हीही सर झाली, तेव्हां औरंगजेबास उमेद येऊन इ. स. १६८९ तल्याप्रमाणें पुन्हां मराठ्यांचा मोड होईल अशी आशा वाटूं लागली व त्यानें इ. स. १७०५ पर्यंत पन्हाळा, वर्धनगड, चंदनवंदन, खेळणा, सिंहगड, राजगड, तोरणा, वगैरे किल्ले एकामागून एक सर केले. त्या सालीं त्यास विजापूर प्रांतीं जावें लागलें. कारण त्या प्रांतीं वाकिनखेडें येथें पिऱ्या नाईक यानें इतका गोंधळ उडवून दिला कीं, तो औरंगजेबाच्या मोठमोठ्या सर-दारांसही आवरेना. तेव्हां औरंगजेबानें स्वतः तिकडे जाऊन वाकिनखेडें हस्त-गत केलें. परंतु इकडे मराठ्यांनीं त्याच्या गैरहजेरींत जोराची उचल केली. सचिवानें सिंहगड, तोरणा, राजगड परत मिळविले. परशुराम त्र्यंबकनें वसंत-गड व सातारा घेतले, रामचंद्रपंतानें पन्हाळा व पावनगड सर केले. अशा रीतीनें औरंगजेबानें मोठ्या श्रमानें केलेली खटपट व्यर्थ गेली. अखेर इ. स. १७०६ च्या प्रारंभीं तो आजारी पडून अहमदनगरास गेला. मराठ्यांस जिंकण्याविषयीं तो आतां निराश झाला व शेवटीं इ. स. १७०७ फेब्रुवारी ता. २० रोजीं मोठ्या निराशेंत मृत्यु पावला.

**१० पराजयाची मीमांसा :**—औरंगजेबाच्या मृत्यूमुळें मोगलांबरोबर इ. स. १६८१ पासून चालू असलेलें युद्ध खलास झालें. वास्तविक मोगल व मराठे यांची ही झटापट इ. स. १६६१ त प्रथम शाइस्तेखान दक्षिणेंत आल्यापासून चालू होती. मराठी राज्याची स्थापना होऊन तें अगदीं बाल्यावस्थेंत असतां त्याला एक-सारखें ४७ वर्षें औरंगजेबासारख्या संपन्न व सामर्थ्यवान् शत्रूशीं तोंड द्यावें लागलें व त्यांत शेवटीं मराठ्यांचा विजय झाला. पैकीं पहिल्या वीस वर्षांत

मिळालेल्या विजयाचें श्रेय प्राधान्येंकरून शिवाजीच्या असामान्य कर्तृत्वासच दिलें पाहिजे. पण पुढील सत्तावीस वर्षांत मराठे मोगलांविरुद्ध विजयी झाले. याचीं कारणें अनेक आहेत. (१) संभाजीच्या वधामुळें मराठ्यांमध्यें चेव उत्पन्न होऊन त्यांची राष्ट्रीय भावना जागृत झाली, व या राष्ट्रीय भावनेनें व माधेपणानें लढणाऱ्या मराठ्यांनीं बादशहाच्या हुकुमावरून दिमाखानें रेंगाळत रेंगाळत लढणाऱ्या भाडोत्री शिपायांस नामोहरम केलें. (२) औरंगजेबानें विजापूर व गोवळकोंड्याचीं राज्यें काबीज केल्यामुळें त्यांच्या सैन्यांतून फुटलेले सर्व लोक मराठ्यांस सामील झाले, मराठ्यांना नर्मदेपासून जिंजीपर्यंत मोकाट हिंडण्यास मैदान मोकळें सांपडलें. (३) एकसारखीं २५ वर्षे बादशाही फौज दक्षिणेंत राहिल्यामुळें शिपाई व सरदार अगदीं टेकीस आले होते. त्यांची एक पिढीच्या पिढी छावणींत लहानाची मोठी झाली. (४) बादशाही सरदारांत आपसांत वैमनस्य असल्यामुळें एकमेकांचें चांगलें सहकार्य होत नसे. कित्येक वेळां एक सरदार दुसऱ्याविरुद्ध मराठ्यांस आंतून सामील असे.

**११ कालखंडाची समाप्ति :**—असो. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर झालेला बादशहा बहादूरशहा यानें संभाजीचा मुलगा शिवाजी (शाहू) यास सोडून दिलें. नंतर शाहू व ताराबाई यांच्यामध्यें युद्ध होऊन शाहू विजयी झाला व त्यानें साताराची गादी बळकाविली. औरंगजेबाच्या मृत्यूनें मोगलांच्या सत्तेस उतरती कळा लागली व मराठ्यांची सत्ता उत्तरोत्तर अधिकाधिक भरभराटीस आली, म्हणून इ. स. १७०७ सालीं हिंदुस्थानच्या इतिहासांतील, मोगलाच्या भरभराटीचा व मराठ्यांच्या राज्यस्थापनेचा कालखंड समाप्त होतो व पुढें नव्या कालखंडास सुरुवात होते.

---

# भाग ७ वा

# अठराव्या शतकांतील साम्राज्यांचे अस्तोदय

## (इ. स. १७०७ ते इ. स. १८०५)

**१ औरंगजेबाच्या मृत्यूनंतरची स्थिति :**—औरंगजेबाच्या मृत्यूनंतर उत्तरेंतील मोगल बादशाहींत जोर राहिला नाहीं. कोणाही कर्तबगार व पराक्रमी पुरुषाच्या हातांतील कळसूत्री बाहुल्याप्रमाणें बादशाहीची स्थिति झाली. निरनिराळ्या प्रांतांतील सुभेदार नांवाला दिल्लीपतीची ताबेदारी पतकरून स्वतंत्रपणें कारभार करूं लागले. मराठेशाहीचा जम बसत चालला. बादशाहीचा कमजोरपणा पाहून मराठे सरदारांच्या महत्त्वाकांक्षा वाढूं लागल्या. सुमारें दोनशें वर्षें बंद असलेल्या वायव्येकडील सरदारांच्या स्वाऱ्या पुन्हां होऊं लागल्या, शीखांची सत्ता वाढीस लागली व परदेशचे व्यापारी प्रांताप्रांतांतील सुभेदारांचा कमी अधिक जोर पाहून निर्भयपणें राजकारणांत शिरूं लागले. इ. स. १७०७ मध्यें औरंगजेब मृत्यु पावला. तेव्हांपासून इ. स. १८०३ मध्यें इंग्रजांनीं दिल्लीचें तख्त काबीज करीपर्यंत हिंदुस्थानांत निरनिराळ्या सत्ता उदयास येऊन त्यांनीं साम्राज्यसत्ता आपल्या हातीं घेण्याचे यत्न केले. या जवळ जवळ शंभर वर्षांचें पुढीलप्रमाणें भाग पाडतां येतील.

**२ कालविभाग :**—(अ) १७०७–१७४८या काळांत मराठ्यांनीं स्वतःच्या मुलुखांतील आपला पाय पक्का रोविला. मोगलांच्या ताब्यांतील दक्षिणच्या सहा सुभ्यावर चौथाईचा हक्क पूर्णपणें बजाविला व दिल्लीच्या राजकारणांत शिरण्याच्या उद्देशानें शिंदे, होळकर माळव्यांत ठाणें देऊन बसले. इंग्रज, फरेंच इत्यादि पाश्चिमात्य लोक व्यापारांत गुंतले होते. नादिरशहा अबदालीच्या स्वाऱ्यांनीं बादशाही अधिक खिळखिळी झाली. पंजाबांत शीखांचीं लहान लहान संस्थानें उदयास आलीं.

(आ) १७४८–६४ पूर्व व दक्षिण म्हणजे बंगाल व कर्नाटक प्रांतांत इंग्रजांचा झगडा होऊन इंग्रज विजयी झाले. बंगालच्या सुभेदाराची सत्ता मोडून इंग्रजांचा पाय बंगालमध्यें पक्का रुजला व मराठ्यांच्या पाठबळाच्या

अभावीं बादशहा, अयोध्येचा वजीर व बंगालचा सुभेदार इत्यादि मुसलमान सत्ताधीशांना इंग्रजांचा पाडाव करतां येत नाहीं हें सिद्ध झालें. मराठ्यांनीं अयोध्येच्या वजीरास हाताशीं धरुन दिल्लीच्या राजकारणांत आपला हात घातला, पण अदूरदर्शी धोरणामुळें रजपुतांशीं वैर संपादलें; व शेवटी सर्व मुसलमानांनीं एक होऊन मराठ्यांचा पराभव केला. आरमाराच्या बावतीं-तील अदूरदर्शी धोरणामुळें मराठ्यांच्या आरमारी सत्तेंत फूट पडली व इंग्रज पश्चिम किनाऱ्यावर निर्भय झाले.

(इ) १७६४–९५ पानपतच्या धक्क्यामुळें मराठे कमजोर झाले, ही संधि साधून हैदरअल्लीचा म्हैसूर येथें उदय झाला व पुढील चाळीस वर्षात तो व त्याचा मुलगा टिपू ह्यांनीं आपली सत्ता वाढविण्याचे अवि-श्रांत श्रम केले, परंतु इंग्रजांच्या वाढत्या सत्तेमुळें व मराठ्यांचा पुन्हां जम बसल्यानें ते फुकट गेले. मराठ्यांनी पानिपतच्या धक्क्यामुळें खचून न जातां, दिल्लीची सत्ता हातीं घेण्याचें उद्दिष्ट डोळ्यांपुढें ठेवून अविश्रांत श्रमानें शेवटीं तें साध्य केलें; परंतु मराठ्यांच्या राज्यविस्ताराबरोबर मराठे सर-दारांत फूट उत्पन्न झाली. इंग्रजांच्या राज्यकारभारांत अधिकाऱ्यांच्या अतिलोभामुळें भयंकर अव्यवस्था माजली, दुष्काळ पडला; परंतु लवकरच विलायत सरकारच्या मदतीनें विस्कटलेली घडी त्यांनीं पुनः बसविली; आणि मराठे व हैदर यांच्याशीं वेळोवेळीं तोंड देऊन आपली सत्ता कायम राखिली

(ई) १७९५–१८०५ मराठेशाहींत अनेक कर्तबगार पुरुष मृत्युमुखीं पडले व राहिले त्यांचें पुढील अंदाधुंदींत तेज पडेनासें होऊन आपसांतील दुहीमुळें इंग्रजांशीं युद्धप्रसंग झाला. तेवढ्या काळांत इंग्रजांनीं हिंदुस्थानां-तील इतर लहान लहान सत्ताधीशांना आपल्या कह्यांत राखून मराठ्यांशीं लढण्यास ते सिद्ध झाले व शेवटीं विजयी झाले.

मोगली साम्राज्याचा एकीकडे अस्त होत असतां, दुसरीकडे मरा-ठ्यांचा उदयास्त व हैदरटिपूंचा उदयास्त होऊन शेवटीं इंग्रजांचा उदय झाला, म्हणून या कालखंडास '**साम्राज्यांचे अस्तोदय**' हें नांव दिलें आहे.

---

# भाग ८ वा

# मोगलाईचा ऱ्हास व पेशवाईचा उदय

## (इ. स. १७०७–१७२०)

**१ बहादुरशहा** :—औरंगजेबाच्या मुलांपैकीं अकबर १७०४ त इराणांत मेला व मुअज्जम ऊर्फ शहाअलम, अजीम व सर्वांत धाकटा कामबक्ष हे हयात होते. औरंगजेबाच्या मृत्युसमयीं मुअज्जम काबूल येथें होता ; तो मोठ्या वेगानें आग्र्यास येऊन पोहोंचला व बहादुरशहा हें नांव धारण करून गादीवर बसला. त्याचा प्रतिस्पर्धी अजीम हा दक्षिणेंतून उत्तरेस येत असतां बहादुरशहानें त्यास ठार मारलें.

**२ शाहूची सुटका** :—बहादुरशहा हा कर्तबगार नसला तरी धोरणी होता. कर्तबगार सरदारास आपल्या बाजूस राखून ठेवण्याचा त्यानें यत्न केला. झुल्फिकरखान व मुन्यमखान हे राज्यांतील सारख्याच तोलाचे सरदार पाहून त्यानें मुन्यमखानास वजिरी देऊन झुल्फिकरखानास वकील-इ–मुत्लक[१] ही नवीन पदवी दिली. परंतु वरिष्ठ अधिकार कोणाचा हें त्या वेळींच ठरविलें नसल्यामुळें भांडणाचें मूळ मिटलें नाहीं. रजपुतांशीं त्याचें सलोख्याचें धोरण होतें. त्यानें अजितसिंहाचा जोधपूरच्या गादीवरील हक्क कबूल केला. इतक्यांत बहादुरशहाला दक्षिणेच्या बंदोबस्तास जाणें जरूर पडलें. दक्षिणेंत जाऊन त्यानें कामबक्षाचा हैद्राबादेनजीक पराभव केला (इ. स. १७०८). पुढें लवकरच कामबक्ष मृत्यु पावला. मराठ्यांच्या गादीवर या वेळीं राजारामाचा मुलगा दुसरा शिवाजी हा राज्य करीत होता. इ. स. १६८९ त संभाजीच्या वधानंतर औरंगजेबानें त्याची बायको येसूबाई व मुलगा शाहू ह्यांना कैद केलें होतें. त्यांना सोडून दिल्यास मराठ्यांमध्यें शिवाजी व शाहू यांच्यांत राज्याच्या हक्कासंबंधानें दुफळी उत्पन्न होईल

---

१ टीप :—मराठ्यांच्या अमदानींत देखील प्रल्हाद निराजीस खूष करण्याकरितां पेशव्यांच्या तोलाची अशी 'पंतप्रतिनिधि' ही पदवी देण्यांत आली. परंतु त्यामुळें पुढें पुष्कळ वाद उपस्थित झाले.

असें वाटून बहादुरशहानें शाहूस सोडून दिलें व त्याजबरोबर मोगलांविरुद्ध लढणार नाहीं असा करार करून घेतला; व त्याच्या आईस–येसूबाईस–घेऊन तो उत्तरेला निघून गेला. दक्षिणच्या सुभेदारीचें काम त्यानें दाऊदखान पन्नी याजकडे सोंपविलें.

**३ बहादुरशहाचा मृत्यु, जहांदरशहा:**—उत्तरेला आल्यावर शीखांच्या बंडाळीचें वृत्त ऐकून तिकडे बहादुरशहा बंदोबस्तास गेला. त्यांचा बंदोबस्त केल्यावर तो लवकरच मृत्यु पावला (इ. स. १७१२). त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या चौघा मुलांत युद्ध होऊन त्यांत जहांदरशहास झुल्फिकरखानाचें साह्य असल्यामुळें तो विजयी झाला (मार्च १७१२). परंतु तो फार दिवस राज्यावर टिकला नाहीं. जहांदरशहाचा पुतण्या फर्रुखसियर बंगालचा सुभेदार होता. त्यास हुसेन सय्यद व अबदुल्ला सय्यद ह्या दोघा कर्तृत्ववान सय्यद बंधूंचें साह्य होतें. त्यांच्या मदतीनें फर्रुखसियर आग्र्याकडे निघाला व त्यानें इ. स. १७१३ त जहांदरशहाचा पराभव करून आपण बादशहा बनला.

**४ फर्रुखसियर** (१७१३–१७१९):—फर्रुखसियर हा हलक्या कानाचा व चंचल स्वभावाचा होता. गादीवर आल्यावर त्यास सय्यद बंधूंचा जाच दुस्सह होऊन तो त्यांच्या नाशाची खटपट करूं लागला. वास्तविक यांत त्याची चूक नव्हती. कारण अकबरानें बहरामखानास व औरंगजेबानें मीरजुम्ल्यास ते डोईजड होतील म्हणून दूर केलें. तसें फर्रुखसियरनें करण्याचा यत्न केला. परंतु तो सिद्धीस नेण्याची अंगांत धमक नसल्यामुळें सय्यद बंधूंचीं मनें दुखावलीं गेलीं व शेवटीं त्याचाच खून झाला.

**५ सय्यद बंधूंशीं वैर:**—परंतु त्याच्या कारकीर्दीच्या आरंभीं मात्र सर्व सत्ता दोघा सय्यद बंधूंच्या हातीं होती. त्यांतील अबदुल्ला सय्यद हा राजधानींत राहात असे व हुसेन सय्यद हा दूरच्या मोहिमा करी. प्रथम प्रथम फर्रुखसियरनें त्यास रजपुतांचा बंदोबस्त करण्याची सल्ला दिली. पण त्याबरोबर अजितसिंगास गुप्तपणें हुसेनला ठार मारण्याचा निरोप पाठविला! औरंगजेब दक्षिणेंत गेल्यापासून रजपूत हे बरेच धीट झाले होते व त्याच्या मृत्यूनंतर त्यांनीं एकत्र होऊन अजमीरवर हल्ला केला व राजपुतान्यांतील मोगलांचें ठाणें उठवून लावलें. तेव्हां रजपुतांच्या बंदोबस्तासाठीं

हुसेनअल्ली चालून आला. जोंपर्यंत रजपूत एकत्र होते तोंपर्यंत त्यांनीं हुसेन-अल्लीस दाद दिली नाहीं. परंतु इ. स. १७१४ त त्यानें अजितसिंहास एकटा गांठून त्यावर हल्ला केला व त्याचा मेडतें येथें पराभव केला. तेव्हां अजित-सिंह शरण आला. या सर्व प्रकरणांत हुसेनअल्लीच्या शौर्यापेक्षां अजित-सिंहाच्या कमकुवतपणाचाच प्रकार अधिक दिसून येतो.

**६ सय्यद् मराठ्यांचें सख्य :**—रजपुतांवर विजय मिळवून हुसेन परत आल्यावर बादशहास कसेसेंच वाटलें. परंतु बाह्यात्कारीं त्यानें आनंद दर्शविला व त्यास दक्षिणचा बंदोबस्त करावयास जाण्याची भर दिली; व दक्षिणेंत बऱ्हाणपूर येथील अधिकारी दाऊदखान ह्यास हुसेनचा नाश करण्याची आंतून भर दिली. हुसेन दक्षिणेंत आल्यावर बऱ्हाणपूरनजीक लालबाग येथें त्यानें दाऊदखानाचा पराभव करून त्यास ठार मारलें. ती बातमी कळतांच बादशहा आंतून मराठ्यांशीं संधानें करूं लागला. हुसेनला बाद-शहाचा संशय येऊं लागलाच होता. इतक्यांत त्यास कळलें कीं, फर्रुखसियर आपला भाऊ अबदुल्ला सय्यद ह्यास वजिराच्या पदावरून काढून टाक-ण्याच्या विचारांत आहे. त्याबरोबर त्यानेंही मराठ्यांशीं सख्य करण्याचा विचार केला व लवकरच त्यांच्या मदतीनें मोठें राजकारण घडवून आणिलें. ह्या राजकारणाचें स्वरूप समजण्यास मराठ्यांच्या दरबारांतील घडामोडी कळणें जरूर आहे.

**७ शाहू व ताराबाई :**—शाहू नर्मदा उतरून दक्षिणेस सातारचे रोखानें निघाला.[1] वाटेंत त्यास कांहीं मराठे सरदार मिळाले. शाहू येतो हें पाहून ताराबाईस मोठें वैषम्य वाटलें, कारण तिला आपल्या मुलास हातीं धरून राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा होती. तिनें हा शाहू नसून कोणी तोतया आहे असें जाहीर केलें. परंतु ही स्थिति फार वेळ टिकली नाहीं. शाहू खरा असल्याबद्दल लोकांची खात्री पटली व खंडो बल्लाळ व धनाजी जाधव यांसारखे सरदार त्यास मिळाले. त्यानंतर तो ताराबाईचा पाठलाग करीत थेट कोल्हा-

---

१ टीप :—नर्मदा उतरून दक्षिणेकडे येत असतां ताराबाईच्या पक्षाविरुद्ध त्यास पहिला विजय पारद येथें मिळाला. त्या वेळीं एका पाटलाच्या बाईनें आपलें मूल शाहूच्या पदरीं घातलें. तो शुभ शकून समजून शाहूनें त्याचें नांव फत्तेसिंग भोसलें असें ठेविलें.हाच अक्कलकोट घराण्याचा मूळ पुरुष होय.

पुरापर्यंत गेला. परंतु त्याच्या दैवानें पलट खाल्ली. कारण धनाजी जाधव मृत्यु पावला व त्याच्यामागून त्याचा मुलगा चंद्रसेन जाधव हा ताराबाईस जाऊन मिळाला व त्यानें आपल्याबरोबर दुसरेही कित्येक सरदार फितविले. आतां शाहू मोठ्या पेचांत पडला. अशा वेळीं त्याची पाठराखण करून त्यास फिरून विजय प्राप्त करून देणारा पुरुष बाळाजी विश्वनाथ भट हा होय.

## पेशवा बाळाजी विश्वनाथ

### ( इ. स. १७१३–२० )

८ **बाळाजी विश्वनाथाचा उदय :**—बाळाजी विश्वनाथ हा कोकणांतील श्रीवर्धनचा देशमुख. श्रीवर्धन त्या वेळी सिद्दी लोकांच्या ताब्यांत होतें. सिद्दी व आंग्रे यांचीं प्रसंगोपात्त युद्धें होत. एके काळी बाळाजीचा थोरला भाऊ जानोजी हा आंग्र्यांस सामील असल्याचे आरोपावरून सिद्द्यानें त्याचा छळ केला. तत्पूर्वींच बाळाजी विश्वनाथ हा देशावर नशीब काढण्याकरितां म्हणून आला होता. त्याचेबरोबर दुसरें एक घराणेंही निघालें. तें भानूंचें होय. त्याच्याच वंशांत पुढें नाना फडणवीस हा पुरुष प्रसिद्धीस आला. शिवाजीच्या कारकीर्दीचीं शेवटचीं वर्षें, संभाजी, राजाराम व दुसरा शिवाजी ह्या सर्वांच्या कारकीर्दी बाळाजीनें पाहिल्या होत्या. देशावर आल्यावर त्यानें धनाजीची नोकरी पतकरली; व तो लवकरच सरसुभेदाराच्या पदास चढला व शाहूनें धनाजीच्या मृत्यूनंतर त्यास वसुली खात्यावर मुख्य नेमलें. यानंतर पुढील काळांत बाळाजीनें मोठा मुत्सद्दीपणा दाखवून शाहूचा पक्ष उचलून धरला.

९ **पेशवाईपदाची प्राप्ति :**—प्रथम त्यानें ताराबाई व तिचा मुलगा शिवाजी यांचेविरुद्ध राजारामाची दुसरी बायको राजसबाई व तिचा मुलगा संभाजी यांना चिथविलें. राजसबाई ही असंतुष्ट असल्यामुळें तीही ताराबाईविरुद्ध लढण्यास तयार झाली व पुढें तिनें लवकरच अनेक सरदारांच्या साहयानें ताराबाई व तिचा मुलगा शिवाजी ह्यांस पन्हाळगडावर कैद केलें (इ. स. १७१२). शिवाजी पुढें इ. स. १७२६ त मेला. ह्याचाच मुलगा रामराजा पुढें शाहूनंतर छत्रपति झाला. ताराबाईच्या पक्षाचा याप्रमाणें मोड

केल्यावर बाळाजीनें विरोधी सरदार लोकांपैकीं कृष्णराव खटावकरां-सारख्या प्रबलांशीं युक्तीनें स्नेह जोडून शाहूचें आसन स्थिर केलें. या कामीं बाळाजीच्या अंगचा मुत्सद्दीपणा व हुशारी शाहूस पूर्णपणें दिसून आल्यावरून शाहूनें इ. स. १७१३ त त्यास पेशवाईचें पद दिलें.

**१० चौथाईचा हक्क** :—शाहूच्या पक्षास बळकटी आणली तरी बाळाजीचें कार्य तेवढ्यानें संपलें नाहीं. मोगलांचेकडे गेलेले सरदार व कोल्हापूरकर संभाजी हे अद्याप त्रास देत होतेच. दिल्लीच्या बादशहातर्फे प्रथम दाऊदखान पन्नी हा दक्षिणचा सुभेदार होता. त्यानें मराठ्यांचा त्रास चुकविण्याकरितां मोगलांच्या ताब्यांतील दक्षिणच्या सहा सुभ्यांवरील त्यांचा चौथाईचा हक्क व स्वराज्यावरील मालकी हक्क हे कबूल केले होते. परंतु पुढें त्याच्या जागीं निजाम असफज्हा हा अधिकारावर आला. त्यानें मुद्दाम राजसबाई व संभाजी यांना हाताशीं धरून 'मराठ्यांच्या राज्याचा खरा वारस कोण तें ठरवा मग चौथाईचे हक्क कबूल करतों' असें बोलणें लाविलें ; व खुद्द पुणें प्रांतींच अम्मल बसविण्याचा घाट घातला. या सर्वांस तोंड देण्याची बाळाजीनें तयारी चालविली. इतक्यांत बाळाजीच्या सुदैवानें दिल्लीस बादशहाजवळ प्रबळ झालेल्या सय्यद बंधूंनीं निजामास परत बोलाविलें व त्याऐवजीं हुसेनअल्ली हा दक्षिणचा सुभेदार झाला (इ. स. १७१५).

**११ सय्यद व मराठे यांचा करार** :—त्यानें बादशहाचें दुटप्पी धोरण पाहून मराठ्यांशीं स्नेहभावाचें वर्तन सुरू केलें; व पुढील करार ठरविला व तो बादशहाकडून मान्य करून देण्याचें कबूल केलें. तो करार असाः— (१) शिवाजीच्या वेळचें सर्व राज्य बादशहानें शाहूच्या हवालीं करावें. (२) मराठ्यांनीं नवीन जिंकलेले खानदेश, वऱ्हाड, कर्नाटक ह्या भागांतील प्रदेश स्वराज्यांत सामील करावे. (३) मोगलांच्या ताब्यांतील दक्षिणच्या सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखीचे हक्क वसूल करण्याची परवानगी मराठ्यांस असावी. (४) चौथाईच्या बदल्यांत मराठ्यांनीं पंधरा हजार फौज बादशहाचे मदतीस ठेवावी व सरदेशमुखीबद्दल प्रांतांतील चोऱ्या वगैरेंचा बंदोबस्त करावा. (५) मराठ्यांनीं दरसाल बादशहास दहा लक्ष रुपये खंडणी द्यावी. (६) शाहूची मातुश्री येसूबाई व इतर मंडळी यांना बादशहाच्या कैदेंतून सोडून स्वदेशीं पावतें करावें. (७) कोल्हापूरच्या संभा-

जीस शाहूनें उपद्रव देऊं नये. हा करार श्री. सरदेसाई म्हणतात त्याप्रमाणें उभयपक्षीं फसवाफसवीचा प्रकार होता. खरोखर चौथाई घेऊन मोगलांच्या दक्षिणेंतील मुलुखाचें रक्षण करणें म्हणजे तेवढ्यापुरतें तरी बादशहानें मराठ्यांच्या संरक्षणाखालीं जाणें होय. परंतु मराठ्यांनीं खंडणी देऊन बादशाही सत्ता ही साम्राज्यसत्ता होय असा वरवर देखावा कायम ठेवला. एकंदरींत हा करार मराठ्यांस फार फायद्याचा होता; व त्यामुळें शाहू व बाळाजी यांच्या पक्षास चांगलेंच वजन आलें. कोल्हापूरकर व इतर मराठे सरदार कांहीं काळ मागें पडले.

**१२ फर्रुखसियरचा खून** :—इकडे सय्यदांनीं केलेला हा करार बादशहास न आवडल्यानें तो सय्यदांच्या नाशार्थ ठिकठिकाणच्या फौजा एकत्र करूं लागला. तेव्हां हुसेन अल्लीही मराठ्यांतर्फे बाळाजीस घेऊन आपल्या बधूचे संरक्षणार्थ दिल्लीस येऊं लागला; तें पाहून बादशहा घाबरला व त्यानें मराठे माळव्यापर्यंत येऊन पोहोंचले नाहींत, तोंच त्यांच्या सर्व मागण्या कबूल केल्या; परंतु मराठ्यांस येसूबाईची सुटका करून घेणें जरूर होतें; व सय्यदांसही बादशहाचा पुरता बंदोबस्त करणें जरूर होतें; लवकरच मराठ्यांच्या फौजा दिल्लीस वावरूं लागल्या. हें तेथील मुसलमानांस आवडलें नाहीं. त्यांच्या व मोगल फौजेच्या रस्त्यांत चकमकी उडाल्या. सय्यदांनीं लवकरच राजधानींत आपली सत्ता स्थापन केली; व फर्रुखसियरचा खून केला. नंतर अनेक भानगडी होऊन बहादुरशहाचा तिसरा नातू रोशनअख्तर ह्यास त्यांनी बादशहा केलें. त्याची कारकीर्द मात्र इ. स. १७१९–४८ पर्यंत टिकली. सय्यदांची कामगिरी संपवून बाळाजी येसूबाईसह परत सातान्यास आला (इ. स. १७१९). अनेक वर्षांच्या बंदिवासांतून येसूबाई परत दक्षिणेंत आली व तिनें आपल्या पुत्रास सिंहासनावर पाहिलें तेव्हां तिला प्रेमाचें भरतें आलें.

**१३ चढाईच्या धोरणाचे परिणाम** :—बाळाजीच्या या उद्योगानें मराठ्यांच्या कर्तृत्वास नवीन दिशा लागली. आपआपसांत भांडत बसण्याचा काळ संपला. नवीन पराक्रम करण्यास क्षेत्र उत्पन्न झालें. अशा वेळीं सर्व मराठे सरदारांची नीट व्यवस्था लावून त्यांस सर्व कामें वांटून देण्याचें जबाबदारीचें काम बाळाजीनें आपल्या शक्तीप्रमाणें तडीस नेलें. राजारामाच्या

कारकीर्दींत मराठेशाहीवर भयंकर संकट उत्पन्न झालें. त्या वेळीं वतनांचें व इनामांचें आमिष दाखविल्यामुळें अनेक फौजबंद मराठे सरदार राष्ट्राचें रक्षण करण्यास पुढें आले. पुढें संकटनिवारण झालें तरी जहागिरीची एक-वार लागलेली चटक नाहींशी झाली नाहीं. बाळाजीनेंही या सर्व सरदारांस जहागिरी दिल्या. कान्होजीस कोंकण प्रांताकडे याच तत्त्वावर कायम केलें. खंडेरावास खानदेशीं जहागीर दिली व गुजराथ काबीज केल्यास तेथेंही जहागीर देण्याचें कबूल केलें. परसोजी भोसल्यास वऱ्हाड प्रांत दिला. उदाजी पवारास माळवा, फत्तेसिंग भोसल्यास कर्नाटक, प्रतिनिधीस निरा व वारणा यांजमधील मुलूख याप्रमाणें वांटणी केली. त्याच्या अटी अशा :—

(१) आपापल्या जहागिरींतील मुलुखाची स्वतंत्रपणें व्यवस्था करावी, (२) ठराविक खंडणी सरकारांत भरत जावी, (३) सरकारचे हुकुमाप्रमाणें ठराविक फौज घेऊन स्वारीवर हजर राहावें, व (४) जहागिरीच्या उत्पन्नाचे हिशेब तपासण्याचा मध्यवर्ति सरकारास हक्क असावा. या पद्धतीस सरंजामी पद्धत म्हणतात. यामध्यें प्रत्येक सरदारास आपली जहागीर वाढविण्याचें आमिष असल्यानें पुढील पन्नास पाऊणशें वर्षांत मराठी राज्याचा झपाट्यानें प्रसार झाला. परंतु कालांतरानें मराठे सरदार मध्यवर्ती सत्तेस जुमानीनातसे झाले व पुढें पुढें त्यांच्यामध्येंच वैमनस्यें उत्पन्न झालीं. शिवाजीची अष्टप्रधानांची पद्धत नाहींशी झाली व पेशव्यांचें महत्त्व जास्त वाढलें.

**१४ वसुलाची वांटणी** :—बाळाजीनें आलेल्या वसुलाची वांटणी पुढील-प्रमाणें लावून दिली. सरदेशमुखी म्हणजे एकंदर वसुलाचा दहावा हिस्सा. ह्यावर गादीच्या मालकाखेरीज इतर कोणाचाही हक्क नसे. चौथाई म्हणजे एकंदर वसुलाचा चौथा हिस्सा व स्वराज्यांतील वसूल हे एकंदर राज्याचें उत्पन्न होतें. यांतील शेंकडा २५ टक्के 'राजबाबत' म्हणजे राजाच्या खर्चाकरितां द्यावयाचे. ह्याखेरीज 'साहोत्रा' म्हणजे ६ टक्के पंतसचिव ह्यांचा व नाडगौडा म्हणजे ३ टक्के राजानें आपल्या इच्छेनुरूप वाटेल त्यास द्यावा. व बाकीचे शेंकडा ६६ उरले ते जहागिरदारास वांटून द्यावयाचे.

**१५ मृत्यु व योग्यता** :—बाळाजी इ.स.१७२० त सासवड येथें मृत्यु पावला. आपल्या आंगच्या कर्तबगारीनें कोंकणांतून येऊन तो एवढ्या उच्च पदास चढला.

स्वराज्यांत आंगच्या कर्तबगारीस कसें क्षेत्र मिळत जातें याचें बाळाजी हें उत्तम उदाहरण आहे. त्यानें मुख्यतः तीन कामें केलीं. (१) अनेक संकटांतही इमानीपणानें शाहूचा पक्ष उचलून धरून त्यास पुढें आणिलें. (२) दिल्लीचें राजकारण हातीं घेऊन मराठ्यांस मोठें कर्तृत्वक्षेत्र खुलें केलें व शिवछत्रपतीचें हिंदुपदपादशाही ध्येय गांठण्याचा मार्ग दाखविला. (३) शिवाजीच्या मृत्यूनंतर उत्पन्न झालेली अव्यवस्था नाहींशी करून शक्य त्या प्रकारची व्यवस्था त्यानें केली· पण शिवाजीच्या अष्टप्रधानांची पद्धत अंमलांत आणण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं. इनामांची लागलेली चटक त्यानें जहागिरी देऊन वाढीस लाविली हा त्याच्यावर मोठाच आक्षेप आहे. परंतु स्वराज्याचें साम्राज्य बनूं लागल्यावर दूरदूरच्या प्रदेशांवर अम्मल करण्यास अष्टप्रधानांची पद्धत त्या काळीं कितपत उपयोगी पडली असती याची शंका आहे; व दुसरें, त्यानें जहागिरीची पद्धत मोडूं म्हटलें असतें, तरी एकंदर सर्व फौजबंद सरदारांच्या विरोधापुढें त्यास हें कितपत शक्य झालें असतें याचीही शंका आहे. असो, त्यानें आपल्या हयातींत कर्तबगारीची शिकस्त केली व मराठ्यांची सत्ता उदयास आणली यांत मात्र बिलकूल शंका नाहीं.

---

## भाग ९ वा

# मोगल मोडले; मराठे चढले

### (इ. स. १७२०-४८)

## बादशहा महंमदशहा व छत्रपति शाहू

**१ मोगल दरबारचे पक्ष:**—सय्यद बंधूंच्या मदतीनें बहादुरशहाचा नातू रोशनअख्तर हा महंमदशहा हें नांव धारण करून गादीवर बसला. परंतु त्यासही सय्यदांचा जाच सहन झाला नाहीं. दरबारांत त्या वेळीं इराणी,

तुराणी, दुराणी व हिंदुस्थानी असे मुसलमान सरदारांचे चार पक्ष होते. सय्यद हे इराणी पक्षाचे मुख्य होते व निजाम तुराणी पक्षाचा पुढारी होता. दुराणी म्हणजे पठाण व हिंदुस्थानी म्हणजे हिंदुस्थानांत वाढलेले मुसलमान होत. इराणी व हिंदुस्थानी यांचा ओढा सामान्यतः हिंदुस्थानांतील लोकांकडे असे व तुराणी व दुराणी यांचा कल परकीय मुसलमानांकडे असे. औरंगजेबाच्या मृत्यूनंतर ह्यांपैकीं प्रत्येक पक्ष बादशहास आपल्या ताब्यांत ठेवण्याचा व मोगलाईचा कारभार आपल्या धोरणाप्रमाणें हांकण्याचा यत्न करी.

**२ निजाम उल्-मुल्क :**—महंमदाच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं इराणी व तुराणी हे दोनच पक्ष विशेष जोरांत होते. त्यांपैकीं तुराणी पक्षाचा मुख्य निजाम उल्–मुल्क यास सय्यदांचें मराठ्यांशीं संगनमत करण्याचें धोरण पसत नव्हतें. तो मोठा अनुभविक असून औरंगजेबाच्या तालिमेंत तयार झालेला होता. त्याचें घराणें औरंगजेबाच्या कारकीर्दीत हिंदुस्थानांत आलें. त्याचा जन्म इ. स. १६७१ त झाला. त्याचें मूळचें नांव मीर कमरुद्दीन असून इतिहासांत तो चिंकलीजखान,असफजहा व निजाम उल्–मुल्क इत्यादि नांवांनीं ओळखला जातो. फर्रुखसियरच्या कारकीर्दीत तो इ. स. १७१३–१५ पर्यंत दक्षिणचा सुभेदार असतांना त्यानें मराठ्यांच्यामध्यें कलागत लावून देण्याचा चांगलाच यत्न केला. मोगलाईच्या उत्तर कालांत मोगलाईस सावरून धरणारे जे कर्ते पुरुष होऊन गेले त्यांत निजाम उल्–मुल्क हा प्रमुख होय. मराठ्यांचा तो कट्टा शत्रु असून त्यांनीं दिल्लीच्या राजकारणांत हात शिरकविला हें त्यास मुळींच आवडलें नाहीं व 'अतःपर मराठे हे दिवसेंदिवस जास्त प्रबळ होत जाणार हें जेव्हां त्यास स्पष्ट दिसूं लागलें, तेव्हां कधीं उघड विरोध करून तर कधीं सलोखा दाखवून त्यांना अडथळा करण्याचा त्यानें कसून यत्न केला; परंतु एकामागून एक आलेल्या पराक्रमी पेशव्यांनीं त्याचें कांहीं चालू दिलें नाहीं.' तो मोठा धोरणी असे. फर्रुखसियरच्या मृत्यूनंतर सय्यदांचें वर्चस्व पाहून तो मुकाट्यानें अनुकूल संधीची वाट पाहात बसला.

**३ सय्यदांचा मोड :**—सय्यदांस प्रबळ विरोधी निजामच होता. तेव्हां त्याचा कांटा काढून टाकावा म्हणून त्यांनीं त्यास इ. स. १७२० त दक्षिणेस पाठविलें व तिकडे आपले सरदार दिलावरखान व अलम अलीखान यांना त्याचा परस्पर नाश करण्यास सांगितलें. परंतु निजामानें दोघांचाही वेग-

वेगळा पराभव करून सय्यदांविरुद्ध बंड केलें. त्यास शिक्षा देण्याकरितां हुसेनअल्ली निघाला व बादशहानें मागें कारस्थानें करूं नयेत म्हणून त्यासही आपल्याबरोबर घेतलें. परंतु बादशहा ह्या जुलुमास अगदीं कंटाळला होता. त्यानें तुराणी पक्षास मिळून हुसेन अल्लीस दग्यानें ठार मारलें व आपण दिल्लीस परत येऊन अबदुल्लाचाही मोड केला. अशा रीतीनें तो सय्यद बंधूंच्या जाचांतून मुक्त झाला (इ. स. १७२०). सय्यद बंधूंनीं एकामागून एक चार राजे दिल्लीच्या तख्तावर बसविले म्हणून त्यास 'किंगमेकर्स' असें म्हणतात.

**४ स्वतंत्र राज्याची स्थापना :**—सय्यदांच्या जाचांतून मुक्त झाल्यावर महंमदशहा निजामाच्या तंत्रानें चालता तर बादशाहीचा पुन्हां जम बसला असता. परंतु निजामाचा कडक स्वभाव दरबारी मंडळींस आवडेना. त्यानें राज्यकारभारांतील ढिलाई काढून टाकण्यास सुरवात केली. पण ही शिस्त महंमदशहास सहन न होऊन तो व त्याचे चैनी मित्र निजामाची भर दरबारांत टवाळी करूं लागले. निजामास या गोष्टीचा वीट येऊन त्यानें दक्षिणची वाट धरली (इ. स. १७२४). तेव्हांपासून त्यानें नांवाला बादशहाची ताबेदारी पतकरून जवळ जवळ स्वतंत्रपणें दक्षिणचा कारभार करण्यास सुरवात केली व औरंगाबादेहून आपलें ठाणें हलवून मराठ्यांपासून बरेंच दूर हैद्राबाद (भागानगर) येथें आपली राजधानी स्थापिली. याच सुमारास अयोध्येचा वजीर, बंगालचा नवाब व रोहिलखंडांतील रोहिले हेही आपआपल्या प्रांतांचा कारभार स्वतंत्रपणें पाहू लागले. अशा रीतीनें औरंगजेबाच्या मृत्यूनंतर फक्त सतरा वर्षांत त्याच्या साम्राज्याचे तुकडे पडण्यास सुरवात झाली.

## पेशवा बाजीराव

### ( इ. स. १७२०–१७४० )

**५ त्याचें धोरण :**—इकडे मोगली साम्राज्य याप्रमाणें मोडकळीस येत असतां मराठ्यांच्या सत्तेची चढती कमान होती. पेशवा बाळाजी विश्वनाथ हा मरण पावल्यावर शाहूनें त्याचा मुलगा बाजीराव यास पेशवाईचें पद दिलें व त्याचा पुढील पराक्रम लक्षांत घेतां शाहूनें पेशवाईच्या पदावर योग्य पुरुषाचीच निवड केली असें म्हणावें लागतें. कारण बाळाजीचें धोरण व कार्य

लक्षांत घेऊन त्याची जोपासना करण्याची धमक बाजीराव व त्याचा भाऊ चिमाजी अप्पा यांच्या अंगीं होती. बाजीराव तर केवळ पराक्रमाचा पुतळा होता त्याच्या वीस वर्षांच्या अधिकारांत त्यानें इतक्या मोहिमा केल्या कीं, त्याचें बहुतेक आयुष्य मोहिमा करण्यांतच गेलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. सर्व हिंदुस्थानभर तो विजेप्रमाणें चमकला. त्यानें लवकरच मराठ्यांच्या सामर्थ्याचा दरारा सर्वत्र बसविला. हिंदुपदपातशाहीचें ध्येय साध्य करण्यास दिल्लीचा कारभारच आपल्या हातीं घ्यावा अशी त्याची महत्त्वाकांक्षा होती व ती पार पाडण्याचें सामर्थ्यही त्याचे अंगीं होतें. असें म्हणतात कीं, एकदां शाहूचे दरबारीं पुढील कार्याचे धोरणाबद्दल वाद झाला, तेव्हां तो म्हणाला, " निजाम, नबाब इत्यादि लहान लहान सत्ताधीशांशीं भांडत बसण्यास अर्थ नाहीं. एकदम दिल्लीचाच रोख धरला पाहिजे. कारण मूळच उपटलें कीं, खांद्या आपोआप खालीं येतील. "

**६ शाहू व संभाजी :**—त्याच्या कारभाराचे स्थूल मानानें दोन भाग पडतात. इ. स. १७२०–३१ व १७३१–४०. पहिल्या भागांत त्यानें निजामानें हाताशीं धरून उठविलेल्या स्वकीय सरदारांचा मोड केला व व आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें व पुढील काळांत त्यानें आपलें ध्येय साध्य करण्याचा आटोकाट यत्न केला. निजामानें दक्षिणेंत आल्याबरोबर कोल्हापूरचा राजा संभाजी यास हाताशीं धरलें व मराठ्यांच्या चौथाईच्या हक्कास अडथळा करण्यास आरंभ केला. ' राज्याचे खरे वारसदार कोण ? शाहू कीं संभाजी ? हें अगोदर ठरवा मग चौथाईचा हक्क सांगा ' असें तो म्हणाला. या वेळीं बाजीराव स्वारीकरतां कर्नाटकांत गेला होता. तो निजामानें विघ्न उपस्थित केलें हें पाहून घाईघाईनें परत आला व त्यानें पालखेडच्या लढाईंत निजामाचा चांगलाच पराभव केला (इ. स. १७२८). त्यानंतर मुंगीशेवगांव येथें तह झाला. तेव्हां निजामानें संभाजीचा पक्ष सोडला व दक्षिणच्या सहा सुभ्यावर चौथाई गोळा करण्याचा मराठ्यांचा हक्क त्यानें कबूल केला. लवकरच प्रतिनिधीनें संभाजीचा मोड केला. संभाजीही शाहूच्या सरदारापुढें आपलें कांहींच चालत नाहीं हें पाहून तहास तयार झाला. या तहान्वयें संभाजीस वारणा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील मुलूख मिळाला. या तहास वारणेचा तह असें म्हणतात

(इ. स. १७३१). या तहानंतर संभाजीनें पेशव्यास विरोध करण्याचें सोडून दिलें. ताराबाई ही शाहूजवळच नजरकैदेंत राहिली. तरीपण दुहीचें बीज राहूं नये म्हणून पुढील पेशवा नानासाहेब यानें शाहूच्या मृत्यूनंतर सातारा व कोल्हापूरची गादी एक करण्याचा यत्न केला. परंतु तो शाहूच्या विरोधामुळें फुकट गेला. संभाजी इ. स. १७६० त वारला. त्याच्या वंशजांनीं संधि सांपडेल तेव्हां पेशव्यास विरोध करण्यास कमी केलें नाहीं.

**७ शिंदे, होळकर व पवार यांचा उदय**:—याप्रमाणें बाजीरावानें. निजामाचा प्रथम पाडाव केल्यावर त्यानें आपली दृष्टि उत्तरेकडे वळविली. माळव्यांत बाजीरावानें आपले दोन विश्वासू सरदार मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे हे पूर्वींच पाठवून दिले होते. पेशवाईत यांचा उदय कसा झाला हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मल्हारराव हा होळ म्हणून नीरेच्या कांठीं एक गांव आहे, तेथील पाटलाचा मुलगा. हा इ. स. १६९३ त जन्मला. तो लहानपणीं गरीबीमुळें मेंढ्या राखण्याचें काम करीत असे. पुढें त्यानें खानदेशांत आल्यावर पेशव्यांचा तिकडील सरदार बांडे याच्या पदरीं शिपाईगिरीची नोकरी पतकरिली व तेथें त्याची हुशारी पेशव्यांच्या लक्षांत आल्यावरून पेशव्यानें त्यास पांच हजार स्वारांचा मनसबदार केलें(इ.स.१७३२) व माळव्यांत ठेवून दिलें. तो इंदूर येथें राहूं लागला. दुसरा सरदार राणोजी शिंदे; याचे पूर्वज सातारा जिल्ह्यांतील कण्हेरखेडचे पाटील होत. राणोजीनें घरच्या गरीबीनें बाजीरावाजवळ हुजऱ्याची नोकरी पतकरली. पुढें त्याचा इमानीपणा दिसून आल्यावरून बाजीरावानें त्यास सैन्यांत जागा दिली व मल्हाररावाबरोबर त्यास माळव्यांत पाठविलें. तो उज्जयिनीस राहात असे. त्याच सुमारास तिसरें घराणें उदयास आलें तें पवारांचें होय. पेशव्यांनीं धार येथें त्यांची नेमणूक केली. यामुळें गुजराथेंतून माळव्यावर होणाऱ्या दाभाड्यांच्या स्वाऱ्यांस शह बसला. पुढें माळव्याची सनद मिळाल्यावर एकंदर खंडणीपैकीं पेशव्यानें ४५ टक्के, शिंदे व होळकर यांनीं प्रत्येकांनीं २२॥ टक्के व पवारांनीं १० टक्के घ्यावे, असा पेशव्यांनीं रिवाज पाडला. अशा रीतीनें माळव्यांत तिघांचे हितसबंध गुंतवून तिघांच्या धोरणांत एकसूत्रीपणा राखावा हा बाजीरावाचा यांत हेतु होता.

**८ माळव्याची सनद**:—यानंतर बाजीरावानें माळव्याच्या चौथाईची

सनद मिळविण्याची खटपट चालविली. उत्तरेकडून दक्षिणेकडे जाण्याचे बहुतेक मार्ग माळव्यांतूनच होते तेव्हां माळवा ताब्यांत आल्यास निजाम व दिल्लीचा बादशहा यांमधील दळणवळण तुटेल असाही त्यांत एक हेतु होता. इ. स. १७२८ त बाजीरावाचा भाऊ चिमाजी अप्पा यानें उज्जयिनी-नजीक सारंगपूर येथें माळव्याचा सुभेदार गिरिधरबहादूर याचा पराभव केला.

९ **छत्रसालास मदत :**—याच सुमारास बाजीरावास बुंदेलखंडांत महत्त्वाची कामगिरी आली. बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल याजवर मोगल सरदारांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या. छत्रसाल हा इ. स. १६४९ त जन्मला. त्याचा बाप चंपतराय यानें औरंगजेबास गादीवर बसण्याचे कामीं पुष्कळ साहाय्य केलें, परंतु औरंगजेबानें त्यास गुप्तपणें ठार मारविलें. तेव्हां छत्रसालास मोठे कठिण दिवस आले. इ. स. १६६५ त जयसिंगाच्या पदरीं नोकरी धरून तो दक्षिणेंत आला. तेथें शिवाजीचा पराक्रम पाहून त्यास मोगलांच्या नोकरीचा वीट येऊन त्यानें शिवाजीस मदत करण्याचें ठरविलें. परंतु शिवाजीनें त्यास उत्तरेस जाऊन तेथेंच राज्यस्थापनेचें कार्य करण्याचा सल्ला दिला. तेव्हां त्यानें हलके हलके बुंदेलखंडांत स्वतंत्र राज्याची स्थापना केली. महंमदशहाच्या कारकीर्दींत महंमदखान बंगष यानें छत्रसालावर एकसारख्या स्वाऱ्या केल्या. त्यांत छत्रसाल जेरीस येऊन त्यानें बाजीरावाची मदत मागितली. बाजीरावास उत्तरेच्या बाजूला आपला वचक जितका बसवितां येईल तितका हवाच होता. त्यानें छत्रसालास मदत करून बंगषाचा जैतपूरच्या लढाईंत पराभव केला (इ. स. १७२९). यामुळें वृद्ध छत्रसालाचें समाधान झालें. पुढें तो इ. स. १७३१ त मृत्यु पावला. तेव्हां मृत्यूसमयीं त्यानें आपल्या राज्यांपैकीं झांशीजवळचा सुमारें ५० लक्षांचा मुलूख मराठ्यांस दिला. येथें बाजीरावानें गोविंद बल्लाळ खेर (बुंदेले) यांची नेमणूक केली. यांच्याच वंशांत पुढें झांशीची राणी लक्ष्मीबाई ही प्रसिद्धीस आली.

१० **डभईची लढाई :**—निजामानें इ. स. १७२९ त बाजीरावाशीं सलोख्याचा तह केला तरी तो स्वस्थ बसला नव्हता. त्यानें दाभाड्यास बाजीरावाविरुद्ध चिथविलें. तेव्हांपासून तो स्वतंत्रपणें मुलुखगिरी करूं लागला. हें बाजीरावास कळतांच तो त्वरेनें गुजराथेंत चाल करून आला. त्याची व त्रिंबकराव दभाडे याची डभई येथें निकराची लढाई झाली. तींत त्रिंबक-

राव गोळी लागून पडला व बाजीरावास जय मिळाला. पुढें शाहूनें दाभाडे व बाजीराव यांमध्यें तह करून दिला व गुजराथचें निम्में उत्पन्न पेशवे व निम्मे दाभाडे यांनीं घ्यावें असें ठरविलें. त्रिंबकरावाच्या मागून त्याचा भाऊ यशवंतराव दाभाडे हा दाभाड्यांचा मुख्य झाला. परंतु तो कर्तृत्वहीन असल्यानें दाभाड्यांचा मुतालीक (मुतालीक म्हणजे मुख्य कारभारी) पिलाजी गायकवाड व त्याचे वंशज हेच गुजराथचा सर्व कारभार पाहूं लागले, व पुढें गुजराथेंत गायकवाड हे प्रमुख झाले.

**११ हिंदूंना डोकें वर काढण्याची संधि** :—याप्रमाणें इ. स. १७३१ पर्यंत निजामाचा पाडाव झाला. दाभाड्याचें पारिपत्य झालें, माळव्यांत प्रवेश होऊन तेथें स्वकीय सरदारांची स्थापना झाली व त्याच्याही पलीकडे झांशीस मराठ्यांचें निशाण रोविलें गेलें. ह्यामुळें शाहूच्या प्रधानमंडळांत बाजीरावास महत्त्व प्राप्त झालें. अकरा वर्षांपूर्वी त्यास पेशवाईपद मिळालें तेव्हां त्याच्या चढाईच्या धोरणाबद्दल श्रीपतराव प्रतिनिधि वगैरे मंडळींचीं मनें बरींच साशंक होतीं, परंतु एकामागून एक मिळालेल्या विजयामुळें या शंकांचें परस्पर निरसन झालें. बाजीरावास हे विजय न मिळते तर कदाचित् प्रतिनिधि किंवा सेनापति दाभाडे ही मंडळी आपोआप पुढें आली असती. दाभाड्यांशीं युद्ध हें स्वकीयांशीं युद्ध या दृष्टीनें वाईट खरें; परंतु मराठे मंडळाच्या जमावांतून फुटून स्वतंत्रपणें प्रबळ होऊं पाहाणारास वेळींच शासन करणें शाहूस व बाजीरावास अवश्य होतें. अकरा वर्षांच्या मुदतींत मोगल सुभेदारांचा पाडाव व बंडखोर सरदारांचा बंदोबस्त इतक्या गोष्टी साध्य झाल्या व उत्तरेकडील रजपूत, जाठ, बुंदेले वगैरे हिंदू मराठ्यांकडे 'हिंदुपदपातशाहीचे पुनरुद्धारक' या दृष्टीनें पाहूं लागले.

**१२ सिद्दी व पोर्तुगीज** :—इतकें झाल्यावर बाजीराव पुढील उद्योगास लागला. प्रथम त्यानें इ. स. १७३३–३६ पर्यंत जंजिऱ्याच्या सिद्द्यावर स्वाऱ्या करून त्याजपासून रायगड, तळें, घोसाळें इत्यादि ठिकाणें काबीज केलीं व सिद्द्यास आपला मांडलिक बनविलें. याच सुमारास पोर्तुगीजांनीं ठाणें जिल्ह्यांत धर्माचे बाबतींत मनस्वी जुलूम चालविला, त्याचा प्रतिकार करणें जरूर होतें. म्हणून बाजीरावाचा भाऊ चिमाजी आप्पा यानें मोठा पराक्रम करून त्यांचा वसईचा किल्ला व वसई काबीज केली (इ.स. १७३९);

व पोर्तुगीजांची त्या बाजूची सत्ता समूळ नाहींशी केली. (या वेढ्याचे प्रसंगीं चिमाजी आप्पाच्या हातीं एका पोर्तुगीज सरदाराची स्त्री सांपडली, तेव्हां त्यानें तिला मोठ्या सन्मानानें परत पाठवून दिलें.)

**१३ दिल्लीवर चाल :**—नंतर बाजीरावानें उत्तरेकडे आपला मोर्चा फिरविला. त्यानें इ. स. १७३७ त दिल्लीच्या रोखानें चाल केली. यापूर्वीच शिंदे होळकरांनीं दिल्लीचे आसपास लुटालूट करून बादशहास चैन पडूं दिलें नव्हतें. महंमदशहानें बाजीरावावर सैन्य पाठविलें, परंतु बाजीरावानें त्याचा पराभव केला. शेवटीं बादशहानें बाजीरावास तेरा लाख रुपये देऊन कसेंबसें वाटेस लाविलें. पण एवढ्यानें प्रकरण मिटलें नाहीं. पुढील वर्षी दिल्लीच्या बादशहाच्या मदतीस निजाम धांवून आला. परंतु बाजीरावानें त्याचाही भोपाळ येथें पराभव केला (इ. स. १७३७). तेव्हां निजामचा नाइलाज होऊन त्यानें बाजीरावाशीं तह केला. अशा रीतीनें नर्मदेपासून चंबळा नदीपर्यंतचा बहुतेक मुलूख काबीज करून बाजीराव दक्षिणेंत परत आला.

**१४ नादीरशहाची स्वारी :**—बाजीरावाच्या स्वाऱ्यांतून बादशहा मोकळा होतो तोंच त्याजवर दुसरें संकट आलें. तें म्हणजे इराणच्या नादीरशहाची स्वारी होय. त्यानें खैबरघाटांतून पंजाबांत येऊन पांच नद्या ओलांडल्या, लाहोरही काबीज केलें व पुढें चाल करून आला; तेव्हां कोठें महंमदशहा जागा झाला; व त्यास तोंड देण्याकरितां पानिपतनजीक कर्नाळ येथें तळ देऊन बसला. उभय पक्षांचें मिळून दहा लक्षांवर सैन्य होतें. ता. १३ फेब्रुवारी १७३९ रोजीं मोठें युद्ध होऊन मोगलांचा पराभव झाला. पुढें महंमदशहानें नादीरशहाशीं खंडणीबद्दल बोलणें सुरू केलें व तें सलोख्यानें मिटलें असतें. इतक्यांत दुर्दैवानें दिल्ली शहरांत अशी हूल उठली कीं, नादीरशहा मारला गेला. त्याबरोबर दिल्लीच्या लोकांनीं इराणी लोकांची कत्तल करण्यास सुरवात केली. हें नादीरशहास कळतांच त्यानें संतापानें लाल होऊन शहरभर सांपडेल त्याची कत्तल करण्याचा हुकूम दिला. सुमारें वीस हजार लोक मारले गेले. पुढें महंमदशहा हात जोडून डोळ्यांत आसवें आणून नादीरशहापुढें उभा राहिला व त्याची प्रार्थना केली. तेव्हां नादीरशहास वाईट वाटून त्यानें कत्तल थांबविली व परत निघाला. जातांना त्यानें सत्तर कोट रुपये किंमतीची लूट नेली. त्यांत बादशहाचें प्रसिद्ध मयूरासनही

नेलें. याखेरीज त्यानें उत्तम कारागीर बरोबर नेले. येथून पुढें सिंधूच्या पश्चिमेस मोगलांची सत्ता उरली नाहीं. पंजाब प्रांत उघडा पडला. शीखांची सत्ता वाढीस लागली व आणखी स्वाऱ्या करण्यास येणाऱ्यांस मोकळी वाट झाली.

१५ बाजीरावाचा मृत्यु व त्याची योग्यता :—नादीरशहाच्या स्वारीचें वृत्त दक्षिणेंत पोहोंचलें व तो दक्षिणेंत स्वारी करण्यास येणार अशी बातमी आली, तेव्हां बाजीराव मोठ्या तयारीनिशीं निघाला. त्याप्रमाणें तो जात असतां वाटेंत नर्मदेच्या कांठीं रावेर येथें मृत्यु पावला (ता. २८।४।१७४०). बाजीराव हा शिपाई गडी होता. दिल्लीस हिंदुपदपातशाही स्थापन करण्याचें ध्येय त्यानें सतत डोळ्यांपुढें ठेवून कार्य केलें. स्वराज्याचें साम्राज्य बनविणें ही त्याची फार मोठी कामगिरी होय. मुळाशीं घाव घातला कीं, खांद्या आपोआप गळून पडतील हें त्याच्या धोरणाचें सूत्र होतें. त्यांत त्याची धडाडी दिसून येते, परंतु त्यांत मुत्सद्दीपणा तितका दिसून येत नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. दिल्लीच्या रोखें प्रगति करतांना दक्षिणेचा पुरता बंदोबस्त व्हावयास पाहिजे होता तो त्यानें केला नाहीं. निजामाचा पराभव झाला पण मोड झाला नाहीं. मोगलांच्या अवशिष्ट सत्तेचें मूळ दिल्लीस होतें, परंतु मुळांत जोम नसून निजामासारखे सुभेदारच स्वतःच्या पायावर जोमदार बनले व त्यांनीं बादशाही उचलून धरली. निजामाचा पुरता पाडाव त्यानें केला नाहीं. किंबहुना पश्चिमेस सिद्दी व इंग्रज, पूर्वेस निजाम, अग्नयेस कर्नाटकचे पाळे-गार व फ्रेंच असा चहूंकडून दक्षिणेंत शत्रूंचा बुजबुजाट असतां त्यानें दिल्लीकडे धांव घेतली. यामुळें मराठ्यांची सत्ता विस्कळीतपणें सर्व हिंदुस्थानभर पसरली. तिला संघटित स्वरूप आलें नाहीं. पण याबद्दल बाजीरावास दोष देण्यापेक्षां त्याच्या पराक्रमास मुत्सद्दीपणाची जोड मिळाली नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. बाजीरावास बाळाजी, रघुनाथ व जनार्दन असे तीन व मस्तानीपासून झालेला एक समशेरबहाद्दर, असे चार पुत्र होते. शनिवारचा वाडा त्यानेंच बांधिला व उत्तरेकडील दरवाजास त्यानें दिल्लीदरवाजा हें नांव दिलें. यावरून त्याचें चढावाचें पादशाही धोरण व्यक्त होतें.

# पेशवा बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब

## ( इ. स. १७४०–१७६१ )

१६ **स्वकीय सरदारांचा बंदोबस्त** :—बाजीरावाच्या मृत्यूमुळें मराठ्यांच्या कार्यांत खंड पडला नाहीं. बाजीरावाचा वडील मुलगा नानासाहेब ह्या अगोदरपासून आपल्या चुलत्याबरोबर मोहिमेवर जात असे. तेथें त्याची हुषारी दिसून आली व शाहूनें त्यालाच पेशवा म्हणून पसंत केलें. बाजीरावाच्या मानानें त्यानें स्वतः मोहिमा अशा फारशा केल्या नाहींत; परंतु हाताखालच्या निरनिराळ्या सरदारांवर दाब ठेवून त्यांस हुकमतींत चालविणें हें त्यास चांगलें साधत असे. प्रथम माळव्याची सनद मिळविण्याचें अपुरतें काम पुरतें करावयाचें असें त्यानें ठरविलें. ह्याच सुमारास वऱ्हाड प्रांतांत अम्मल करणारा रघूजी भोसले हा शाहू व पेशवे यांचे हुकुमास न जुमानतां वाटेल तिकडे लुटालूट करीत होता. तो पराक्रमी होता. त्यानें बंगालचा सुभेदार अलिवर्दीखान याजवर एकसारख्या स्वाऱ्या करून त्यास जेरीस आणिलें. त्या वेळीं बंगाल प्रांतांत मराठ्यांचा दरारा फार बसला. हे सर्व पराक्रम वास्तविक मराठ्यांचेच. परंतु मध्यवर्ती सत्तेच्या धोरणास न जुमानतां केलेले. त्यास वेळेवर वठणीस न आणल्यास तो डोईजड होईल हें नानासाहेब जाणून होता. इकडे बादशहानेंही कांट्यानें कांटा काढावा तशी युक्ति योजिली. नानासाहेबानें रघूजीपासून बंगालचें रक्षण केल्यास मराठ्यांस माळव्याची सुभेदारी मिळेल असें सांगितलें. नानासाहेबानें लवकरच रघूजीवर स्वाऱ्या करून त्यास जेरीस आणलें व माळव्याची सनद मिळविली. पुढें शाहूनें भोसले व पेशवे यांचा तह करून दिला. त्यांत लखनौ, पाटणा, दक्षिण बंगाल व बहार या प्रांतांत खंडणी वसूल करण्याचा हक्क रघूजीस स्वतंत्र देण्यांत आला व अशा रीतीनें त्याच्या पराक्रमास क्षेत्र उत्पन्न करून दिलें. भोसले, दाभाडे यांच्यासारख्या मराठे सरदारांशीं युद्ध करण्याचा प्रसंग येणें ही गोष्ट मराठ्यांच्या मुत्सद्दीपणास कमीपणा आणणारी आहे. हिंदुपदपातशाहीचें ध्येय डोळ्यांपुढून बाजूस होऊन स्वतःचा स्वार्थ बळावत चालल्याचीं हीं उदाहरणें होत.

१७ **शिंदे, होळकर व रजपूत** :—तात्पुरत्या द्रव्यलोभास बळी पडून

मुत्सद्दीपणाच्या दृष्टीनें झालेली मराठ्यांची आणखी एक घोडचूक सांगितली पाहिजे. मराठ्यांचा मित्र जयपूरचा राजा सवाई जयसिंह इ. स. १७४३ त मरण पावला. त्यास दोन मुलगे होते. एक ईश्वरसिंग व दुसरा माधवसिंग. ते दोघे आपसांत भांडूं लागले. तेव्हां ईश्वरसिंगानें शिंदेहोळकरांची मदत घेऊन माधवसिंगाचा पाडाव केला. नंतर शिंद्यानें ईश्वरसिंगास इतर रजपूत राजांचा मोड करण्यास मदत केली व खूप द्रव्य मिळविलें. इकडे माधवसिंगानें होळकरांची मदत मागितली व ती त्यानें द्रव्यलोभानें देण्याचें कबूल केलें. यामुळें शिंदेहोळकरांचें साहजिकच भांडण लागलें. व तें तोडावयास पेशवा स्वतः उत्तरेस गेला. परंतु होळकर हे जुने मातबर सरदार त्यांची भीड त्यास पडली. यामुळें सर्व प्रकरणाचा निकाल ईश्वरसिंगाविरुद्ध लागला. हें पाहून ईश्वरसिंगाचें मन विटलें व त्यानें विष खाऊन आत्महत्त्या केली. पुढें माधवसिंग यास जयपूरची गादी मिळाली. पण या सर्व प्रकारांमुळें रजपुतांचीं मनें अगदीं विटून गेलीं. आजपर्यंत मराठ्यांच्या उत्तरेकडील विजया-बद्दल रजपुतांस कौतुक वाटत असे. परंतु आतां मराठे द्रव्यलोभानें वाटेल तें करतात असें त्यांस वाटूं लागलें; व यापुढें रजपुतांनीं मराठ्यांस मना-पासून साह्य केलें नाहीं. शिंदे व होळकर यांच्या मनांतील परस्परांविषयीं किंतु वाढतच गेला. राणोजी शिंदे इ. स. १७४५ त मरण पावला. त्यास जयाप्पा व दत्ताजी असे दोन पुत्र व महादजी हा दासीपुत्र होता.

**१८ अबदाल्लीची पहिली स्वारी :**—यानंतर लौकरच वायव्येकडून आणखी एक धाड हिंदुस्थानावर आली. ती अहमदशहा अबदाल्ली या पठाण सरदाराची होय. तो इ. स. १७२४ त जन्मला. तो प्रथम नादीरशहाच्या पदरीं होता. इ. स. १७४७ त इराणांत नादीरशहाचा खून झाल्यावर त्यानें कंदाहार, पंजाब, सिंध वगैरे प्रांत बळकावले व आपण स्वतंत्रपणें राज्य करूं लागला. इ. स. १७४८ त तो हिंदुस्थानवर चाल करून आला. परंतु या वेळीं वजीराचा मुलगा मीरमन्नू याच्या पराक्रमानें मोगलांनीं सरहिंद येथें त्याचा पराजय करून त्यास पळवून लाविलें. मोगलांनीं परकीयांविरुद्ध मिळविलेला हा शेवटचाच विजय होय. त्याच वर्षीं महंमदशहा मरण पावला. त्याच्या जागीं त्याचा मुलगा अहमदशहा हा गादीवर बसला. दक्षिणेंत मराठ्यांचा बेत वेळोवेळीं हाणून पाडणारा प्रमुख प्रतिस्पर्धी निजाम हाही

लवकरच मरण पावला. व त्याच्या मुलांत गादीबद्दल तंटे उत्पन्न झाले. त्यामुळें इंग्रज व फरेंच यांस तेथें आपलें वर्चस्व स्थापन करण्यास मदत झाली. पुढील वर्षी छत्रपति शाहू मृत्यु पावला व त्यामुळें मराठेशाहींतही महत्त्वाचें स्थित्यंतर घडून आलें. म्हणून हिंदुस्थानच्या इतिहासास इ. स. १७४८–४९ पासून एक प्रकारें निराळें वळण लागलें असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

# भाग १० वा

# मराठ्यांचा साम्राज्यविस्तार

## ( इ. स. १७४८–६१ )

**१ पेशवे प्रमुख बनले :**—शाहू वृद्ध झाला, त्या वेळीं त्याचे मागून गादीवर कोणीं बसावें याबद्दल चर्चा व खटपट सुरू झाली. शाहूच्या मनांत प्रथम रघूजीस आपला वारस करावें असें होतें. परंतु रघूजीच्या अंगांत पेशव्यांप्रमाणें सर्व सरदारांना आटोक्यांत ठेवण्याची शक्ति नाहीं हें पाहून त्याचेवरून शाहूचें मन उडालें. त्याच सुमारास बाळाजी बाजीराव हा सातारा व कोल्हापूर येथील गाद्या एक करण्याची खटपट करीत होता, व शाहूच्या मृत्यूनंतर कोल्हापूरच्या संभाजीस गादीवर बसवावें अशी त्याची खटपट होती. परंतु शाहूच्या विरोधामुळें तीही निष्फळ झाली. पुढें एकवार शाहूच्या मनांत बाळाजी बाजीरावाबद्दल विकल्प येऊन तुम्हांस प्रधानकीवरून दूर केलें आहे अशी बाळाजीस त्यानें चिठ्ठी लिहिली, ती पोहोंचतांच बाळाजी बाजीरावानें बिनबोभाट जरीपटका व निशाण चिठ्ठी घेऊन येणाराच्या स्वाधीन केलें. हें पाहून रघूजीसारखे फटकून वागणारे सरदार व स्वामिभक्त बाळाजी यांच्यामधील फरक शाहूच्या लक्षांत आला व त्याच्या

एकनिष्ठेबद्दल खात्री पटली. नंतर दत्तक कोणास घ्यावें याबद्दल विचार चालू झाला. ताराबाई ही अलीकडे सातार्‍यास असे. तिनें आपला नातू रामराजा यास पुढें केलें. छत्रपतीचा औरस वंश हयात आहे हें पाहून शाहूनें दत्तक घेण्याचा बेत रहीत केला, व पेशव्यांस एक चिठ्ठी लिहिली, त्यांत (१) कोल्हापूरकरांसंबंधीं खटपट करूं नये. (२) पेशव्यानें सर्व राजमंडळांत वडिलकीच्या नात्यानें अधिकार चालवावा. (३) मागाहून येणारा छत्रपति रामराजा यांत तुम्हांस अंतर देणार नाहीं, असा मजकूर होता. या चिठ्ठीनें पेशव्यांच्या दर्जांत फरक पडला. आजपर्यंत पेशवा हा दाभाडे, प्रतिनिधि, भोसले या छत्रपतींच्या अनेक सरदारांपैकीं एक होता. आतां त्यास ह्या सर्वांत श्रेष्ठत्व प्राप्त झालें. पुढें ता. १५।१२।१७४९ रोजीं शाहू मृत्यु पावला. नंतर ताराबाईनें त्रास देण्यास आरंभ केला. तिनें सचिवांस फितविलें, दाभाड्यांस भर दिली, बाबूजी नाईकास चढविलें व आणखी निरनिराळ्या सरदारांस शक्य तीं आमिषें दाखविलीं. या सर्वांचा बंदोबस्त करणें पेशव्यांस भाग पडलें. या कार्यांत त्याचीं १७४९–५३ इतकीं वर्षे गेलीं. या वेळीं अहमदशहाची स्वारी व महंमदशहाचा मृत्यु यामुळें मोगलाई अगदीं खिळखिळी होऊन गेली होती. दक्षिणेंत निजामाचा पुरता पाडाव करण्यास ही संधि उत्कृष्ट होती, कारण तो फरेंचांशीं लढण्यांत गुंतला होता. परंतु या अंतःकलहामुळें पेशव्यास ह्यांपैकीं कांहींच करण्यास सवड झाली नाहीं.

**२ पेशवे व निजाम** :—पेशव्यानें प्रथम निजामावर हल्ला करून त्यास कमकुवत करावयाचें ठरविलें. या वेळीं निजाम सलाबतजंग यास मदत करण्यास त्याचा भाऊ निजामअल्ली हा बर्‍हाणपुराहून आला होता. परंतु त्या सर्वांचा शिंदेहोळकरांच्या मदतीनें सिंदखेड येथें इ. स. १७५५ त पराभव केला. निजामअल्लीनें सलाबतजंगाकडून २५ लाखांचा मुलूख पेशव्यांस देण्याचें कबूल केलें, तेव्हां पेशव्यानें माघार घेतली. परंतु पेशव्याची पाठ फिरतांच निजामअल्ली टाळाटाळ करूं लागला. हें पाहून पेशव्यानें पुनः चिमाजी आप्पाचा मुलगा सदाशिवरावभाऊ यास बरोबर फौज देऊन पाठविलें. इ. स. १७६० त उदगीर येथें लढाई झाली. तींत निजामाचा फारच मोठा पराभव झाला व त्यानें मराठ्यांस एकंदर ६० लक्षांचा मुलूख दिला या लढाईनें निजामाची सत्ता बहुतेक संपुष्टांत आली.

**३ पेशवे व कर्नाटकः**—कर्नाटकाचे बाजूकडे पेशव्यांचें प्रथम तरी दुर्लक्षच झालेलें दिसतें. कर्नाटकांत शहाजीची जहागीर तंजावर येथें होती. शिवाजीच्या स्वराज्याचे कांहीं प्रांतही तिकडेच होते. मराठेशाहीवरील संकटकालांत मराठ्यांस कर्नाटकांतील जिंजीचा किल्ला उपयोगी पडला. व ज्या दक्षिणच्या सहा सुभ्यावर चौथाईचा हक्क बाळाजी विश्वनाथानें मिळविले, त्यांत कर्नाटक मोडत होता. कर्नाटकचे सावनूर, शिरे, कर्नूल, कडप्पा व अर्काट असे पांच जिल्हे होते. बाळाजी विश्वनाथ मृत्यु पावल्या-वर बाजीराव हा तिकडील स्वारीवर गेला होता. परंतु प्रतिनिधीची व त्याची चुरस असल्यानें व त्या स्वारीचा कारभार एकतंत्री न राहिल्यानें विशेष फायदा झाला नाहीं. त्यानें अतःपर कर्नाटकाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं असें ठरविलें. पुढील वीस वर्षांत प्रतिनिधीच्या हातून तिकडे कांहीच कामगिरी झाली नाहीं. पुढें इ. स. १७४० त बाळाजी बाजीराव पेशवा झाल्यावर त्यालाही कर्नाटकांत स्वतंत्र हात मिळाला नाहीं. शाहूनें रघूजी भोसल्यास तिकडे अधिकार देऊन पाहिलें. पण रघूजीच्या हातून कर्नाटकच्या स्वारीचें काम नीट झालें नाहीं. वास्तविक कर्नाटकांतील इंग्रज–फरेंचांच्या हालचालींचा बंदोबस्त करण्याची हीच वेळ होती. पण पेशवा घरचीं भांडणें व निजाम यांच्या व्यवहारांत गुंतल्यानें व इतर सरदारांच्या हातून तें न उरकल्यानें त्यांना निर्वेध अवसर सांपडला. असो. रघूजीचा नाकर्तेपणा प्रत्ययास आल्यावर शाहूनें पेशव्यास ती कामगिरी सांगितली.

त्याप्रमाणें पेशव्यांचा चुलत भाऊ सदाशिवराव यानें इ. स. १७४७ त कर्नाटकावर पहिली स्वारी केली. त्या वेळीं त्याचें वय फक्त १७ च वर्षांचें होतें. त्यानें सावनूरच्या नबाबाचा पराभव करून कृष्णा तुंगभद्रा या नद्यांमधील पंचवीस लक्षांचा मुलूख काबीज केला. इ.स. १७५६ सालीं मराठ्यांनीं सावनूरवर दुसरी स्वारी केली. ती फार मोठी होती. सावनूरच्या नबाबास कडप्पा व कर्नूलचे नबाब येऊन मिळाले, परंतु त्या सर्वांचा दमलचेरी येथें पराभव झाला व मराठ्यांनीं कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील सर्व प्रदेश काबीज केला. इतकें झाल्यावर मराठे श्रीरंगपट्टणकडे वळले. तेथें म्हैसूरचा दिवाण नंदराजा यानें पुष्कळ दिवस नेटानें शहराचें संरक्षण केलें. मराठे श्रीरंगपट्टण

काबीज करणार असा रंग दिसूं लागला. इतक्यांत श्रीरंगपट्टण येथील श्रीरंगाच्या प्रसिद्ध देवालयाच्या शिखरास एक गोळा लागून तें फुटलें, तेव्हां हा एक अपशकून झाला असें समजून मराठ्यांनीं बत्तीस लक्ष रुपये खंडणी घेऊन परत जाण्याचें कबूल केलें. इतके झाल्यावर बाळाजीनें शिरें काबीज केलें. पुढें कडप्पाच्या नबाबाविरुद्ध आपला सरदार बळवंतराव मेहेंदळे यांस पाठविलें. कडाप्पाच्या नबाबास इतर ठिकाणचे नबाब साहाय्य करीत होते परंतु त्यांचें कांहींही चाललें नाहीं. बळवंतरावानें त्यांचा पूर्ण पराभव केला. त्यानंतर बळवंतरावानें अर्काटचा नबाब महमदअल्ली याजवर चाल करून त्यास खंडणी द्यावयास लावलें. यावेळीं इंग्रजांचें महमदअल्लीस साहाय्य होतें परंतु त्यांचाही नाइलाज झाला. इतक्यांत म्हैसूरच्या दरबारीं हैदरअल्ली हा सरदार प्रबळ होऊन नंदराजाविरुद्ध उठला. तेव्हां घाबरून जाऊन नंदराजानें मराठ्यांचें साहाय्य मागितलें. तिकडे फौज पाठविण्यास झालें असतें तर कर्नाटकचें पूर्ण स्वामित्व मराठ्यांस मिळण्यास वेळ लागला नसता. परंतु त्याच वेळीं दत्ताजी शिंदे यमुनेच्या कांठांवर अबदाल्लीशीं लढत असतां कामास आल्याची बातमी आली. "तिकडील पेचामुळें इकडे आटोपावें लागलें, नाहीं तर सारी दक्षिण मोकळी होती," असे तत्कालीन एका पत्रांत उद्गार आहेत. कर्नाटकच्या पश्चिमोत्तर बाजूला मराठे याप्रमाणें सत्ता बसवीत असतां दक्षिणेस फरेंचांच्या विरुद्ध इंग्रजांना जय मिळाला व मराठे पानिपतावर गुंतले असतां, व श्रीरंगपट्टणचे सत्ताधीश हैदरअल्लीच्या हालचालींत गुंतले असतां इंग्रजांना अर्काटकच्या बाजूस आपली सत्ता स्थिर करण्यास अवसर मिळाला.

**४ पेशवे व आंग्रे :**—कान्होजी आंग्रे हा इ.स. १७२९ त मरण पावला. कान्होजीनें मराठ्यांच्या आरमाराचा लौकिक चांगलाच वाढविला. त्यानें विजयदुर्ग हें आपलें ठाणें केलें व मुंबईपासून गोव्यापर्यंत सर्व समुद्रकिनाऱ्यावर एकही खाडी, एकही बंदर किंवा एकही नदीचें मुख तटबंदीवांचून किंवा जहाजाच्या नाक्यावांचून मोकळें ठेविलें नाहीं. त्याच्या मृत्यूनंतर अनेक तंटे होऊन इ. स. १७४१ सालीं त्याचा दासीपुत्र तुळाजी यानें कारभार हातीं घेतला. तुळाजी हा अतिशय कर्तबगार होता. त्यानें आपलें आरमार इतकें वाढविलें कीं, इंग्रजांस त्याच्या आरमाराचा दरारा वाटत

असे. इंग्रज–फरेंचांची सत्ता कर्नाटकांत व बंगालमध्यें दृढमूल होत असत. पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांची फारशी डाळ शिजली नाहीं, याचें बरेंचसें श्रेय तुळाजीच्या आरमारास व त्याच्या जागरूकपणास आहे. इंग्रज साधल्यास त्याच्या आरमाराच्या नाशाची वाट पाहात होते. तुळाजी हा जसा मुत्सद्दी तसाच कारस्थानी होता. तसेंच तो ब्राह्मणांचा विशेषतः चित्पावनांचा द्वेष करी व पेशव्यांशीं फटकून वागण्याची प्रवृत्ति इतर मराठे सरदारांपेक्षां तुळाजींत विशेषच दिसे. उलट त्याचा भाऊ मानाजी हा कर्तृत्वशून्य व पेशव्यास दबून वागणारा होता. तेव्हां पेशव्यानें तुळाजीचा पाडाव करण्याची खटपट चालविली. या कामीं त्यानें इंग्रजांचें साह्य मागितलें व तें त्यांनीं मोठ्या खुषीनें दिलें हें सांगणें नकोच. इ. स. १७५५ त पेशवे व इंग्रज या उभयतांत तह झाला. त्यांत असें ठरलें कीं, (१) तुळाजीवरील स्वारींत आरमाराचें आधिपत्य इंग्रजांकडे असावें व मराठ्यांनी त्याच वेळीं खुष्कीनें हल्ला करावा. (२) याबद्दल इंग्रजांस मराठ्यांनी बाणकोट व त्याजवळचीं पांच ठाणीं द्यावींत. (३) विजयदुर्ग व इतर ठाणी मराठ्यांकडे राहावींत. या कराराप्रमाणें ब्रिटिश आरमार मुंबईहून निघालें. तें चौलहून पेशव्यांचें आरमार बरोबर घेऊन त्यानें सुवर्णदुर्गावर हल्ला केला व तें ठाणें सर केलें. पुढें तुळाजीच्या आरमाराचा पाठलाग केला, परंतु तें विजयदुर्गाकडे पळालें. इकडे पावसाळ्यांत इंग्रजांनीं मोहीम बंद केली. मराठ्यांची मात्र खुष्कीकडून मोहीम चालूच होती. इ. स. १७५६ च्या प्रारंभीं क्लाईव्ह व वॅटसन हे विलायतेहून आरमार घेऊन आले. या वेळीं तुळाजीनें शत्रूंनीं आपणांस सर्व बाजूंनीं घेरलें हें पाहून तहाचें बोलणें लावलें. तें पेशव्यानें मान्य केलें असतें, पण इंग्रज तें मनावर घेईनात. त्यांनीं तुळाजीच्या आरमारास आग लावून दिली व त्याबरोबरच मराठ्यांचा समुद्रकिनाऱ्यावरील दराराही लयास गेला! यापुढें तुळाजी मराठ्यांचें कैदेंत इ. स. १७६९ पर्यंत होता. पेशव्यांनीं पुढें सिद्दीपासून जंजिरा काबीज करण्याचा यत्न केला (इ. स. १७६०). त्या वेळीं इंग्रजांनीं मदत केली नाहींच, उलट सिद्द्यासच सर्व पुरवठा केला; तेव्हां मराठ्यांस इंग्रजांचा कावा कळून आला. इ. स. १७६४ पासून विजयदुर्गाच्या आरमाराचें आधिपत्य आनंदराव धुळप या नामांकित दर्यावर्दी सरदाराकडे होतें. इ. स. १७६५ त इंग्रजांनीं शिवाजीनें बांधलेला

सिंधुदुर्ग ऊर्फ मालवणचा किल्ला काबीज केला. मराठ्यांस हें पाहून आपल्या जागींच चरफडत बसण्यापलीकडे कांहीं करतां आलें नाहीं. एकंदरींत पाहतां आंग्र्यांचा पाडाव करण्यांत पेशव्यानें योजिलेल्या आत्मघातकी धोरणाचें समर्थन कशानेंही होण्याजोगें नाहीं.

**५ मराठे व बंगाल :**—वऱ्हाडांत रघूजी भोसले या सरदाराचा अम्मल होता असें मागें सांगितलें आहे. तो मोठा पराक्रमी होता व मराठ्यांचा दरारा बंगालमध्यें बसविण्यास बहुतांशीं तो व त्याचा मुलगा जानोजी हेच कारणीभूत झालेले आहेत. रघूजीचा सेनापति भास्करराम कोल्हटकर यानें इ. स. १७४२ त कटक ओरिसा प्रांतांतून थेट बंगालपर्यंत स्वारी करून तेथील सुभेदार अलिवर्दीखान याची तारांबळ उडवून दिली. रघूजी व त्याचे सरदार हे सर्व पराक्रम करीत असतांना शाहू व पेशवे यांच्या परवानगीची पर्वा करीत नसत. तेव्हां नानासाहेबानें बादशहाकडून माळव्याची सनद मिळविण्याकरितां रघूजीस कसें वठणीवर आणलें हें मागें सांगितलेंच आहे. त्यानंतर रघूजी व पेशवा यांच्यामध्यें तह झाला व त्या तहान्वयें रघूजीस बंगाल, बहार–ओरिसा इत्यादि प्रांतांवर स्वारी करण्यास मार्ग खुला झाला. पुढील सालीं भास्कररामानें बंगालवर पुन्हां स्वारी केली. त्या वेळीं अलीवर्दीखान अगदीं घाबरून गेला. पण त्यानें तहाचें आमिष दाखवून भास्करपंतास दग्यानें ठार मारलें (इ. स. १७४४). पुढें चार वर्षेपर्यंत रघूजीस अनेक कारणांमुळें तिकडे स्वारीवर जातां आलें नाहीं. शेवटीं इ. स. १७४८ सालीं त्यानें आपला मुलगा जानोजी यास स्वारीवर पाठविलें. जानोजीही बापाप्रमाणेंच पराक्रमी होता. त्यानें कटक प्रांत काबीज केला व बंगालवर एकसारखा स्वाऱ्यांचा उपक्रम चालू ठेवून थेट हुगळीपासून खंडणी आणली. या सर्व स्वाऱ्यांचा बंगालमध्यें इतका परिणाम झाला कीं, बंगाली स्त्रिया मुलांस निजवीत असतांना 'चूप बैस मराठे आले', अशा अर्थाचें गाणें म्हणत असत; इंग्रज व्यापाऱ्यांस त्यांची इतकी धास्ती बसली कीं, त्यांनीं मराठ्यांपासून आपणांस त्रास होऊं नये म्हणून एक खंदक खणून ठेविला. तो 'मराठा डिच्' या नांवानें अद्याप प्रसिद्ध आहे. शेवटीं अलीवर्दी-खानानें जेरीस येऊन तह केला (इ. स. १७५१). त्यांत त्यानें कटक प्रांत मराठ्यांकडे देऊन टाकला व बंगालच्या चौथाईबद्दल दरसाल बारा लक्ष

रुपये देण्याचें कबूल केलें. याच कटक प्रांतावर रघूजीनें पुढें शिवभट साठे याची नेमणूक केली.

रघूजी इ.स. १७५५ त मरण पावल्यावर त्याच्या मुलांत तंटे सुरू झाले. येथून पुढें जानोजी व त्याचे भाऊ घरच्या भांडणांत व पेशव्यांशीं कलागती करण्यांत वेळ घालवूं लागले. इकडे विजयदुर्गाचा पाडाव झाल्यावर क्लाईव्ह बंगाल्यांत पोहोंचला व इ. स. १७५७ त त्यानें नबाब सिराज-उद्दौल्याचा प्लासी येथें पराभव केला व बंगाल्यांत इंग्रजी सत्तेचा पाया कायम केला.

**६ पेशवे व गायकवाड :**—इ. स. १७३१ त डभईचा तह झाल्यावर गुजराथच्या बाजूस दाभाड्यांचें महत्त्व कमी होऊन त्यांचा मुतालिक दमाजी गायकवाड हा प्रसिद्धीस आला. शाहू महाराजांच्या मृत्यूनंतर तो ताराबाईच्या पक्षास मिळाला व विशेषत: त्याचेंच साहाय्य ताराबाईस असल्यामुळें पेशव्यास इ. स. १७४९–५१ या दोन वर्षांत घरच्या भांडणांखेरीज इतर कोठेंहीं लक्ष घालतां आलें नाहीं. दमाजी साताऱ्याकडे चाल करून येत असतां पेशव्यानें त्याचा पराभव केला व त्यास कैद केलें. पुढें त्याच्याशीं पुढील अटींवर तह केला. (१) दाभाड्यांच्या मूळच्या मालकी हक्काबद्दल त्यांना दरसाल कांहीं ठराविक रक्कम द्यावी. (२) निम्मा गुजराथ पेशव्यांचे हवालीं करावा. (३) पेशवे सांगतील तेव्हां फौज घेऊन स्वारीवर हजर व्हावें. दमाजीनें ह्या सर्व अटी सचोटीनें पाळल्या व पुढें बहुतेक सर्व महत्त्वाच्या मोहिमेवर तो आपल्या फौजेनिशीं हजर राहत असे. इ. स. १७५२ त राघोबा उत्तर हिंदुस्थानांत पहिली स्वारी करण्यास निघाला असतां वाटेंत त्यानें अहमदाबाद हें ठाणें घेऊन पेशव्यांचा अम्मल तेथें बसविला. दमाजी इ. स. १७६८ त मृत्यु पावला. त्याच्या पाठीमागून त्याचा मुलगा गोविंदराव हा अधिकारी झाला.

असें हें इ. स. १७४८–६१ या कालांतील पेशव्यांच्या दक्षिणेंतील बहुविध उद्योगांचें स्वरूप आहे. मराठ्यांस माळव्याची सनद मिळाल्यापासून उत्तरेंतील त्यांच्या हालचालीकडे आपण लक्ष दिलें नाहीं, तेव्हां मराठ्यांनीं उत्तरेकडे कोणते पराक्रम केलें तें पुढील प्रकरणीं पाहूं.

---

# भाग ११ वा

# उत्तरेचें राजकारण

## (इ. स. १७५०-१७६१)

**१ मोठी सनद्** :—इ. स. १७४८ त दिल्लीचा बादशहा महंमदशहा हा मरण पावल्यावर त्याचा मुलगा अहमदशहा हा गादीवर बसला. त्यानें अयोध्या प्रांताचा नबाब सफदरजंग यास आपला वजीर नेमलें. त्याचें व रोहिल्यांचें वैर होतें. तेव्हां त्यांनीं वजिराच्या ताब्यांतील अयोध्या प्रांतावर एकसारख्या स्वाऱ्या करण्यास सुरवात केली. अशा संकटप्रसंगीं त्याचें लक्ष शिंदे व होळकर या सरदारांकडे गेलें व त्यानें त्यांच्याजवळ मदत मागितली मराठ्यांनीं ती देण्याचें कबूल केलें व शिंदे होळकर त्वरेनें त्या दिशेनें चाल करून गेले. प्रथम त्यांनीं फरुकाबाद येथें रोहिल्यांचा पराभव केला. १७५० नंतर गंगेच्या उत्तर तीराला जाऊन खुद्द रोहिलखंडांतही धुमाकूळ उडवून दिला. या कामगिरीबद्दल मराठ्यांस गंगा व यमुना या नद्यांमधील प्रदेशांत ( यास अंतर्वेदी असें म्हणतात) सोळा लक्षांचा मुलूख मिळाला. काशी, प्रयाग इत्यादि क्षेत्रें त्यांच्या ताब्यांत देण्याचें वजीरानें कबूल केलें व बादशहानें मराठ्यांस मुलतान, पंजाब, राजपुताना व रोहिलखंड या प्रदेशांवर चौथाई वसूल करण्याचा हक्क दिला. याचा सरळ अर्थ हाच कीं, दक्षिणेस नर्मदे-पासून उत्तरेस अटक नदीपर्यंतच्या प्रदेशांत बादशाहीचें सर्व प्रकारच्या शत्रूं-पासून रक्षण करण्याचें मराठ्यांनीं पतकरलें. बाळाजी विश्वनाथानें स्वराज्य व दक्षिणच्या सहा सुभ्यांवरील चौथाईच्या सनदा मिळविल्या. बाजीरावानें माळव्याची सनद मिळविली. शिंदेहोळकरांनीं तर जवळ जवळ सर्व उत्तर हिंदुस्थानची सनद मिळविली. हिला 'मोठी सनद' असें म्हणतात. या सनदेनें अहमदशहा अबदालीसारख्या परकीय शत्रूंचा व रोहिल्यांसारख्या देशांतील शत्रूंचा बंदोबस्त करण्याचें काम मराठ्यांवर पडलें. तें त्यांनीं कितपत पार पाडलें, तें आतां पाहावयाचें आहे.

**२ रघुनाथरावाची पहिली स्वारी** :—इ. स. १७५२ त अहमदशहा

अबदालीनें लाहोर व मुलतान प्रांतांवर स्वारी केली व ते प्रांत काबीज केले; ह्या बातम्या पुण्यास कळल्यावर पेशव्यांचा धाकटा भाऊ रघुनाथराव हा बादशाही मुलुखाचें रक्षण करण्यास उत्तरेस निघाला. मध्यंतरीं भरत- पूरच्या सुरजमल जाठानें बादशहाविरुद्ध कारस्थान केलें. तेव्हां त्यास शासन करण्याकरितां रघुनाथरावानें प्रथम भरतपुरास वेढा दिला. भरतपूरचा वेढा चालू असतां अकस्मात् मल्हारराावाचा एकुलता एक मुलगा खंडेराव गोळी लागून मरण पावला. तेव्हां मल्हाररावानें जाठाचा उच्छेद करण्याची प्रतिज्ञा केली. हें पाहून जाठ जयाप्पा शिंदे यास शरण गेला. जयाप्पानें त्यास अभय दिलें. शेवटीं रघुनाथरावानें तीस लक्ष रुपये खंडणी घेऊन वेढा उठविला. परंतु ह्या कृत्यानें होळकर व शिंदे यांच्यांत वैमनस्य आलें, तें पुढें केव्हांही नाहींसें झालें नाहीं. यानंतर जयाप्पास मारवाडांत कामगिरी आली तिकडे तो निघून गेला. रघुनाथरावाच्या उत्तरेकडील स्वारीचे तीन उद्देश होते. (१) दिल्लीच्या दरबारीं सफदरजंगाच्या मागून गाजीउद्दीन हा वजीर झाला, तो नेहमीं मराठ्यांच्या बाजूनें राही, तेव्हां त्याचें वर्चस्व प्रस्थापित करणें. (२) काशी व प्रयाग इत्यादि धर्मक्षेत्रें सोडविणें, व (३) अहमदशहा अबदालीचा पंजाबांतून अंमल उठविणें. या सर्व कार्यांस सर्व सैन्याची एकजूट हवी होती. त्यांत जयाप्पा फुटून मारवाडांत गेला हें अगदीं गैर झालें. तो निघून गेल्यावर रघुनाथराव दिल्लीस गेला. तेथें बाद- शहानेंच मराठ्यांविरुद्ध कारस्थान चालविलें हें पाहून रघुनाथरावानें त्यांस कैद केलें व बहादूरशहाचा नातू, जहांदरशहाचा मुलगा अजीजुद्दीन याला इ. स. १७५४ त गादीवर बसविलें. त्यानें दुसरा अलमगीर ही पदवी धारण केली. रघुनाथरावानें मथुरा, वृंदावन इत्यादि स्थळें काबीज केलीं व रोहिल- खंडांत अंमल बसवून तो दक्षिणेंत परत आला. सैन्याचा जोर पुरता नसल्यानें त्यास याहून अधिक फारसें कांहीं करतां आलें नाहीं. जयाप्पा मारवाडांत गेला असतां नागोर येथें त्याचा खून झाला.

**३ अहमदशहाची तिसरी स्वारी** (इ. स. १७५६):—मराठ्यांचें दिल्लीस इतकें वजन बसलें हें रजपूत, अफगाण, मुसलमान इत्यादिकांस आवडलें नाहीं. खुद्द बादशहाही मनांतून मराठ्यांच्या विरुद्ध होता. एक गाजीउद्दीन मात्र मराठ्यांच्या बाजूस होता. गाजीउद्दिनानें वाढविलेला

एक नजीबखान नांवाचा रोहिला गाजीउद्दिनाचा व मराठ्यांचा मनांत द्वेष करीत असे. त्यानें गुप्तपणें अहमदशहास हिंदुस्थानांत बोलाविलें. मध्यंतरी गाजीउद्दिनानें अबदालीचे लाहोर व मुलतान हे प्रांत परत घेतले होते. तेव्हां त्याला ते जिंकणें जरूर होतें. म्हणून इ. स. १७५६ त अबदालीनें हिंदुस्थानवर तिसरी स्वारी केली. लाहोर व मुलतान हे प्रांत पुन्हां काबीज केले व सरहिंद येथें समदखान नांवाचा एक प्रबळ सरदार ठेवून दिला. पुढें दिल्लीस येऊन बादशहा व गाजीउद्दीन यास त्यानें कैद केलें. मथुरा व आग्रा हीं स्थळें लुटलीं व पुन्हां बादशहाची गादीवर स्थापना करून, गाजीउद्दीन व नजीबखान यांस त्यांचे अधिकार परत देऊन तो निघून गेला.

**४ भगवा झेंडा अटकेवर फडकतो** ( इ. स. १७५८ ) :—ही बातमी दक्षिणेंत कळतांच, राघोबा पुण्याहून दुसऱ्या स्वारीस निघाला तो दिल्लीस येऊन पोहोंचला. नजीबखानानें त्यास विरोध करण्याची पराकाष्ठा केली, पण त्याचा मोड झाला. नजीबखान हा राघोबाच्या हातीं पुरतांच सांपडला होता. पण मल्हाररावानें मध्यस्थी करून त्याचें रक्षण केलें. मल्हारराव नजीब यास धर्मपुत्र मानीत ! हा धर्मपुत्र पुढें मराठ्यांस चांगलाच भोवला. राघोबा सरहिंदकडे वळला तेथें त्यानें समदखानाचा पराभव केला व नंतर लाहोर, मुलतान हे प्रांत काबीज करून थेट अटक नदीवर मराठ्यांचा झेंडा रोविला. याच सुमारास इराणच्या बादशहानें अबदालीचा पराभव केला व मराठ्यांशीं मैत्री राखण्याबद्दलचें पत्र त्यानें राघोबास दिलें. ही अटकेपारची स्वारी म्हणजे मराठ्यांच्या भाग्याचा कळस होय. यानंतर काबूल, कंदाहारकडील प्रदेश काबीज करावेत असें राघोबाच्या मनांत होतें. परंतु नानासाहेबानें दक्षिणेंत बोलाविल्यामुळें राघोबा दक्षिणेंत परत येण्यास निघाला.

**५ दुहीचा मूलमंत्र** :—त्या वेळीं जयाप्पाचा मुलगा जनकोजी व भाऊ दत्ताजी हे दक्षिणेंतून नानासाहेब पेशव्यांचा निरोप घेऊन उत्तरेस येत होते. त्यांस नानासाहेबानें तीन हुकूम दिले होते. (१) नजीबखानाचें पारिपत्य करावें, (२) काशी व प्रयाग हीं क्षेत्रें ताब्यांत घ्यावीं, व (३) वजीर सुजाउद्दौला (सफदरजंगचा मुलगा) याच्या मदतीनें बंगाल प्रांतावर स्वारी करावी. या हुकुमाप्रमाणें ते स्वारीस निघाले असतां वाटेंत त्यास राघोबा

भेटला. त्यानेंही 'सर्व बंदोबस्त झाला आहे, फक्त नजीबखानाचा तेवढा बंदोबस्त तुम्ही करा' असें कळकळीनें सांगितलें. पुढें मल्हारराव होळकर भेटले. त्यांच्या मनांत या वेळीं निराळेच विचार चालू होते. पेशव्यांचा अंमल उत्तरेस निर्वेधपणें बसत चालला तर आपलें महत्त्व राहणार नाहीं असें वृद्ध मल्हाररावास वाटूं लागलें व त्यानें त्या दोघांस उपदेश केला कीं, "बाबा, तुमचा मूलस्वभाव. अटकेपासून रामेश्वरापर्यंत एकछत्री राज्य झालें· एक नजीबखान मात्र खळी राहिला आहे. त्याचें पारिपत्य केल्यास पेशवे जासुदाच्या हातून अटकेपासून पैसे आणवतील. मग तुम्ही आम्ही सहजच निर्माल्यवत झालों; मग कोणी पुसणार नाहीं. यास्तव एवढा खळी रक्षून काय करणें तें करावें. जर तुम्ही नजीबखानाचें पारिपत्य कराल तर पेशवे तुम्हांस धोतरें बडवावयास लावतील हें लक्षांत ठेवा" हा उपदेश जनकोजीस जरी फारसा पटला नाहीं तरी दत्ताजीस तें म्हणणें पटलें व शेवटीं हाच दुहीचा कानमंत्र मराठ्यांच्या नाशास कारणीभूत झाला.

**६ नजीबनें दगा दिला**:—दत्ताजीनें उत्तरेस आल्यावर नजीबखानाचें पारिपत्य करण्याचें सोडून त्याच्याशीं बोलणें सुरू केलें व नजीबखानानेंही गोड गोड बोलून शिंद्यास मोहून टाकलें. नजीबच्या मदतीनें गंगा नदीवर शुक्रताल येथें पूल बांधून गंगेच्या उत्तरेस जावें व तेथून अयोध्या प्रांतावर स्वाऱ्या कराव्या असें शिंद्यानें ठरविलें. नजीबखानानेंही वरकरणी पूल बांधून देण्याचें कबूल केलें. परंतु याच वेळीं त्याचीं अहमदशहा अबदाल्ली व अयोध्येचा वजीर सुजाउद्दौला यांच्याशीं गुप्तपणें कारस्थानें चाललीं होतीं. पुढें बरेच दिवस झाले, पण पूल तयार होईना हें पाहून दत्ताजीस त्याचा संशय येऊं लागला व पुढें तो जसजशीं टाळाटाळीचीं उत्तरें देऊं लागला, तसतशी तर त्याच्या विश्वासघातकीपणाबद्दल दत्ताजीची खात्री पटली. तेव्हां नजीबखानाचा बंदोबस्त करण्याकरितां म्हणून दत्ताजी त्वरेनें निघाला. त्यानें अंतर्वेदींत शिरून स्वतः नजीबखानाचा उत्तरेकडील मुलूख काबीज करण्यास सुरवात केली व गोविंदपंत बुंदेले यांस दक्षिणेकडून शह देण्यास सांगितलें. अयोध्येच्या वजिराशीं सख्य करून त्याचें साहाय्य मिळविण्याचा प्रयत्न करावा अशीही त्यास सूचना दिली. परंतु अयोध्येच्या नबाबाचीं

व नजीबखानाचीं आंतून सलूखाचीं बोलणीं चाललीं होतीं व बाहेरून गोविंदपंतांशीं बोलणीं बोलून त्यानें धूर्तपणानें कालहरण केलें.

७ **दत्ताजीचा पराक्रम** (इ. स. १७६०):—इतकें होतें तों अहमदशहा अबदाल्ली पंजाबांत आल्याची बातमी आली. त्यानें लाहोर काबीज केलें. इकडे सुजाउद्दौलाही नजीबास मिळणार असा रंग दिसूं लागला. कारण त्यास अबदाल्लीच्या आगमनानें जोर चढला. तेव्हां वजीर व नजीब यांच्याशीं लढत बसल्यास मागाहून अबदाल्ली गळचेपी करील हें लक्षांत घेऊन, दत्ताजी अगोदर अबदाल्लीस तोंड देण्यास निघाला व यमुना नदी ओलांडून कुंज-पुऱ्यास तिच्या उजव्या[1] तीरावर आला. कुरुक्षेत्राजवळ एक लहानसें युद्ध झालें. त्यांत अबदाल्लीस मराठ्यांचा जोर विशेष दिसून आला. तेव्हां नजीब व वजीर यांचें साहाय्य घ्यावें म्हणून अबदाल्ली कुंजपुराजवळ यमुना उतरून अंतर्वेदींत शिरला तें पाहून दत्ताजी दिल्लीस आला. मध्यंतरीं मराठ्यांस साहाय्य करीत असलेला गाजीउद्दीन वजीर यानें दिल्लीच्या बादशहाचीं अबदाल्लीस गेलेलीं पत्रें पकडलीं. यावरून नजीबखानाच्या कारस्थानांत बादशहाही सामील आहे हें पाहून त्यानें त्यास ठार मारलें (इ. स. १७५९). तेव्हां त्याचा मुलगा अली गौहर हा अलाहाबादेंत होता. त्यानें शहाअलम हें नांव धारण करून आपण बादशहा असें जाहीर केलें. परंतु या दंगलींत तिकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. अबदाल्लीनें नजीब व सुजाउद्दौला यांच्या फौजा एकत्र केल्या व दिल्लीच्या समोर यमुनेच्या तीरावर उभा राहिला. अबदाल्लीची फौज नदी उतरून अलीकडे आली. तेथें उभय सैन्यांचें घनघोर युद्ध झालें. त्यांत दत्ताजी पडला व मराठे कच खाऊन मागें परतले. मल्हारराव होळकर या वेळीं दत्ताजीस मदत न करितां राजपुतान्यांत किरकोळ मोहिमा करीत होते !!

८ **स्वारीची तयारी**:—या पराभवाची बातमी दक्षिणेंत पोहोंचली. तेव्हां दक्षिणचीं सर्व कामें एकीकडे ठेवून उत्तरेकडे जाण्याची तयारी सुरू झाली. नुकतीच उदगीरची लढाई होऊन निजामाची सत्ता संपुष्टांत आली होती. कर्नाटकांत अर्काटच्या नवाबापर्यंत सर्वांपासून खंडण्या घेतल्या होत्या. परंतु तेथें सावनूर-

---

१ टीप—नदीच्या मुखाकडे तोंड करून उजव्या हातास येईल तें उजवें तीर.

च्या बाजूस हैदरची व अर्काटच्या बाजूस इंग्रजांची अशा दोन सत्ता उदय पावत होत्या. उदगीरच्या लढाईनंतर तिकडेच लक्ष पुरवावें असें नानासाहेबानें ठरविलें होतें. परंतु हें सर्व आतां बाजूस ठेवावें लागलें. सदाशिवराव हा उदगीरहून पुण्यास न येतां वाटेंतच पटदूर मुक्कामीं पेशव्यांनीं जाऊन वाटाघाट करावयाची असें ठरलें. तेथें रघुनाथरावाच्या ऐवजीं सदाशिवरावाची या कामावर नेमणूक झाली. कारण रघुनाथराव भोळा होता व निरनिराळ्या मराठे सरदारांवर वचक ठेवून त्यांस लगामीं लावून घेण्यास कोणातरी धूर्त मनुष्याची जरूरी होती. दक्षिणच्या स्वाऱ्यांत सदाशिवरावाचें कौशल्य दिसून आलें, तेव्हां त्याचीच योजना सर्वांनुमतें झाली. बरोबर विश्वासराव धाडिले. त्याशिवाय बळवंतराव मेहेंदळे, समशेर बहाद्दर, विठ्ठल शिवदेव विंचूरकर, दमाजी गायकवाड हेही बरोबर निघाले. हैदराबादेस फरेंच सरदार बुसी याच्या हाताखालीं इब्राहीमखान गारदी यानें तोफखान्याचें उत्तम शिक्षण घेतलें होतें. तोही बरोबर होता. जानोजी भोसले मात्र आला नाही.

१४ मार्च १७६० रोजीं भाऊ पटदुराहून निघाला. तो बऱ्हाणपूर, ग्वाल्हेर या रस्त्यानें पुढें येऊं लागला. वाटेंत त्यानें रजपूत राजांस येऊन मिळण्याविषयीं लिहिलें. परंतु गेल्या दहा पंधरा वर्षांपासून रजपुतांचीं मनें मराठ्यांविषयीं कलुषित झालीं होतीं. ते तटस्थ वृत्तीनें राहिले. सुजाउद्दौल्यास आपल्या बाजूस मिळवून घेण्याची शिकस्त करावी, निदान त्यास अबदाल्लीस तरी मिळूं देऊं नये असें भाऊनें गोविंदपंत बुंदेले यास लिहिलें, परंतु शिंदे, होळकर यांचा पराभव झाल्यापासून भाऊसाहेब येईपर्यंतच्या काळांत अबदाल्ली व नजीबखान यांची अंतर्वेदींत पूर्ण छाप पडली होती. त्यामुळें वरीलपैकीं कांहींच कामगिरी गोविंदपंतांकडून झाली नाहीं. अबदाली अनुपशहरीं होता. कानपूरच्या बाजूस नजीब व वजीर यांचीं कारस्थानें चालू होतीं. तीं पुरीं होण्यापूर्वींच आपण आग्र्यास यमुना ओलांडून अबदाली व सुजा यांच्यामध्यें उतरावें असा भाऊचा बेत होता; परंतु पावसाळ्यामुळें वाटेंतील नद्यांस फार पाणी आलें व भाऊच्या हालचालीची फार कुचंबणा झाली, म्हणून अबदाल्ली, नजीब व सुजा हे एक होऊं शकले. जूनच्या शेवटीं भाऊ आग्र्यास पोहोंचला. तेथें शिंदे, होळकरांच्या भेटी झाल्या. एकमेकांस पाहून सर्वांस प्रेमाचें भरतें आलें. शूर दत्ताजीची त्या वेळीं सर्वांस आठवण झाली.

पूर्वी निरनिराळ्या सरदारांचे काय रुसवे असतील ते असोत, पण पानिपतावर मात्र सर्व जण आपआपलीं भांडणें बाजूस ठेवून लढण्यास सिद्ध झाले.

९ **दिल्ली सर झाली** :—अबदाल्ली व सुजा हे एक झाले हें पाहून भाऊ दिल्लीकडे निघाला व आग्र्यापासून दिल्लीचें १२० मैलांचें अंतर तोडून सपाट्यानें ऑगस्टच्या १ तारखेस त्यानें दिल्ली काबीज केली. त्या वेळीं अबदाल्ली समोरच्या तीरावर होता. त्याच्या डोळ्यादेखत भाऊनें हा पराक्रम केला व दत्ताजीच्या पराभवाचा सूड उगवला. या विजयानें मराठ्यांची चोहोंकडे छाप बसली. सुजास आपण अबदाल्लीस येऊन मिळालों याचा पश्चात्ताप होऊं लागला. इतकेंच नव्हे तर अबदाल्लीसही लढाई न देतां आपण परत जावें असें वाटूं लागून त्यानें तहाचें बोलणें लावलें.

या बोलण्यास भाऊ संमति देण्यास तयार होता. परंतु उभय पक्षीं पेशवा–अबदाल्लींत तह झाल्यास आपण वांचत नाहीं हें नजीब यास पक्कें ठाऊक असल्यानें त्यानें तहाचें बोलणें सफल होऊं दिलें नाहीं. यानंतर अबदाल्लीस अंतर्वेदींत कोंडावें या उद्देशानें भाऊ यमुना उतरण्याकरितां दिल्लीच्या उत्तरेकडे निघाला व तेथून सत्तर मैलांवर कुंजपुरा येथें आला. तेथें यमुनेस उतार होता. परंतु हें ठिकाण अबदाल्लीचेंही नाकें होतें. तेथें ऑक्टोबर महिन्यांत अबदाल्लीसाठीं धान्यसामग्री घेऊन आलेला सरदार समदखान याशीं युद्ध करून मराठ्यांनीं विजय मिळविला व विजयादशमीचा मुहूर्त मोठ्या आनंदानें, उमेदीनें व उत्साहानें साजरा केला. हा भाऊच्या भाग्याचा अत्युच्च कळस होय.

१० **पानिपत (१४।१।१७६१)** :—तेथून रंग पालटला. कुंजपुरा हातचा गेल्यामुळें अबदाल्लीचा स्वदेशीं जाण्याचा मार्ग खुंटला. तेव्हां आतां युद्धाशिवाय मार्ग नाहीं हें पाहून अबदाल्लीनें मोठा हिय्या करून बागपताजवळ यमुना ओलांडली व पानपताजवळ येऊन भाऊसाहेब व दिल्ली यांच्या मध्यावर येऊन बसला ( नोव्हेंबर १७६० ). याच वेळीं मुसलमानांचा इटावा व कानपूर येथें जोर कमी पडलेला पाहून गोविंदपंतानें बागपताजवळ अबदाल्लीची रसद मारण्याची खटपट कां केली नाहीं हें कळत नाहीं. तसेंच भाऊसाहेब व दिल्लीची फौज यांच्यामध्यें अबदाल्ली कोंडला गेला असतां भाऊसाहेब एकदम अबदाल्लीवर चाल करून कां

गेला नाहीं हेंही कळत नाहीं. बहुधा तो दक्षिणेंतून नानासाहेबां-कडून येणाऱ्या फौजेची वाट पाहात असावा. पुढें नोव्हेंबर डिसेंबरांत (इ. स. १७६०) किरकोळ युद्धें झालीं. तींत मराठ्यांचा सरदार बळवंतराव मेहेंदळे पडला, परंतु मराठ्यांचा जय झाला. याच सुमारास गोविंदपंत दिल्लीहून भाऊसाहेबास रसद घेऊन जात असतां त्याचें अबदाल्लीच्या सर-दाराशीं युद्ध झालें व त्यांत तो मारला गेला. पुढें मराठ्यांची उपासमार होऊं लागली. बरोबर स्त्रियाही होत्या. तेव्हां गोल बांधून युद्ध करीत करीत थेट दिल्लीस निघून जावें असा विचार आदले रात्रीं ठरला. संक्रांतीचा तिळगूळ वांटण्यांत आला. दुसरे दिवशीं युद्ध सुरू झालें. परंतु गोल बांधून जाण्याऐवजीं मराठे नेट धरून युद्ध करूं लागले. बहुधा त्यांस तसें करणें भाग पडलें असावें. दोन प्रहरपर्यंत मराठ्यांची सरशी होती. शेवटीं विश्वासरावास चुकून गोळी लागली तें ऐकून भाऊ विश्वासरावाजवळ आला. तेव्हां त्या वीरानें सांगितलें 'मी वांचत नाहीं, तुम्ही चला, लढाई बिघडेल.' विश्वासरावास त्या स्थितींत पाहून भाऊच्या हृदयाची कालवाकालव झाली. डोकें ठिकाणावर राहिलें नाहीं. तो जिवावर उदार झाला. हत्तीवरून उतरून घोड्यावर बसला. मराठ्यांच्या जरीपटक्याभोंवतीं एकच गर्दी झाली. 'हाणा' 'मारा' म्हणतां म्हणतां भाऊचा घसा कोरडा झाला. दश-दिशा धुंद झाल्या. भाऊ गर्दींत नाहींसा झाला. मराठ्यांचा पराजय झाला.

युद्ध संपल्यानंतर सांपडलेल्या लोकांस अबदाल्लीनें अत्यंत क्रूरपणानें यमसदनाची वाट दाखविली. जीव बचावून परत येणारांत मल्हारराव व दमाजी गायकवाड हे होते. या पराभवाचें वर्तमान दक्षिणेंत कळतांच नानासाहेबास जबर धक्का बसला व त्यानें पर्वतीवर 'भाऊ' 'भाऊ' करीत प्राण सोडला.

**११ अपयशाची मीमांसा :**—पानिपतची लढाई ही एकच लढाई नसून ती अनेक लढायांपैकीं शेवटची होय. मराठ्यांस मोठी सनद मिळाल्या-पासून हें एक हिंदुमुसलमानांतील युद्धच चालू होतें व त्याचा पानिपतावर शेवट झाला. खुद्द पानिपताच्या शेवटच्या स्वारींत मल्हाररावाच्या मूर्खपणा-मुळें नजीब बचावला. नजीबच्या कारवाईमुळें भाऊ–अबदाल्लींत वेळींच समेट झाला नाहीं, यमुनेस पानिपतानजीक अनपेक्षित उतार सांपडल्यामुळें

अबदाल्लीस दैवानें हात दिला, नानासाहेब पेशव्याच्या कुमकेवर विसंबून राहून भाऊ नोव्हेंबर ते जानेवारी तशाच उपासमारीच्या स्थितींत वाट पाहात बसला, त्या वेळीं गोविंदपंत बुंदेल्यानें अंतर्वेदींत राहून अबदाल्लीची रसद मारण्याचें काम हलगर्जीपणानें केलें नाहीं व नानासाहेब पेशव्यानें प्रसंग न ओळखतां स्वतःच्या लग्नविधींत कालहरण करून फारच उशीरा भाऊच्या मदतीस जाण्याचें ठरविलें. या सर्व गोष्टी आपापल्यापरी पानपतच्या शेवटच्या अपयशास कारणीभूत झाल्या. त्यांत मुख्य कारण कोणतें याबद्दल संशोधकांत मतभेद आहे. परंतु शेवटच्या लढाईच्या अपयशाची मीमांसा सोडून आपण मराठ्यांच्या एकंदर साम्राज्यविषयक धोरणाकडे लक्ष दिलें तर मराठ्यांनीं स्वराज्याचें साम्राज्य केलें व त्याचा आसेतुहिमाचल विस्तार केला. या उद्योगांत त्यांनीं फारच घाई केली असें म्हटल्याशिवाय राहवत नाहीं. ज्या प्रांतांची चौथाई घ्यावयाची त्याच्या संरक्षणाची जबावदारी येते. नवीन जिंकलेल्या प्रदेशांत आपला पाय पक्का रोवून पुढें पाऊल टाकावयाचें व सर्वांच्या धोरणांत एकसूत्रीपणा राखावयाचा, हें कांहीच दिसून येत नाहीं. शिंदेहोळकरांनीं हिंदुस्थानांत, गायकवाडांनीं गुजराथेंत, भोसल्यांनीं बंगाल्यांत, पेशव्यांनीं कर्नाटकांत, सारांश, जिकडे वाट फुटेल तिकडे मुलूख काबीज करून जो तो साम्राज्याचा डोलारा उभा करीत होता. तो पानिपतावर कोसळला यांत नवल नाहीं. मुसलमान हा रोहिला, हा पठाण, हे मोगल, हा स्वकीय, हा परकीय हे भेद बाजूला ठेवून उभे राहिले. पण हिंदूंपैकीं रजपूत, मराठे, जाठ यांच्यांत ऐक्य होतें कोठें? मराठे द्रव्यलोभानें रजपुतांच्या अंतस्थ भांडणांत पडले व त्यांनीं त्यांचें वैर संपादन केलें. त्यामुळें मराठ्यांच्या पराभवाचें सोयरसुतक त्यांना वाटलें नाहीं. सरदारांचा डोईजडपणा हाही या वेळीं नाशास कारणीभूत झाला. रघुनाथराव सर्वांस घेऊन स्वारीवर निघाला असतां शिंद्यास मारवाडांत द्रव्यार्जनाची संधि आली व ते तिकडे निघून गेले, यामुळें रघुनाथरावास पहिल्याच स्वारींत पुरता बंदोबस्त करतां आला नाहीं. मल्हाररावांचा फूट पाडण्याचा कावाही याच गोष्टींची साक्ष देतो. एकंदरींत लष्करी हालचालींत अपयशाची मीमांसा करण्याचें सोडून केवळ पादशाही धोरणाकडे लक्ष दिल्यास (१) मराठ्यांनीं त्यांना न झेपेल इतकी जबाबदारी अंगावर घेतली. (२) हिंदूंच्या ऐक्याची दृष्टि शेवटपर्यंत

ठेविली नाहीं व (३) त्यांच्या सरदारांची स्वार्थी कुचराई त्यांना अत्यंत भोंवली इतकें म्हटल्यावांचून राहवत नाहीं.

पानिपतच्या युद्धाचे परिणामही फार महत्त्वाचे आहेत. मुसलमानांचा या युद्धांत जय होऊनही शेवटीं त्यांचा फायदा झाला नाहीं. कारण त्यांचा तो विजय अबदाल्लीच्या बळावर होता. हिंदुस्थानांतील मुसलमानांत मुसलमानी सत्ता टिकवून धरील असा कोणी पुरुष नव्हता. उलट मराठे युद्धांतील पराजयानें खचून गेले नाहींत. लढाई आहे तेव्हां तेथें केव्हां जय तर केव्हां पराजय हा व्हावयाचाच; या भावनेनें ते फिरून दिल्लीस हिंदुपदपातशाहीचें वर्चस्व स्थापन करण्याच्या उद्योगास जोरानें लागले व त्यांत यशस्वी झाले. औरंगजेबाची दक्षिण देश जिकतांना कशी तिरपीट उडाली हें पाहिलें म्हणजे मराठ्यांच्या चिकाटीचें व त्यांच्या साम्राज्यविषयक धोरणाचें कौतुक करावेंसें वाटूं लागतें. परंतु हें सर्व खरें असलें तरी पानिपतच्या लढाईनें मराठ्यांच्या सत्तेस धक्का बसला व त्यांना आपली सत्ता सावरून धरण्यास सुमारें दहा वर्षें फुकट घालवावीं लागलीं. हीं वर्षें हिंदुस्थानच्या इतिहासांत फारच महत्त्वाचीं होतीं. याच वेळीं हैदरचा उदय होऊन तो प्रबळ झाला. बंगाल व कर्नाटक प्रांतांत इंग्रज शेर झाले. मृतप्राय निजामशाही सचेतन झाली. पंजाबांत शीखांची सत्ता उदयास आली. थोडक्यांत सांगावयाचें तर हिंदु-मुसलमान लढले, दोघेही थकले व त्यांनीं नवीन रुजत घातलेल्या सत्तेस मोकळी वाट करून दिली.

---

## भाग १२ वा

# थोरले माधवराव

(इ. स. १७६१–७२)

**१ माधवरावाची हुषारी:**—पानिपतच्या धक्क्यामुळें मराठ्यांच्या शत्रूंनीं फिरून उचल खाल्ली. हैदरनें म्हैसूर येथें आपला पाय पक्का रोंविला

व तो मराठ्यांचे दक्षिणेकडील मुलूख काबीज करूं लागला. निजामानें उद्‌गीरच्या लढाईंत जो मुलूख देण्याचें कबूल केलें होतें, तो देण्याची टाळाटाळ करूं लागला. दक्षिणेंतील या लगतच्या शत्रूंचा बंदोबस्त केल्याशिवाय उत्तरेच्या राजकारणांत म्हणजे चंबळा नदीचे उत्तरेस तर लक्ष देण्याची सोयच नव्हती. कारण तेथील राजकारणांतून मराठ्यांचा पाय जवळजवळ उठल्यासारखा होता. तशांत जानोजी भोसल्यासारखे स्वकीय सरदार शत्रूस सामील होण्यास कमी करीत नसत. राघोबास राज्याचा लोभ सुटल्यामुळें खुद्द पेशव्यांच्या कुटुंबांत दुहीचें बीज पेरलें गेलें. इतक्या सर्व भानगडींस तोंड देण्यास माधवरावासारखा कर्तबगार पुरुष पेशवाईवर आला नसता तर बहुधा पानिपतच्या धक्क्यांतून पेशवाई वांचणें कठिण होतें.

शाहूच्या मृत्यूनंतर मराठे–मंडळांतील वडिलकीचा मान पेशव्यांच्या घराण्याकडे आला. तेव्हां बाळाजीचा मुलगा माधवराव यास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, त्या वेळीं त्याचें वय १७ वर्षांचें होतें. माधवराव अगदींच लहान असल्यानें रघुनाथराव त्याचा कारभार पाहात असे.

**२ राक्षसभुवनची लढाई** (इ. स. १७६३) :—राघोबानें अधिकार हातीं येतांच पूर्वीच्या सर्व अधिकाऱ्यांस काढून आपल्या पक्षाचे अधिकारी नेमण्यास सुरवात केली. गोपाळराव पटवर्धन यांची मिरजची जहागीर काढून घेतली. प्रतिनिधीस दुखविलें. तेव्हां ही सर्व मण्डळी निजामाकडे गेली. त्याचा दिवाण विठ्ठल सुंदर यानें सर्वांस आश्रय दिला. पुढें जानोजी भोसल्यासही त्यानें 'तुला छत्रपति करतों.' असें आमिष दाखविलें व कटांत ओढून घेतलें. तेव्हां निजामाची बाजू बरीच बळकट झाली. इकडे मराठ्यांनीं मल्हाररावास मदतीस बोलाविलें. परंतु मदतीचा मोबदला म्हणून दहा लक्षांची नवीन जहागिरी त्यानें घेतली तेव्हांच तो आला, आतां पेशव्यांचीही बाजू सावरली. तेव्हां त्यानें हैद्राबादेवर चाल केली व लुटालूट करण्यास सुरवात केली. पुढें वऱ्हाडांत जाऊन भोसल्यांच्या मुलुखांतही जाळपोळ मांडली. तेव्हां भोसला पुण्यावर चाल करून आला. अशा रीतीनें परस्परांनीं परस्परांचे मुलूख जाळले. शेवटीं पेशव्यांनीं मल्हाररावाचे मध्यस्थीनें जानोजीस फितुर करण्यास आरंभ केला. निजामाकडे जाऊन जानोजीचा एकंदरींत फायदा होण्याचा रंग दिसेना. तेव्हां तो बत्तीस लक्षांची जहागीर

घेण्याचें कबूल करून मराठ्यांकडे परत आला. पावसाळा लागण्याचे सुमारास निजामानें औरंगाबादेजवळ छावणी केली. ही संधि साधून पेशव्यांच्या फौजेनें एकदम त्याच्यावर हल्ला केला. राक्षसभुवन येथें फार मोठी लढाई झाली व निजामाचा पूर्ण पराभव झाला. त्याचा दिवाण विठ्ठल सुंदर मारला गेला. खुद्द माधवरावांनीं शिपाईगिरीची शर्थ केली. "चिरंजीव रायांनीं यंदा शिपाईगिरी कांहीं कमी केली नाहीं. त्यांचे कर्तेपणाचा भरंवसा आम्हास आला." असें राघोबानें गोपिकाबाईस ( माधवरावाच्या आईस ) लिहिलें आहे. या लढाईनें निजामापासून एकंदर ८२ लक्षांचा मुलूख मराठ्यांनीं घेतला. निजाम अगदीं गोगलगाय बनला.

**३ हैदरचा उदय** :—राक्षसभुवनच्या लढाईनें माधवरावानें निजामाचा बंदोबस्त केला. त्याचप्रमाणें त्यानें आपल्या सरदारांवरही आपली छाप बसविली. यानंतर त्यास दक्षिणेकडे लक्ष देणें अगदीं जरूर पडलें. दक्षिणेंत हैदरची सत्ता फार प्रबळ झाली. म्हैसूरच्या राज्यांत हैदर हा एका गरीब नाइकाचा मुलगा होता. प्रथम त्यानें फौजेंत नौकरी धरली व पुढें पुढें तो आपल्याजवळ २५०० स्वार, ३००० गारदी, २००० प्यादे व चार तोफा एवढा सरंजाम बाळगूं लागला. तें पाहून म्हैसूरचा दिवाण नंदराज यानें त्यास दिंदिगल या डोंगराळ मुलुखाचा कारभार सांगितला. तेथेंही त्यानें उत्तम बंदोबस्त राखला व आपलें सामर्थ्य वाढविलें. पुढें त्यानें नंदराजासही काढून टाकण्यासाठीं कारस्थान चालविलें. हें पाहून नंदराजानें हैदरच्या वाढत्या सत्तेस भिऊन पेशव्यांच्याजवळ मदत मागितली. पानिपतचें अरिष्ट उत्पन्न झालें नसतें तर ते लवकरच नंदराजास मदत करणारही होते. पण तें घडून आलें नाहीं. असो. ठरलेल्या कारस्थानाप्रमाणें हैदरचे शिपाई पगाराची बाकी थकल्याचें निमित्त करून हैदरकडे आले. तेव्हां हैदरनें 'मी कांहीं दिवाण नाहीं, पगार दिवाणाकडे मागा' असें सांगितलें. तेव्हां शिपाई हैदरास पुढें घालून नंदराजाकडे गेले. शिपायांच्या पुढें आपलें कांहीं चालत नाहीं, असा हैदरानें बहाणा केला. राजा चिक्क कृष्णराय हा अगदीं नालायक होता. त्यानें नंदराजास काढून टाकलें, हैदर यास दिवाण नेमलें व फौजेच्या देण्याची हैदर नाईक आतां तजवीज करतील असें शिपायांस आश्वासन दिलें; तेव्हां ते घरोघर परत गेले (१७६०)

पुढें एकदोनच वर्षांत हैदरानें राजासही ठराविक उत्पन्न तोडून देऊन स्वस्थ बसविलें व आपण राज्याचा अधिकारी बनला !

**४ हैदरवर स्वारी** ( १७६४–६५ ):—मराठ्यांचा पानिपतावर पराभव झाला हें ऐकून तर त्यानें जास्तच झपाट्यानें आपलें राज्य वाढविण्यास सुरवात केली. तुंगभद्रा नदी ही साधारणपणें मराठ्यांच्या राज्याची दक्षिण सरहद्द होती. परंतु हैदरनें लवकरच कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील प्रदेश काबीज केला व धारवाड हें आपलें उत्तरेकडील ठिकाण केलें. आतां हैदरकडे लक्ष दिल्याशिवाय गत्यंतर नाहीं हें पाहून माधवरावानें निजामास स्वस्थ बसविल्यावर हैदरवर इ. स. १७६४–६५ त पहिली स्वारी केली. उत्तरेकडील स्वाऱ्यांत ज्याप्रमाणें शिंदेहोळकर हे प्रमुख असत त्याचप्रमाणें दक्षिणेकडे पटवर्धन हे प्रमुख होते. प्रथम त्यानें धारवाड सर केलें व नंतर बिदनूरनजीक हैदरवर जोराचा हल्ला करून त्यास सळो कीं पळो करून सोडलें. तेव्हां हैदर शरण आला. त्यानें कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील मुलुखावरील आपला मालकी हक्क सोडून दिला व म्हैसूरवरील खंडणीबद्दल ३२ लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें. या तहामुळें मराठ्यांचें पानिपतच्या लढाईमुळें दक्षिणेकडे झालेलें नुकसान अंशतः भरून निघालें खरें; परंतु नवीन मात्र कांहीं मिळालें नाहीं.

**५ घरचीं भांडणें**:— इ. स. १७६६ त राघोबानें उत्तर हिंदुस्थानांत एक स्वारी केली, पण तींत विशेष कांहीं साध्य न होतां तो अपयश घेऊन दक्षिणेंत परत आला. नंतर लवकरच चुलत्यापुतण्यांत फिरून वैमनस्य सुरू झालें. राघोबानें राज्याची वाटणी मागितली, आनंदवल्लीस जाऊन अमृतराव नांवाच्या मुलास दत्तक घेतलें व सैन्य जमविण्यास सुरवात केली. भोसले व गायकवाड हे त्यास मिळण्यास कबूल झाले. हें पाहून माधवरावानें राघोबावर चाल केली व त्याचा धोडप येथें पराभव करून त्यास आपल्या ताब्यांत घेतलें व शनिवारवाड्यांत आणून बंदोबस्तांत ठेविलें. राघोबास गायकवाड व भोसले यांनीं मिळण्याचा बेत केला होता. तेव्हां त्यांचीही खोड मोडणें जरूर होतें. इ. स. १७६८ त दमाजी मृत्यु पावला, तेव्हां त्याचा मुलगा गोविंदराव याजपासून जबर दंड घेऊन पेशव्यानें त्यास गुजराथेवर कायम केलें. नंतर त्यानें निजामाची मदत घेऊन जानोजीवर स्वारी

केली व त्याच्या मुलुखांत शिरून धुमाकूळ मांडला, तेव्हां जानोजी शरण आला. भीमेच्या कांठीं कनकापूर येथें दोघांचा करार ठरला (इ.स. १७६९)· त्यांत भोसल्यानें राहिलेला आठ लाखांचा मुलूखही परत दिला व शिंदे-होळकर यांच्याप्रमाणें पेशव्यांच्या हुकमतींत वागण्याचें कबूल केलें. हीं घरचीं भांडणें भांडण्यांत माधवरावाचीं १७६६–१७६९ हीं वर्षें फुकट गेलीं. या वेळीं इंग्रज व हैदर यांचें युद्ध चालू असून हैदरवर स्वारी करण्यास ही संधि उत्कृष्ट होती. हैदरानें इंग्रजांस जुमानलें नाहीं. त्यानें थेट मद्रासपर्यंत चाल करून त्यांचा पराभव केला व त्यांच्याशीं तह केला. त्यांत एकमेकांचीं जिंकलेलीं ठाणीं परत करावींत व लढाईचे प्रसंगीं एकमेकांस साहय करावें असा करार ठरला. मराठे आपणांवर चाल करून आल्यास इंग्रजांचें आपणांस साहय मिळावें असा त्याचा एक हेतु होता.

६ **हैदरावरील शेवटची स्वारी**:—राघोबा व जानोजी यांचा याप्रमाणें बंदोबस्त केल्यावर इ. स. १७६९ त माधवरावानें हैदरावर पुनः स्वारी केली. गोपाळरावांस हैदरचे हालचालीवर लक्ष ठेवण्यास ठेवून देऊन माधवराव त्रिंबकरावास बरोबर घेऊन आग्नेयीकडील मुलूख काबीज करीत करीत श्रीरंगपट्टणकडे निघाला. इ. स. १७७० च्या सुमारास माधवरावाची प्रकृति बिघडल्यामुळें माधवराव परत फिरला. परंतु त्रिंबकरावानें श्रीरंगपट्टणचे रोखानें चाल करणें चालू ठेवलें. म्हैसूरच्या पूर्वेस सरहद्दीवर याप्रमाणें मराठ्यांची हालचाल चालू असल्याकारणानें हैदरास कर्नाटकांतील इतर संस्थानिकांशीं संधान बांधतां येईना. आतां मराठे श्रीरंगपट्टणवर चाल करून जाणार हें पाहून हैदर इतर सर्व उद्योग सोडून तिकडे वळला. तेव्हां श्रीरंगपट्टणापासून पांचसहा मैलांवर तुमुल युद्ध झालें. त्यांत हैदरचा पूर्ण पराभव झाला. या लढाईस 'मोतीतलावाची लढाई' असें म्हणतात. इतकें झालें तरी हैदर तहास तयार होईना. शेवटीं मराठ्यांनीं श्रीरंगपट्टणास वेढा घातला. पण तें स्थळ जिंकण्यास कठिण होतें. तेव्हां मध्यंतरींच्या काळांत मराठे थेट तंजावरपर्यंत जाऊन आले व कर्नाटकाच्या नबाबापासून त्यांनीं तंजावरकरांचें संरक्षण केलें. व त्यांच्यापासून खंडणी वसूल केली. आतां फक्त श्रीरंगपट्टणचा किल्ला काबीज केला म्हणजे हैदर पूर्ण हतबल झाला असता. कर्नाटकांतील इतर सत्ताधीश हैदरचे मानानें क्षुद्र होते. त्यांच्यावर वर्चस्व

सहजच बसवितां आलें असतें. परंतु या वेळीं माधवरावाची प्रकृति फारच विघडली व 'आपण या दुखण्यांतून वांचत नाहीं' असें त्याचें पत्र आलें. तेव्हां वेढा उठविणें भाग पडलें. हैदरशीं तह झाला. त्यांत शिवाजी महाराजांचे कर्नाटकांतील स्वराज्याचे जे प्रांत होते ते सर्व मराठ्यांस मिळाले व लढाईच्या खर्चाबद्दल पन्नास लक्ष रुपये मिळाले. तसेंच हैदरनें दरसाल चौदा लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. इ. स. १७७२ च्या पावसाळ्यांत दक्षिणेंतून मराठी फौजा परत येऊन घरोघर गेल्या.

**७ पानिपतचा सूड:**—ही दक्षिणेंतील स्वारी चालू असतां माधवरावांनीं उत्तरेकडेही फौज रवाना केली. या वेळीं अगदीं जय्यत तयारी होती. रामचंद्र गणेश कानडे व विसाजी कृष्ण बिनीवाले हे मुख्य होते; व महादजी शिंदे, तुकोजीराव होळकर हेही बरोबर होते. रजपुतांपासून खंडणी वसूल करीत करीत मराठे भरतपूरच्या जाठावर चाल करून गेले, त्यांचा पराभव केला व त्यांपासून ६५ लाख रुपये खंडणी घेतली; त्यांनीं बळकाविलेला आग्र्याचा किल्ला परत घेतला. नंतर मराठे आतां पानिपतचा सूड उगविणार अशी नजीब उद्दौल्यास धास्ती पडली व त्यानें तहाचें बोलणें लावलें. तह केल्यास अंतर्वेदींतील पठाणांवर हल्ला करण्यास मदत करूं व अलाहाबादेस वजिराचा पाहुणचार खात असलेला दिल्लीचा बादशहाही इकडे आणण्यास मदत करूं असें सांगितलें. महादजी शिंद्याच्या मनांत तह करावयाचा नव्हता. परंतु काळवेळ पाहून मराठ्यांनीं त्याच्याशीं तह केला; व त्यांनीं अंतर्वेदींतील पठाणांवर चाल करून फरुकाबाद येथें त्यांचा चांगलाच पराजय केला व इटावा काबीज करून सर्व अंतर्वेदींत अंमल बसविला. नंतर त्यांनीं बादशहास दिल्लीस नेण्याचें कबूल केलें. बादशहासही दिल्लीच्या तख्तावर बसण्याची इच्छा होती व त्यानें इंग्रजांस यापूर्वीं अनेक वेळां विनंति केली होती, परंतु त्यांनीं ती मान्य केली नाहीं. तेव्हां तो मराठ्यांच्या बरोबर दिल्लीस जाण्यास निघाला व इ. स. १७७१ च्या डिसेंबर महिन्यांत मोठ्या समारंभानें त्यानें दिल्लींत प्रवेश केला. तेथें आल्यावर मराठ्यांनीं इ. स. १७५१ सालीं झालेले करारमदार त्याजजवळून फिरून घेतले. दिल्लीस प्रबळ होऊन दिल्लीचा कारभार आपल्या ताब्यांत घ्यावा, ही मराठ्यांची फार दिवसांची आकांक्षा सफल झाली.

इतक्यांत पानिपतची पुनरावृत्ति होण्याचा रंग दिसूं लागला; कारण नजीबाचें पठाणांशीं आंतून सूत्र असल्याचें कळून आलें. परंतु नजीबखान वारला. त्याचा मुलगा झबेताखान ह्रा दुराचरणी असून बादशहा त्याचा अत्यंत द्वेष करी. तेव्हां बादशहानेंही मराठ्यांना त्याच्यावर स्वारी करण्यास भर दिली. तेव्हां मराठ्यांनीं रोहिलखंडांत शिरून नजीबगड, फत्तरगड वगैरे किल्ले सर केले व रोहिल्यांवर पूर्ण सूड उगविला.

ही स्वारी झाल्यावर मराठे आपला अंमल पूर्णपणें बसविण्यास आणखी एक वर्ष राहिले असते तर बरेंच काम झालें असतें. परंतु मराठ्यांच्या दुर्दैवानें माधवरावाच्या मृत्यूची बातमी उत्तरेस पोहोंचली व बहुतेक मराठी फौज परत आली. रोहिल्यांना मात्र मराठ्यांचें इतकें भय बसलें कीं, त्यांनीं सुजाशीं तह केला व त्याअन्वयें असें ठरलें कीं, मराठ्यांची स्वारी आल्यास सुजानें रोहिल्यांस मदत करावी व त्याबद्दल रोहिल्यांनीं सुजास चाळीस लाख रुपये द्यावेत. इ. स. १७७३ त बहुतेक मराठी फौज दक्षिणेंत आली होती; परंतु जी कांहीं अद्याप दुआबांत होती ती सुजाच्या व रोहिल्यांच्या फौजेचा जमाव पाहून परत आली.

**८ माधवरावाची योग्यता :**—इ.स. १७७२ च्या नोव्हेंबरांत माधवराव[१] मृत्यु पावला. प्रकृतीनें तो अशक्त असला तरी मोठा तडफदार होता. स्वभावानें तो तापट असल्यामुळें पदरच्या सरदारांवर त्याचा मोठा वचक असे. एकदां होळकरांचा दिवाण गंगाधर यशवंत चंद्रचूड हा कांहीं टाकून बोलल्यावर माधवरावानें भर दरबारांत खाडकन् त्याचे श्रीमुखांत लगावली. तसेंच इ.स.१७६९ त उत्तरेंत स्वारीवर जाण्याचा हुकूम झाला असतांही शिंदे वानवडी येथें तसाच रेंगाळत राहिला. तेव्हां माधवरावाच्या लक्षांत ही गोष्ट येतांच त्यानें सांगितलें कीं, 'पाटिलबुवा, तुम्हीं येथून लवकर कूच न केलें तर तुमचा गोट लुटला जाईल हें खूप समजा.' शिंद्यासारख्या बड्या सरदारास ही भाषा, मग इतरांची गोष्टच बोलावयास नको. पेशवाईंत पूर्वीं सरकारच्या

१ टीप :—त्याची बायको रमाबाई ही त्याजबरोबर शांत चित्तानें सती गेली. सती जाण्यापूर्वीं तिनें आपला धाकटा दीर नारायणराव याचा हात रघुनाथरावाचे हातीं देऊन त्यास कधींही अंतर न देण्याबद्दल कळकळून विनंति केली. ती राघोबानें कशी पाळली तें पुढें कळून येईलच!

कामांत रयत व तिचें सामान जबरीनें धरून नेण्याची चाल होती तीस 'वेठ' म्हणत. माधवरावानें ती पद्धत बंद केली, हें माहीत असूनही वसईचा सुभेदार विसाजीपंत लेले यानें रयतेस वेठीनें धरलें. हें कळल्याबरोबर माधवरावानें त्यास शासन केलें. फडणिसांच्या कचेरीतील हिशेब वगैरे तो स्वत: तपाशीत असे व कोठें लांचलुचपतीचा प्रकार नजरेस आल्यास तो कडक शासन करी. त्याचें नैतिक आचरणही मोठें कित्ता घेण्यासारखें होतें व त्यामुळें कुटुंबांतील वडील मंडळींवर देखील त्याचा मोठा वचक असे. तो स्वभावानें कडक असला तरी आपली चूक कळून आल्यास ती कबूल करीत असे. त्याच्या पदरीं रामशास्त्री प्रभुणे नांवाचा प्रसिद्ध न्यायाधीश होता. त्यानें न्यायाच्या पद्धतींत पुष्कळ सुधारणा केल्या. एकदां तो पेशव्यांचे भेटीस गेला असतां पेशवे संध्येस बसले म्हणून त्यांची भेट झाली नाहीं, असें एक दोन वेळां झालें तेव्हां रामशास्त्री रागावून परत जाऊं लागला. त्यावर पेशव्यानें ह्याचें कारण विचारलें. तेव्हां तो निःस्पृह शास्त्री उद्गारला, "श्रीमंत, आपण राज्य-रक्षणाचें काम घेतलें, तर आपलें मुख्य कर्तव्य तें आहे. आपणांस संध्याच करावयाची असेल तर मजबरोबर काशीस चला." हे उद्गार ऐकून माधव-रावास आपली चूक कळून आली व त्यानें तसें वागण्याचें सोडून दिलें. तो राज्यावर आला तेव्हां एकंदर परिस्थिति किती तरी कठिण होती. वारंवार रुसणारा राघोबा, अडचणींचा फायदा घेणारा जानोजी, हिकमती हैदर व कावेबाज निजाम या सर्वांशीं त्यानें तोंड देऊन, दहा वर्षांत राज्याची पुन्हां घडी कशी बसविली हें पाहिलें म्हणजे त्याच्या कर्तृत्वाचें कौतुक करावेंसें वाटतें. राघोबाचा बंदोबस्त करणें म्हणजे तर मोठें कठिणच काम होतें. अकबरास बह्‌रामखानाचा बंदोबस्त करणें एक वेळ सोपें होतें, पण राघोबा माधवरावाचा प्रत्यक्ष चुलताच असल्यानें हें काम मोठेंच नाजूक होतें. पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं तेव्हां माधवराव फक्त १७ वर्षांचा होता. इंग्लंडच्या इतिहासांत सर्वांत धाकटा व नांवाजलेला मुख्य प्रधान विल्यम पिट अधिकारारूढ झाला तेव्हां २३ वर्षांचा होता. माधवरावावर राज्याची सर्व जबाबदारी होती, तर विल्यम पिटला सर्वतोपरी पार्लमेंटचें पाठबळ होतें, हें लक्षांत घेतलें म्हणजे इतक्या कोवळ्या वयांत थोर कर्तबगारी दाखविणारा माधवरावासारखा पुरुष मरा-ठ्यांच्या इतिहासांत होऊन गेला याबद्दल अभिमान वाटल्याखेरीज राहात नाहीं.

# भाग १३ वा

# घरभेद्या राघोबा

## (इ. स. १७७२-१७८३)

## पेशवा नारायणराव १७७२-७३

**१ कारस्थानाचें मूळ :**—माधवरावाच्या मृत्यूनंतर नारायणराव पेशवा झाला. परंतु माधवरावानें एके वेळीं म्हटलें होतें कीं, 'याच्या नशिबीं राज्य नाहीं' तें खरें होण्याचा रंग लवकरच दिसूं लागला. नारायणराव लहान असल्यानें रघुनाथराव कारभार पाहात होता; व कांहीं दिवस चुलत्यापुतण्यांची गोडी होती. परंतु नारायणरावाचा स्वभाव फार चमत्कारिक होता. दुसऱ्यावर वचक बसविण्याजोगी त्याच्या अंगीं कर्तबगारी नव्हती; व पदरच्या सरदारांशीं मनमिळाऊपणानें राहून कर्तबगारीचा उणेपणा भरून काढण्याची शक्तीही त्याच्याजवळ नव्हती. यामुळें लोकांच्या मनांत त्याजबद्दल प्रेम किंवा दरारा कांहीच वाटेनासा झाला. पुण्यांतील दरबारी मंडळांत या वेळीं दोन पक्ष होते. एका बाजूस नारायणरावांची आई गोपिकाबाई, त्रिंबकरावमामा पेठे, नाना फडणवीस, हरिपंत फडके वगैरे मंडळी होती; व दुसऱ्या बाजूस रघुनाथरावाची स्त्री आनंदीबाई, चिंतो विठ्ठल रायरीकर, सखाराम बापू वगैरे मंडळी होती. त्यांत सखाराम बापू हा मोठा कारस्थानी होता. प्रथमपासूनच त्याचा कल रघुनाथरावाकडे असे. थोडक्यांत सांगावयाचें तर गोपिकाबाई व आनंदीबाई या जावाजावांच्या भांडणांत, सखारामबापूच्या कारस्थानांत, रघुनाथरावाच्या भोळेपणांत पुढील प्रकरणाचा उगम झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

**२ कटाची सिद्धता :**—रघुनाथराव कारभार पाहूं लागला, परंतु त्याची राज्याची वाटणी मागण्याची इच्छा नाहींशी झालेली नव्हती. तो गुप्तपणें हैदर, निजाम इत्यादिकांकडे संधानें बांधूं लागला हें पाहून नारायणरावानें त्यास कैद केलें. तेव्हांपासून रघुनाथरावाच्या बाजूचे चिंतो विठ्ठल रायरीकर,

सखाराम बापू व आनंदीबाई यांनीं रघुनाथरावास सोडविण्याचा कट केला. वाढतां वाढतां हा गुप्त कट वाढत गेला. रघुनाथरावास सोडवावें व त्याबरोबरच नारायणरावास धरावें असाही कटवाल्यांचा बेत झाला याकरितां त्यांनीं शनिवार वाड्यांत नोकरीस असलेले गारदी फितूर केले. त्यांचे मुख्य सुमेरसिंग व खरकसिंग यांस ५ लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें व लवकरच नारायणरावास धरावें असा रघुनाथरावाच्या हातचा लेखी हुकूमही गारद्यांचे हातीं पडला. या लेखी हुकुमांत 'धरावें' यांतील 'ध' चा 'मा' झाला व त्याचा आरोप साहजिक आनंदीबाईवर आला. त्याचा आनंदीबाईनें इन्कार केला असला तरी तेवढ्यावरून ती निर्दोषी ठरत नाही. असो. गारद्यांनीं ही कामगिरी बजावल्यास ५ लक्ष रुपये देऊन शिवाय साष्टी, नगर, पुरंदर हे किल्लेही देण्याचें त्यांस आनंदीबाईनें कबूल केलें.

**३ पेशव्यांचा खून** :—याप्रमाणें कटाची सर्व सिद्धता झाली. इतकेंच नव्हे तर या कटाची गुणगूण थोडीशी बाहेर फुटली होती. पण होणारी गोष्ट टळत नाहीं. भाद्रपद व १३ स (ता. ३०।८।१७७३) गारदी पगाराची थकलेली बाकी मागण्याच्या मिषानें थेट श्रीमंतांपर्यंत गेले. ते आल्याबरोबर नारायणराव भेकडाप्रमाणें पळून रघुनाथरावाकडे गेला. त्याची ती स्थिति पाहून रघुनाथरावास त्याची कीव आली. पण गारद्यांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. त्यांनीं रघुनाथरावाजवळून त्यास हिसकून घेतलें व त्याच्यावर तरवारी चालवून त्यास ठार मारिलें. दुसऱ्या दिवशी गारद्यांनीं राघोबाच्या नांवाची द्वाही फिरविली. गारद्यांस त्यांच्या कामगिरीबद्दल ७ लक्ष रुपये मिळाले, पण किल्ले मिळाले नाहींत. घडलेल्या सर्व प्रकारावरून रघुनाथरावाचा यांत संबंध होता हें अगदीं स्पष्ट झालें. तेव्हां रघुनाथरावास प्रायश्चित्त काय द्यावें याची ब्राह्मण बोलावून चर्चा सुरू झाली. त्यांत माधवरावाच्या वेळीं प्रसिद्ध असलेला रामशास्त्री प्रभुणे हा होता. त्यानें निर्भीडपणें सांगितलें कीं, असल्या गुन्ह्याला देहांत प्रायश्चित्ताशिवाय शास्त्रांत दुसरें प्रायश्चित्त सांगितलें नाहीं. इतकें बोलून त्या निर्भीड ब्राह्मणानें आपल्या नोकरीचा राजीनामा दिला.

## बारभाईंचा कारभार

**४ बारभाईंचें कारस्थान :—**पेशवाईचा अधिकार हातीं घेतल्याबरोबर लोकांचें लक्ष खुनाकडून निघून दुसरीकडे लागावें म्हणून रघुनाथरावानें एकामागून एक मोहिमा अंगावर घेतल्या. प्रथम त्यानें निजामाचा पराभव करून त्याच्याशीं तह केला व नंतर हैदराकडे वळला. या वेळीं पुण्यास निराळेंच कारस्थान शिजत होतें. सखाराम बापूनें नारायणरावास धरावें याबद्दल संमति दिली होती. परंतु नारायणरावाचा खून झाला हें पाहून त्याचें मन विटलें व तो राघोबाच्या विरुद्ध कारस्थान करूं लागला. त्रिंबकरावमामा पेठे, नाना फडणवीस, हरिपंत फडके, परशुरामभाऊ पटवर्धन वगैरे मंडळी त्यास सामील झाली व त्या सर्वांनीं एक होऊन कारस्थान रचिलें. त्यास 'बारभाईंचें कारस्थान' म्हणतात. नारायणरावाची स्त्री गंगाबाई ही त्या वेळीं गरोदर होती, तीस मुलगा झाल्यास बरेंच; नाहींपेक्षां तिच्या मांडीवर दत्तक देऊन त्याच्या नांवानें कारभार चालवावा व खुनी[१] राघोबास पेशवाईवरून दूर करावें असा या सर्वांचा बेत झाला. त्यांनीं प्रथम पुण्याचा बंदोबस्त केला, व गंगाबाईचा जीव सुरक्षित राहावयासाठीं पुण्याचा सर्व कारभार पुरंदरास नेला, व तेथून गंगाबाईच्या नांवानें राज्यकारभार हांकण्यास सुरवात केली.

**५ राघोबाचा पाठलाग :—**या कारस्थानाची बातमी राघोबास कळली, तेव्हां त्यानें हैदरशीं लढाई करण्याचें तहकूब केलें. त्याच्यापासून पुढें येणाऱ्या संकटप्रसंगीं मदत देण्याचें वचन घेतलें व परत फिरला. वाटेंत पंढरपुराजवळ त्याच्या व त्रिंबकराव पेठे यांच्या फौजेची गांठ पडली. त्या लढाईंत त्रिंबकरावाचा पराभव होऊन तो मारला गेला. पुढें रघुनाथराव पुण्याचे रोखें निघाला. परंतु पुण्याचा बंदोबस्त कडेकोट आहे हें पाहून तो उत्तरेस बऱ्हाणपूरकडे पळूं लागला. इकडे पुरंदर येथें गंगाबाई प्रसूत होऊन तिला मुलगा झाला (ता. १८।४।१७७४). मुलाचें नांव 'सवाई माधवराव' असें

---

१ टीपः—मुसलमानी अंमलांत अशा रीतीनें कोणी खून करून राज्यावर आल्यास त्यास विरोध होत नसे. कायदेशीर वारसाचे हक्क उचलून धरणें हें सुसंस्कृत समाजाचें लक्षण आहे.

ठेविलें व त्याच्या ४० व्या दिवसापासून त्याच्या नांवानें कारभार सुरू झाला.

## पेशवा सवाई माधवराव

### इ. स. १७७४ ते १७९५

राघोवाचा पाठलाग करण्यास हरिपंत फडके हा त्याच्या मागोमाग गेला. रघुनाथरावास शिंदेहोळकरांपैकीं कोणी आपणांस मदत करतील अशी आशा होती. राघोबाचें हें खूळ उत्पन्न झालेलें पाहून त्यास 'खेळवावें' व स्वतःचा फायदा करून घ्यावा असें शिंदे यांनीं धोरण ठेविलें व त्याप्रमाणें त्यांनीं कारभारी व राघोबा या उभयतांसही बराच वेळ चाळवाचाळव चालविली. तेव्हां शिंद्यापासून कांहीं फायदा होत नाही हें पाहून राघोबा गुजराथेंत पळून गेला. जातांना त्यानें आपली स्त्री आनंदीबाई ही गरोदर होती म्हणून तिला धार मुक्कामीं ठेविलें. गुजराथेंत मही नदीचे कांठीं हरिपंत फडके व राघोबा यांची लढाई झाली. तींत रघुनाथरावाचा पराजय झाला. तेव्हां रघुनाथराव पळून सुरतेस इंग्रजांकडे मदत मागण्यास गेला.

६ **सुरतेचा तह** (इ. स. १७७५) :—बारभाईंचें कारस्थान सुरू झालें. त्याचा फायदा घेऊन मुंबईकरांनीं इ. स. १७७४ सालीं डिसेंबर महिन्यांत लढाई करून खुशाल साष्टी बेट काबीज केलें. या साष्टी बेटावर त्यांचा फार दिवस डोळा होता, कारण तेथून घाटमाथ्यावरून देशावर उतरण्यास अनेक मार्ग होते व साष्टी हातीं आल्यास इंग्रजांचा व्यापार भरभराटीस आला असता. अशा स्थितींत राघोबा स्वतः सुरतेस मदत मागण्यास आला, ही इंग्रजांस सोन्याची संधि वाटली व त्यांनीं त्याबरोबर ता. ६।३।१७७५ रोजीं तह केला. त्यांत असें ठरलें कीं, इंग्रजांनीं राघोवास पेशवाईच्या गादीवर बसण्यास मदत करावी व त्याबद्दल राघोबानें फौजेचा खर्च देऊन शिवाय साष्टी वसईजवळील एकोणीस लक्षांचा मुलूख कायमचा तोडून द्यावा. राघोबानें हा तह पाळावा म्हणून इंग्रजांनीं त्याचें सहा लक्षांचें जवाहीर गहाण ठेविलें. या काळीं पेशवाईचा कायदेशीर वारस सवाई माधवराव याचा जन्म होऊन दहा महिने लोटले होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

**७ पुरंदरचा तह** (इ. स. १७७६) :—सुरतेच्या तहाप्रमाणें कर्नल कीटिंग राघोबास घेऊन गुजराथकडे निघाला. पण कलकत्त्याच्या गव्हर्नर जनरलास सुरतेचा तह पसंत पडला नाहीं. कारण एक तर राघोबाचा पक्ष अन्यायाचा होता व दुसरें कंपनी त्या वेळीं इतक्या अडचणींत होती कीं, मराठ्यांच्या सारख्या प्रबळ शत्रूशीं सामना करणें हें बरोबर होणार नाहीं असें त्यास वाटलें व तेथील कौन्सिलनें मुंबईच्या गव्हर्नरास राघोबाचा पक्ष सोडून देण्याविषयीं लिहिलें व पुरंदर दरबाराशीं स्वतंत्र तह करण्याकरितां कर्नल अॅप्टन यास पुरंदरास पाठविलें. तेथें तहाच्या बोलण्यांत इंग्रज वकील मुंबईकरांनीं अन्याय केला हें कबूल करी, परंतु त्याच अन्यायानें मिळविलेलें साष्टी बेट मात्र देण्यास तो कबूल होईना. शेवटीं हो ना करतां करतां नाना फडणविसानें साष्टी इंग्रजांकडे राहूं देण्याचें कबूल केलें व राघोबाचा पक्ष इंग्रजांनीं सोडावा असें ठरलें (ता. २९।२।१७७६). घरचीं भांडणें मिटविण्याकरितां आपण साष्टीची किंमत देत आहोंत हें जाणून नाना फडणवीस गप्प बसला.

**८ तोतया, हैदर व कोल्हापूरकर** :—पुण्याचे मुत्सद्दी, राघोबा व इंग्रज यांच्यामध्यें ह्या झटापटी चालू असतां मराठ्यांच्या अनेक शत्रूंनीं त्याचा फायदा घेतला. थोरल्या माधवरावाच्या कारकीर्दींत एक सुखनिधान नांवाचा कनोजी ब्राह्मण 'मीच पानिपतच्या गर्दींत नाहींसा झालेला सदाशिवराव भाऊ आहें' असें लोकांस सांगूं लागला. परंतु माधवरावानें त्यास कैदेंत टाकलें. इ. स. १७७६ त तो रत्नागिरी येथील कैदेंत होता. तेथील किल्लेदारास वश करून घेऊन या तोतयानें बंड उभारलें. या वेळीं महादजीनें तोतयाचें बंड मोडलें व नानानें त्याची चौकशी केली, तींत तो खोटा ठरला, तेव्हां त्यास फांशीं दिलें.

दक्षिणेंत हैदरानें बराच धुमाकूळ मांडला होता. त्यावर हरिपंत फडके व परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं स्वारी केली. त्या वेळीं त्यांनीं हैदर यास तुंगभद्रेच्या दक्षिण तीरापर्यंत हांकून लावलें, परंतु फौजेंत फितूर असल्यानें मराठ्यांच्या हातून याहून जास्त कामगिरी झाली नाहीं. इतक्यांत नाना फडणविसांकडून दोघां सरदारांस निकडीचीं बोलावणीं आलीं, तेव्हां हैदराशीं चाललेलें युद्ध टाकून ते परत फिरले.

कोल्हापूरकरांनींही या संधीचा फायदा घेतला व त्यांनीं पेशव्यांचा

बराच मुलूख काबीज केला, तेव्हां त्यांजवर महादजीची रवानगी झाली. त्यानें लवकरच कोल्हापूरकरांस जेरीस आणलें, जिंकलेले प्रांत परत घेतले व राघोबा व हैदर यांजबरोबर इतःपर संबंध ठेवणार नाहीं असा करार करून घेतला. इतक्यांत नानाचें निकडीचें बोलावणें आल्यामुळें तोही परत फिरला.

९ **मोरोबाचें कारस्थान** :—इकडे पुणें दरबारीं नानाचा चुलत भाऊ मोरोबा हा नानाचा मनांतून मत्सर करीत असे. त्यानें सखारामबापूच्या दुटप्पी स्वभावाचा फायदा घेऊन त्याच्या अंतःस्थ सल्ल्यानें नानाच्या विरुद्ध कट उभारला व त्याचे साहाय्यक दूर आहेत हें पाहून त्यास सर्व कारभारावरून दूर केलें व आपण राघोबास बोलावण्याचा घाट घातला. इतक्यांत दक्षिणेस गेलेले सरदार घाईघाईनें परत पुरंदरास आले. तेव्हां नानांनीं कटवाल्यांची हजेरी घेतली. बालपेशव्यांविरुद्ध कारस्थान करण्याबद्दलच्या पुराव्याचें माप प्रत्येकाच्या पदरांत घातलें व मोरोबास कैदेंत ठेवलें. सखारामबापूही जावयाचेच, पण थोडक्यांत बचावले.

१० **वडगांवची लढाई** (१७७९) :—याच सुमारास विलायत सरकारकडून लिहून आलें. त्यांत त्यांनीं पुरंदरचा तह नापसंत ठरवून सुरतेचा तह पसंत केला. तेव्हां मुंबई व कलकत्ता येथील गव्हर्नरांचा युद्ध करण्याचा निश्चय झाला. त्यांत पुरंदरचा तह मोडण्यास कांहीं निमित्त हवेंच होतें. पुरंदरचा तह झाला तरी राघोबास आश्रय दिला हें पाहून नानानें सेंट ल्युबिन नांवाच्या फरेंच गृहस्थास मानमरातबानें दरबारीं ठेविलें व त्याबरोबर बाहत्कारीं बोलणें चालविलें. तें पाहून मराठ्यांनीं फरेंचांशीं सख्य करून पुरंदरचा तह मोडला अशी इंग्रजांनीं ओरड केली व राघोबाशीं झालेला सुरतेचा तह कायम करून त्याजबरोबर कर्नल इगर्टन याच्या हाताखालीं सैन्य देऊन पाठविलें. या वेळीं सर्व मराठे सरदारांत ऐक्य झालें होतें, व सर्व जण तयारीनिशीं काल्र्याकडे निघाले. इंग्रज जसजसे पुढें सरकत येऊं लागले, तसतसे मराठे त्यांस अंगावर घेत घेत काल्र्याकडे मागें येत गेले. काल्र्यास कॅप्टन स्टुअर्ट हा शूर सरदार मरण पावला. इंग्रज पुढें येत असतां त्यांस धान्यसामग्री मराठ्यांनीं अजिबात मिळूं दिली नाहीं. शेवटीं मराठे व इंग्रज यांची वडगांव मुक्कामीं लढाई होऊन तींत इंग्रजांचा पराभव झाला. तेव्हां त्यांनीं

तहाचें बोलणें लाविलें. त्यांनीं राघोबास शिंद्यांच्या स्वाधीन केलें, साष्टी-सह सर्व प्रांत परत देण्याचें कबूल केलें व ह्या अटी पाळण्याबद्दल दोन इंग्रज गृहस्थांस ओलीस ठेविलें. तेव्हां मराठ्यांनीं इंग्रजांस परत सुरक्षित जाऊं दिलें (इ. स. १७७९).

**११ नानांचें जंगी कारस्थान** :—पण वडगांवचा तह मुंबईकर इंग्रजांनीं मुळींच पाळला नाहीं व हेस्टिंग्जनेंही मुंबईकरांच्या कृत्यास पूर्ण संमति दर्शविली. जनरल गॉडर्ड हा यापूर्वीच कलकत्त्याहून मुंबईकडे निघाला होता. तो लवकरच मुंबईस येऊन पोहोंचला व त्यानें मराठ्यांशीं पुन्हां पुरंदरच्या तहाच्या धर्तीवर तह करण्यासंबंधीं बोलणें लाविलें, तें नानानें मान्य केलें नाहीं. इतक्यांत राघोबा शिंद्याच्या बरोबर उत्तरेस जात असतां एकदम हल्ला करून निसटला व पुन्हां इंग्रजांच्या आश्रयास गेला. तेव्हां युद्ध फिरून सुरू होणार हें निश्चित झालें. इंग्रजांचें हें धोरण पाहून नानास फार चीड आली व त्यानें इंग्रजांविरुद्ध एक जंगी कारस्थान केलें. त्यांत निजाम, हैदर व नागपूरकर भोसले यांस सामील करून घेतलें. या वेळीं युरोपांत इंग्रज फरेंचांचें युद्ध चालू होतें. तेव्हां इंग्रजांनीं हैदरास न विचारतां त्याच्या मुलुखांतून सैन्य नेऊन फरेंचांच्या माही या ठाण्यावर हल्ला केला व तें ठिकाण घेतलें. फरेंचही या वेळीं हैदरास मदत करण्यास तयार होते. तेव्हां सर्वानुमतें असा विचार ठरला कीं, शिंदे व भोसले यांनीं बंगालवर हल्ला करावा, निजाम व हैदरनें मद्रासवर चाल करावी व पेशव्यांच्या फौजेनें मुंबईकरांचा समाचार घ्यावा.

**१२ युद्ध व तह** :—हा बेत सिद्धीस जाता तर पुढील लढाईचा रंग पूर्णपणें पालटला असता. परंतु दुर्दैवानें तसें झालें नाहीं. निजामास त्याचा गंतूर प्रांत परत मिळाल्याबरोबर त्यानें इंग्रजांविरुद्ध अधिक हालचाल केली नाहीं व भोसल्यास हेस्टिंग्जनें सोळा लाख रुपये दिले तेव्हां तोही गप्प बसला. इतरांनीं मात्र आपआपली कामगिरी बजावण्याची शिकस्त केली.

गॉडर्डनें प्रथम अहमदाबाद शहर काबीज केलें व तो पुण्याकडे चाल करून येऊं लागला. परंतु मराठ्यांनीं टोळ्याटोळ्यांनीं त्याजवर हल्ला करून त्यास सतावून सोडलें. तेव्हां त्यानें पुण्यावर चाल करून जाण्याचा बेत रहित केला. उत्तरेसही इंग्रज फौजेची तीच दशा झाली. शिंद्यांच्या फौजेनें

तीस चोहोंकडून घेरलें. याच वेळीं दक्षिणेंत हैदरअल्लीनें एवढा कहर उडवून दिला होता कीं, वॉरन हेस्टिंग्ज अगदीं टेकीस आला. त्यानें शिंद्याशीं तहाचें बोलणें लावलें व सांगितलें कीं, तुम्ही मध्यस्थी करून पुणें दरबारशीं आमचा बरोबरीचा तह करून द्याल तर मी तुमच्या दिल्लीच्या कारभाराकडें मुळींच लक्ष देणार नाहीं. महादजींस दिल्लीचें राजकारण हातीं घेण्याची उत्सुकता होतीच; तेव्हां त्यानें तें बोलणें मान्य केलें व तहाबद्दल नानाकडें मध्यस्थी केली. शेवटीं ता. १७।५।१७८२ रोजीं तह ठरला. त्यांतील कलमें :

(१) इंग्रजांनीं राघोबाचा पक्ष सोडावा. राघोबा हें भांडणाचें मूळ, युद्धाचें आदिकारण. त्या बाबतींत इंग्रजांस पडतें घ्यावें लागलें.

(२) एकमेकांनीं एकमेकांचीं जिंकलेलीं ठाणीं परत द्यावींत.

(३) साष्टी इंग्रजांकडेच राहूं द्यावी.

(४) शिंद्यास त्यांच्या मध्यस्थीबद्दल भडोच द्यावें.

एकूण साष्टी तेवढी मराठ्यांच्या हातून गेली. तीही जरा ओढून धरलें असतें तर मिळाली असती. नानानें मात्र हैदरच्या संमतीवांचून तह करावयाचा नाहीं, म्हणून पुढें बरेच दिवस तहावर आपली सही केली नव्हती. परंतु इ. स. १७८२ च्या डिसेंबरांत हैदर मरण पावला, तेव्हां आतां जास्त ओढून धरणें योग्य नाहीं हें पाहून नाना फडणविसानें साल्बाईचा तह कायम केला. इ. स. १७८३ सालीं भांडणाचें मूळ राघोबा कोपरगांवीं मृत्यु पावला. त्यास तीन पुत्र होते. एक दत्तक अमृतराव, दुसरा औरस बाजीराव तो धार येथें इ. स. १७७४ त जन्मास आला, तिसरा चिमाजी त्याचे मृत्यूनंतर जन्मला.

**१३ म्हैसूरकरांशीं दुसरें युद्ध :**—आतां हैदरच्या कामगिरीचें वर्णन करूं. हैदरनें युद्ध पुकारलें व तो मोठ्या वेगानें मद्रासपर्यंत चाल करून आला. वाटेंत त्यानें कर्नल बेलीच्या सैन्याचा पराभव करून तें कापून काढलें, मन्रोचा पराभव केला, व इ. स. १७८० च्या ऑक्टोबर महिन्यांत अर्काट काबीज केलें. ही बातमी कळतांच वॉरन हेस्टिंग्जनें सर आयर कूट यास मद्रासेस रवाना केलें व कर्नल गॉडर्ड यास मराठ्यांचें युद्ध लवकर आवरण्याचा हुकूम केला. कूट आल्यापासून युद्धास निराळें वळण लागलें. कारण त्यानें हैदरचा पोर्टोनोव्हो येथें पराभव केला. पुढें पालिलोर मुक्कामीं त्यास जेरीस आणला व शिवलिंगड येथें त्याचा पुन्हां पराभव केला. परंतु हैदर अशानें खचून गेला नाहीं. त्यास

लवकरच फरेंचांचें साहय मिळालें. इंग्रज व फरेंच आरमारांची लढाई झाली. इंग्रज आरमाराच्या विरोधास तोंड देऊन फरेंच सैन्य पूर्व किनाऱ्यावर उतरलें. तेव्हां हैदरनें त्याच्या मदतीनें कडलोर काबीज केलें व त्याचा मुलगा टिपू यानें तंजावर येथें कर्नल ब्रेथवेटचें सैन्य कापून काढलें. इतक्यांत हैदर मरण पावला. व इंग्रज फरेंचांचा तह झाल्यानें टिपूस फरेंचांची मदत मिळणें बंद झालें. यामुळें टिपूनें कर्नाटकांतून काढता पाय घेतला. टिपूनें बिदनूर व पुढें बंगळूरपर्यंत चाल करून तेंही काबीज केलें. तेव्हां अगदीं टेकीस येऊन मद्रासच्या गव्हर्नरानें तहाचें बोलणें लावलें. इ. स. १७८४ त मंगळूर येथें तह झाला. त्यांत एकमेकांनीं एकमेकांचीं जिकलेलीं ठाणीं परत द्यावींत असें ठरलें. अशा रीतीनें इंग्रजांचें म्हैसूरकरांशीं दुसरें युद्ध खलास झालें.

**१४ मराठे व इंग्रजः**—साल्बाईच्या तहानें महादजी शिंदे याचें प्रस्थ फार वाढलें. पेशव्यांशीं इंग्रजांचें कांहीं बोलणें व्हावयाचें तें महादजीच्या मध्यस्थीनें व्हावयाचें असा प्रघात पडला. येथून पुढें बहुतेक मराठे सरदार स्वहितावर नजर ठेवून राहात व जरूरीपुरते एक होत. नांवाला पेशव्याचा अधिकार मानीत व एरव्हीं स्वतंत्र वृत्तीनें वागत. तरीसुद्धां पुढील दहा वर्षांत मराठ्यांची सत्ता पुष्कळ वाढली व मराठ्यांस पुन्हां पूर्वीचें वैभव प्राप्त झालें. इंग्रज मात्र ह्या दोन युद्धांत टेकीस आले व त्यांनीं पुढील पांच सहा वर्षें आपल्या राज्याची व्यवस्था करण्यांत घालविलीं.

---

## भाग १४ वा

# महादजीचा पराक्रम

## ( इ. स. १७८२ ते इ. स. १७९४ )

**१ दुहीचा परिणाम :**—नारायणरावाचा खून होऊन मराठ्यांमध्यें आपसांत दुही माजली व त्या दुहीचा परिणाम म्हणजे मराठ्यांचें लक्ष एकसारखें

इ. स. १७७४ पासून इ. स. १७८२ पर्यंत इंग्रजांशीं लढण्याकडे व दरबारचीं कारस्थानें हाणून पाडण्याकडे लागून राहिलें. थोरल्या माधवरावाच्या काळीं मराठ्यांनीं दक्षिणेस हैदरला श्रीरंगपट्टणपर्यंत रेटीत नेला होता व उत्तरेस दिल्लीस बादशहाला कबजांत घेऊन रोहिल्यांवर सूडही उगविला होता. परंतु ह्या नंतरच्या काळांत हैदरचा जोर वाढला व उत्तरेस तर फिरून चंबळेच्या पलीकडे मराठ्यांची फारशी सत्ता राहिली नाहीं. नारायणरावाचा खून झाल्यावर मराठ्यांची बहुतेक फौज दक्षिणेंत परत आली. हें पाहून अयोध्येच्या वजिरानें दिल्लीस पुन्हां आपली सत्ता प्रस्थापित केली व तेथें नजफखान नामक सरदाराची नेमणूक करून तो परत अयोध्येस गेला. नजफखान मोठा कर्तबगार असून त्यानें मृतप्राय बादशाहीस सचेतन करण्याचा बराच प्रयत्न केला. तो इ. स. १७८२ त मरण पावल्यावर मुसलमानी सरदारांत बादशाहीचें रक्षण करील असा कर्तबगार पुरुष कोणी राहिला नाहीं. अशा वेळीं संधि साधून मराठ्यांची सत्ता दिल्लीस प्रस्थापित करणारा पुरुष महादजी शिंदे होय.

**२ महादजीचें पूर्वचरित्र व धोरण :**—महादजी हा राणोजीचा दासीपुत्र. राणोजीचे औरस पुत्र जयाजी व दत्ताजी ह्यांनीं स्वामिकार्यार्थ देह खर्च केले. नातू जनकोजी हाही पानिपतावर गारद झाला. तेव्हां महादजीस शिंद्यांच्या अधिकाराचीं वस्त्रें मिळालीं. महादजी पानिपतचे लढाईत लंगडा झाला. त्याचा स्वभाव महत्त्वाकांक्षी होता. पेशव्यांच्या कारभाऱ्यांचा अंमल उघड झुगारून न देतां, होईल तितकें प्रबळ व स्वतंत्र व्हावें असें त्याचें धोरण होतें. सालबाईचा तह होण्यापूर्वी त्यानें इंग्रजांशीं प्रथम स्वतंत्र तह केला व मग आपलें वजन खर्चून लढाई संपविण्याबद्दल नानास भीड घातली. इंग्रजांबरोबर झालेल्या युद्धांत त्याचा कांहीं ठिकाणीं पराभव झाला, तेव्हां त्यास कवायती पलटणीचें महत्त्व कळून आलें. नंतर त्यानें आपल्या सैन्यास शिक्षण देण्याकरितां फरेंच अधिकारी नेमले व जनरल डिबॉईन यास दरमहा एक हजार रुपये पगारावर चाकरीस ठेवलें. कवायती फौजा मोठ्या प्रमाणावर तयार करणारा पहिला पुरुष महादजी शिंदेच होय. इंग्रजांचें युद्ध संपल्यावर त्यानें प्रथम आपले गेलेले प्रांत मिळविले व नंतर उत्तरेच्या राजकारणाकडे लक्ष दिलें.

३ **वकील–ई–मुत्लक :**—नजफखान वारल्यावर त्याचा मुलगा आफरासियाबखान व त्याचा सरदार महमदबेग हमदानी यांच्यामध्यें अधिकाराबद्दल तंटे सुरू झाले. त्यांत आफरासियाबखानानें महादजीस आपल्या मदतीस बोलाविलें. इतक्यांत आफरासियाबखानाचा खून झाला. व त्यामुळें महादजीचा पुढील मार्ग बराच मोकळा झाला. बादशहानें त्यास आपली वजीरी देऊं केली. परंतु त्यानें वकील–इ–मुत्लक म्हणजे बादशहाचा मुख्य अधिकारी ही पदवी पेशव्यांचे नांवानें घेऊन आपण पेशव्यांचा प्रतिनिधि म्हणून जागा पत्करली. अशा रीतीनें त्यानें चतुरपणानें पेशव्यांचा बोज कायम ठेवला. बादशाहीचा प्रत्यक्ष अंमल फक्त दिल्ली प्रांतापुरताच होता, परंतु कायदेशीर दृष्टीनें रजपूत हे बादशहाचे मांडलिक होते, अयोध्येचे अधिकारी हे वजीर होते, इंग्रज बंगालचे दिवाण होते व निजाम हा दक्षिणच्या सहा सुभ्यांचा सुभेदार होता. या सर्वांच्याकडे खंडणी मागण्याचा बादशहास अधिकार होता. अकबर–औरंगजेबासारखे बादशहा हे अधिकार बजावीत असत. बादशाही दुर्बल झाली तसे सुभेदार स्वतंत्र होऊं लागले; व या सर्वांस स्वतःचें स्वातंत्र्य संभाळण्यासाठीं बादशाही दुर्बल ठेवणें इष्ट होतें. मराठ्यांसारखे जे जे लोक बादशाहींत प्रवेश करून तींत नवजीवन घालण्याचा यत्न करीत, त्यांस हे सर्व विरोध करीत याचें बीज वरील गोष्टींत आहे, हें नीट लक्षांत ठेविलें पाहिजे.

४ **लालसोटची लढाई:**—अधिकार प्राप्त झाल्याबरोबर महादजीनें त्याच्या अंमलबजावणीस सुरवात केली. रजपुतांस मराठ्यांचें वर्चस्व आवडलें नाहीं. मुसलमानांनाही मराठे पानिपतवर एक वेळ फसलेला डाव पुन्हां साधूं लागले हें पाहून वैषम्य वाटलें. रजपुतांत जोधपूरचा राजा अभयसिंग व मुसलमानांत महमदबेग हमदानी हे या कामीं प्रमुख होते. महमदबेग यानें वरकरणीं महादजीस सख्य दाखवून आंतून तो रजपुतांस सामील होता. इतकें झाल्यावर रजपूत लोकांनीं खंडणीचा हप्ता चुकविला. हें पाहतांच महादजी बादशाही सैन्य घेऊन रजपुतांवर चाल करून गेला. दोन्ही सैन्यांची गांठ लालसोट ( जयपूरचे पूर्वेस ४३ मैलांवर ) येथें पडली. या लढाईंत महादजीचा पराभव झाला (इ. स. १७८७).

५ **गुलामकादर :**—या पराभवामुळें फिरून मराठ्यांचा अंमल दिल्लींतून उठल्यासारखा झाला. दिल्लीस मुसलमान प्रबळ होते, महमदबेग मरण

पावला. पण त्याची जागा इस्माईलबेग यानें भरून काढली. त्यानें अलिगड-चा किल्ला बळकाविला व आग्र्यास वेढा दिला. गुलामकादर हा तर बादशहाचा वकील–इ–मुत्लक बनला! इतकें झालें तरी महादजी डगमगला नाहीं. शांत चित्तानें त्यानें मथुरेचें ठाणें ग्वालेरीस नेलें. पुण्याहून मदत बोलाविली; व तेवढ्यावर विसंबून न राहतां आपणही सैन्याची जमवाजमव केली. दक्षिणेंतून नाना फडणविसानें अलिजा बहादूर व तुकोजी होळकर यांची रवानगी केली. प्रथम महादजीनें मुसलमानांकडे आपला मोर्चा वळविला. लवकरच त्याचा शूर सरदार लखबादादा यानें आग्र्याजवळ इस्माईल बेगचा पूर्ण पराभव केला. इकडे गुलामकादरला अधिकार प्राप्त झाल्या-वर बादशहाजवळ गुप्त धन आहे असें कोणीं त्याच्या मनांत भरवून दिलें म्हणून तो बादशहास गुप्त धन दाखविण्याबद्दल सांगूं लागला. परंतु बाद-शहास त्याचें समाधान करतां येईना तेव्हां त्यानें वृद्ध बादशहाचा अनन्वित छळ केला व त्याचे डोळे काढले. या वेळीं बादशहाला भडभडून येऊन वाईट वाटलें! इस्माईलचा पराभव झाल्यावर महादजी मोठ्या वेगानें दिल्लीकडे आला. तेव्हां गुलामकादर पळून जाऊं लागला, पण महादजीनें त्यास लवकरच पकडलें व त्याच्या कृत्यांबद्दल हालहाल करून त्यास ठार मारलें.

६ **साम्राज्यसत्तेचा सूत्रचालक:**—मुसलमानांचा पाडाव झाल्यावर त्यानें फिरून आपली सत्ता स्थिरस्थावर केली व मोठें सैन्य घेऊन तो रजपुतांवर चाल करून आला व मेडतें या ठिकाणीं त्यांचा पूर्ण पराजय करून लाल-सोटच्या पराजयाचा सूड उगविला (इ.स. १७९०). येथून पुढील वर्षांत महादजीच्या भाग्याचा कळस झाला. बादशहानें त्यास मोठमोठे किताब दिले. मराठे सरदार त्याजकडे आदरानें पाहूं लागले. शीख, रजपूत व मुसलमान नामोहरम झाले. इंग्रजांस भीति उत्पन्न झाली. महादजीनें बादशहाकडून सर्व राज्यांत गोवध बंद करविला. बादशहाचे रक्षणासाठीं त्यानें जनरल डिबॉईन याचे हाताखालीं तीन कंपूंचें[१] एक मोठें सैन्य तयार केलें. आग्र्यास सॅंगस्टर या स्कॉच इसमानें दारुगोळा तयार करण्याचा कारखाना काढला. जनरल

---

१ टीप:—कंपू म्हणजे (Brigade). यांत दहा पायदळ पलटणी, एक पांचशें लोकांच्या शिबंदीची तुकडी, पांचशें तुर्क स्वार व साठ तोफा इतकी भरती होती.

डिबॉईन याचा थाट एकाद्या जहागिरदाराचे वर होता. त्यास सैन्याचे खर्चा-बद्दल अंतर्वेदीतील प्रदेश जहागीर दिलेला होता. लढतांना तो आपल्या राष्ट्राचें ( सेव्हॉयचें ) पांढरें निशाण वापरी. वास्तविक अशा रीतीनें परक्या सैनिकास डोक्यावर बसूं देणें चांगलें नव्हतें. परंतु बादशाहीचे रक्षणाकडे लक्ष देऊन त्यास ही गोष्ट पतकरावी लागली असें दिसतें. मराठेशाहीच्या उत्तर कालांत मराठी फौजेचें महत्त्व उत्तरोत्तर कमी होत जाऊन अरब, रांगडी, पुरभय्ये, असल्या परकी भाडोत्री सैनिकांचें महत्त्व वाढत होतें.

**७ नाना व महादजी:**—उत्तरेस याप्रमाणें स्थिरस्थावर झाल्यावर महादजी दक्षिणेंत दरबारीं येण्यास निघाला. याचीं कारणें अनेक आहेत. एक तर तो दक्षिणेंत फार दिवस आला नव्हता. व मराठे सरदार कितीही दूर गेले तरी त्यांचा आपले वतनाचे गांवाकडे फार ओढा असतो. दुसरें या वेळीं इंग्रज व निजाम हे टिपूबरोबर लढत होते. व त्यांना मराठे मदत करीत होते. उत्तरेस फार दिवस घालविल्यानें महादजीस इंग्रजी धोरणाचा अजमास बिन-चूक लागलेला होता. त्या धोरणाचे दृष्टीनें मराठ्यांनीं टिपूविरुद्ध इंग्रजांस मदत करणें गैर होतें. त्या धोरणाचा त्यास पुणें दरबारच्या मुत्सद्यांशीं विचार करावयाचा होता. शिवाय अलिजाबहाद्दर व तुकोजी होळकर हे उत्तरेस आल्या-पासून एकसारखे त्याच्याशीं तंटे करीत होते.[१] या सर्व तंट्यांचा केव्हां तरी कायमचा निकाल लावून घेणें जरूर होतें. परंतु त्याच्या येण्याचें सर्वांत मह-त्वाचें कारण म्हणजे उत्तरेस बादशहाचा मुख्य अधिकारी झाल्यावर त्यास दक्षिणेस पेशव्यांचाही कारभारी होण्याची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाली हें होय. महादजी पुण्यास आल्यावर त्याच्या सन्मानार्थ मोठा दरबार भरविण्यांत आला. त्या प्रसंगीं महादजीनें मोठ्या आदरानें पेशव्यांस बादशहाकडून आणलेले नजराणे व वकील–इ–मुत्लक (कुलमुखत्यारी) या अधिकाराचीं वस्त्रें दिलीं व आपण पेशव्यांचे जोडे कांखेंत मारून जवळच अदबीनें उभा राहिला व म्हणाला 'श्रीमंतांच्या पायाच्या थोर पुण्याईनें प्राप्त झालेलें वैभव उपभोगण्यास श्रीमंतच पात्र आहेत. मी त्यांच्या पायाचा चाकर. माझ्या वडिलांनीं जें काम

---

१ **टीप:**—महादजी दक्षिणेंत गेल्यावर हे तंटे विकोपास जाऊन शिंदे व होळकर यांच्या फौजेची गांठ लाखेरी येथें पडली व भयंकर युद्ध होऊन होळकराचा पराभव झाला (इ. स. १७९२).

केलें, तेंच करण्यांत मलाही भूषण वाटतें.' याप्रमाणें मोहक भाषण करून महादजीनें तरुण पेशव्याचें मन काबीज केलें व मग आपणास कारभारी करण्याबद्दल त्याचेजवळ एकांतांत हलकेच गोष्ट काढली. परंतु तरुण पेशवा नाना फडणविसाचे उपकार स्मरत होता. त्यानें सांगितलें कीं, 'नाना व तुम्ही दोघे माझे दोन हात आहांत. यांतील कोणीही एक गेला तरी मी लंगडा पडणार, तेव्हां मला तुम्ही दोघेही सारखेच हवेत.' हें उत्तर ऐकून महादजी मनांत वरमला. नाना व महादजी या दोघांच्या मनांत परस्परांविषयी फार दिवसांपासून एक प्रकारची अढी होती ती काढून टाकावी म्हणून एक दिवस सर्वांचीं बोलणीं झालीं व सर्व गोष्टींची निखालसता झाली. अनेक संशय दूर झाले. याप्रमाणें उत्तरेचा मोहरा महादजी व दक्षिणचा मुत्सद्दी नाना यांचें ऐक्य झालें. "हल्लीं श्रीमंतांचे पुण्यप्रतापेंकरून व राजश्री पाटीलबोवांचे बुद्धि व तरवारेंकरून सर्व घरास आलें. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या, त्यांचा बंदोबस्त शककर्त्यांप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे हें पुढेंच आहे." हे तत्कालीन पत्रांतील उद्गार मराठी मुत्सद्यांच्या डोळ्यांपुढें असलेल्या उज्ज्वल आशापूर्ण भविष्यकाळाचें उत्कृष्ट चित्र दाखवितात. मराठेशाहीस येथून जास्तच भाग्याचे दिवस येणार असें सर्वांस दिसूं लागलें. इतक्यांत काल विपरीत आला. महादजी शिंदे वानवडी येथें नवज्वरानें मृत्यु पावले! (इ. स. १७९४)

८ **योग्यता**:—मराठेशाहीच्या उत्तर काळांत महादजी शिंदे हा एक थोर कर्तबगारीचा पुरुष होऊन गेला. तो स्वार्थी असेल, पण कोणता त्या काळचा मराठी सरदार स्वार्थी नव्हता? तो महत्त्वाकांक्षी असेल, पण राजकारणांत महत्त्वाकांक्षा असणें हें काय पाप आहे? तरी त्याच्यामुळें मराठ्यांचें नांव त्या काळीं उत्तर हिंदुस्थानांत गाजून राहिलें यांत शंका नाहीं. पेशव्यास त्यानें हिसके दिले, राघोबाचें खूळ खेळविलें, हे त्याचे दोष कबूल केले पाहिजेत. परंतु 'मूळच उपटून काढावें' ही थोरल्या बाजीरावाची आकांक्षा कोणीं सफल केली? राघू भराऱ्यानें अटकेपार झेंडे नाचविले त्याचें सार्थक कोणीं केलें? पानिपतचें अपयश कोणीं धुऊन काढलें? स्वर्गस्थ बाजीराव, नाना, भाऊ यांचे अतृप्त हेतू कोणीं पुरविले? या सर्व प्रश्नांस एकच उत्तर द्यावें लागेल आणि तें म्हणजे 'महादजीनें' हेंच होय!

*

# भाग १५ वा

# सवाई माधवरावाच्या पेशवाईचा शेवट

## (इ. स. १७८३–९५)

**१ मराठे व कर्नाटक :**—मागील भागांत सांगितल्याप्रमाणें उत्तरेस महादजी दिग्विजय करीत असतां दक्षिणेस पुणें दरबार गेल्या युद्धांत आपलें झालेलें नुकसान भरून काढीत होतें. पानिपतानंतर हैदरचा उदय झाला. तेव्हांपासून कर्नाटकाचे बाजूस मराठ्यांचा पाय आंत आंत येत होता. नानासाहेब पेशवा असतांना मराठ्यांनीं शिवाजीच्या वेळच्या सर्व स्वराज्याचे परगणे काबीज केले व सावनूर, कडप्पा, कर्नूल, अर्काट येथील नबाबांचा पराभव केला व त्याजपासून खंडणी घेतली. माधवराव पेशवा असतांना मराठे सरदारांना हैदरशीं तोंड देऊन प्रथम कृष्णा व तुंगभद्रा या नद्यावरील प्रदेशावर अंमल बसवावा लागला व नंतर चित्रदुर्ग बिदनूर त्यादि ठाणीं घेऊन मराठ्यांनीं श्रीरंगपट्टणास वेढा घातला. एवढ्यांत माधवरावाचा मृत्यु ओढवला. त्यानंतरच्या काळांत मराठी राज्यांतील बेबंदशाहीचा फायदा घेऊन हैदरनें फिरून कृष्णा व तुंगभद्रा या नद्यामधील धारवाडपर्यंतचा प्रदेश काबीज केला. पुढें इंग्रज मराठ्यांच्या युद्धांत हैदरनें मराठ्यांस साह्य केलें. याबद्दल नाना फडणविसानें हैदरचें त्या प्रांतांतील बऱ्याच भागावरचें स्वामित्व कबूल केलें.

**२ टिपू :**—इंग्रजांशीं युद्ध चालू असतांच हैदर मृत्यु पावला व त्याचा मुलगा टिपू यानें एक दोन लढायांत इंग्रजांचा पराभव करून तें युद्ध आटोपतें घेतलें व आपण श्रीरंगपट्टणच्या गादीवर बसला. टिपू म्हणजे अठराव्या शतकांतील प्रति औरंगजेब होय. इस्लामी धर्मस्थापनेची त्यास फार इच्छा होती. तो स्वतःचे राज्यांत शांतता राखीत असे. त्यामुळें प्रजा सुखांत होती. तो स्वतः मोठा कल्पक असून वजनें, मापें व कालमापन वगैरे बाबतींत त्यानें इस्लामी संस्कृतीस अनुसरून अनेक फेरफार केले. टिपू हा उत्तम सेनानायक होता. व म्हणूनच त्यानें आपल्या अनेक शत्रूंशीं मोठ्या शौर्यानें तोंड दिलें.

हैदर व टिपू ही जोडी शिवाजीप्रमाणें सतराव्या शतकाच्या पूर्वार्धांत उत्पन्न झाली असती तर कदाचित् त्यास चिरस्थायी सत्ता स्थापन करतां आली असती. टिपू हा महत्त्वाकांक्षी होता. तेव्हां त्यानें राज्यांतील सत्ता आपल्या हातीं आल्याबरोबर आपला मुलूख वाढविण्यास सुरवात केली व लवकरच अडीच कोटींचें राज्य, तुडुंब भरलेला खजिना, शस्त्रास्त्रांनिशीं सज्ज असें दीड लाख सैन्य, उत्तम तोफखाना आणि राज्याच्या सरहद्दीवर कडेकोट किल्ल्यांची तयारी, इतकी सामुग्री आपल्या कर्तृत्वानें उभारून त्यानें आपला दरारा सर्वांवर बसविला.

**३ टिपूशीं पहिलें युद्ध :—** ( १७८४–८७ ) अशा स्थितींत त्याचें मराठ्यांशीं सख्य टिकणें शक्यच नव्हतें. टिपूनें प्रथम निजामास दुखविलें व नंतर नरगुंद संस्थानाकडे आपला मोर्चा वळविला. येथील संस्थानिक भावे हे पूर्वी पेशव्यांचे मांडलिक होते. परंतु इंग्रजांशीं युद्ध चालू असतां हैदरची मदत मिळविण्याकरितां जो मुलूख नानांनीं त्यास दिला होता, त्यांत हें संस्थान हैदरकडे गेलें होतें. टिपूच्या मनांत तें संस्थान खालसा करावें असें होतें. म्हणून त्यानें नरगुंदकराकडे जबर खंडणी मागितली. या कामीं नानांनीं टिपूजवळ रदबदली करून पाहिली, पण उपयोग झाला नाहीं. तेव्हां मराठ्यांनीं नरगुंदकरांस मदत करण्याचें ठरविलें. निजामही त्यांत सामील झाला. अशा रीतीनें मराठे व निजाम यांचें टिपूशीं युद्ध सुरू झालें (इ. स. १७८४). प्रथम टिपूनें आपण शरण आलों असें दाखवून खंडणी देण्याचें कबूल केलें. परंतु ही केवळ हूल होती. कारण त्यानें लवकरच नरगुंदकरास विश्वास दाखवून ठार मारलें. ही बातमी कळतांच मराठे व निजाम यांनीं जोराची तयारी करून ते टिपूवर चाल करून आले. मराठ्यांनीं बदामीचा किल्ला सर केला. निजामानें पूर्वेकडील अदोनी शहर काबीज केलें. नंतर त्याच्या फौजेनें नरगुंद आपल्या ताब्यांत घेतलें. व शेवटीं शिरहट्टीही घेतली. मराठे व निजाम यांच्या फौजेचा हा पराक्रम पाहून टिपूनें तहाचें बोलणें लावलें व त्या तहान्वयें टिपूनें ४५ लक्ष रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. कित्तूर बदामी व नरगुंद हे तालुके मराठ्यांस मिळाले व अदोनी निजामाकडे गेली (इ. स. १७७८). मराठ्यांना मिळालेले हे सर्व प्रांत तुंगभद्रेच्या उत्तरेकडील

आहेत, ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे माधवरावाच्या मृत्यूपासून मराठ्यांचा पाय कसा आंत येत होता हें ध्यानांत येईल.

**४ त्रिवर्गांची जूट :**—मराठे व निजाम यांच्याशीं टिपूनें तहाचें बोलणें लावलें याचें सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे इंग्रजांनीं या वेळीं टिपूबरोबर तोंड देण्याची जोरानें तयारी चालविली होती हें होय. वॉरन हेस्टिंग्जनंतरचा दुसरा गव्हर्नर जनरल कॉर्नवॉलिस यानें प्रथमपासूनच युद्धाची तयारी चालविली होती व कांहीं पलटणें विलायतेहून मागविलीं होतीं. इ. स. १७८४–८७ पर्यंतच्या मराठे व टिपू यांच्या युद्धांत इंग्रजांनीं तटस्थपणा राखला होता, परंतु त्यानंतर त्यांनीं मराठ्यांशीं सलगीचें धोरण राखलें. आपण आगळीक केली असें न दाखवितां युद्ध उपस्थित करावयाचें हें कॉर्नवॉलीसचें धोरण होतें. यासाठीं कॉर्नवॉलीसनें पुढील युक्ति योजिली. इ. स. १७८८ त इंग्रजांनीं निजामाचा गंतूर प्रांत आपल्या ताब्यांत घेऊन त्याचे तैनातीस फौज दिली. त्या वेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं, "तुम्ही या फौजेचा वाटेल तसा उपयोग करावा. परंतु तुम्ही आमच्या दोस्तांविरुद्ध मात्र तिचा उपयोग करू नये." इतकें सांगून दोस्त सरकारांची जी याद इंग्रजांनीं दिली तींत टिपूचें नांव गाळलें ! हें सर्व पाहून टिपू मनांत समजला व त्यानें फ्रेंचांशीं मैत्री करून आपलें सैन्य उत्तम तयार केलें. याच सुमारास टिपूनें त्रावणकोरचा राजा रामराजा किरीटी याजवर स्वारी केली. तो राजा इंग्रजांचा दोस्त होता. तेव्हां टिपूकडून ही आगळीक घडून आली असें दिसून येतांच कॉर्नवॉलीसनें युद्ध पुकारलें (इ. स. १७९०). मराठे व निजाम या दोघांनींही त्यास मदत करण्याचें कबूल केलें. कारण दोघांच्याही राज्याचा बराच मोठा भाग टिपूनें बळकाविला होता. मराठे, निजाम व इंग्रज यांनीं मिळून टिपूचें राज्य खालसा करावें व तिघांनीं तें सारखें वाटून घ्यावें अशा कराराच्या अटी होत्या. फरान्समध्यें याच सुमारास राज्यक्रांति चालू असल्यामुळें फ्रेंचांची टिपूस चांगली मदत होणें शक्य नव्हतें. अशा रीतीनें सर्वच गोष्टी या वेळीं टिपूस प्रतिकूल होत्या.

**५ युद्ध व तह :**—इतकें झालें तरी टिपू डगमगला नाहीं. त्यानें शत्रूंशीं निकरानें तोंड देण्याचें ठरविलें. मदत मिळविण्याकरितां तुर्कस्थानपर्यंत वकील पाठविले. मराठ्यांच्या बाजूनें परशुरामपंत पटवर्धन यानें इ. स.

१७९० त धारवाडास वेढा घातला. टिपूचा सरदार बद्रीजमालखान यानें जवळ जवळ एक वर्षभर शत्रूस दाद दिली नाहीं. मराठ्यांचे मदतीस इंग्रजी पलटणें आलीं, त्यांचीही डाळ शिजेना. शेवटीं परशुरामपंतानें मोठा नेट धरून इ. स. १७९१ त किल्ला सर केला. कॉर्नवॉलीसनें लढाईचा अधिकार स्वत:कडे घेतला. त्यानें बंगलूर काबीज करून टिपूचा अरिकेर येथें पराभव केला, परंतु टिपूच्या सैन्याच्या टोळ्यांनीं इंग्रजी सैन्यास दाणावैरण मिळू दिली नाहीं. अगदीं उपासमारीची वेळ आली हें पाहून गव्हर्नर जनरल यास निराश होऊन परत जावें लागलें. या वेळीं इंग्रजी फौज फार विवंचनेंत होती. इतक्यांत हरिपंताचे हाताखालची मराठी फौज तेथवर येऊन पोहोंचली. तिच्याजवळ धान्याचा मुबलक पुरवठा होता. तो त्यांनीं इंग्रजांस दिला. पुढील वर्षी आतां सर्वांनीं मिळून श्रीरंगपट्टणवर चाल करून जावयाचें ठरलें. त्याप्रमाणें इ. स. १७९२ सालीं त्रिवर्ग टिपूवर चाल करून गेले. टिपूनें बरेच दिवस श्रीरंगपट्टण लढविलें, परंतु अखेर नाइलाज होऊन त्यानें तहाचें बोलणें लाविलें. इंग्रजांच्या मनांत तह करावा असें नव्हतें. परंतु टिपूस समूळ नाहींसा केल्यास इंग्रज फार भारी होतील म्हणून मराठ्यांना टिपूचा शह कायम ठेवणें जरूर वाटलें व त्यांनीं तहाचा नेट लाविला. तेव्हां कॉर्नवॉलीस तह करण्यास तयार झाला. इ. स. १७९२ च्या तहांत असें ठरलें कीं,

(१) टिपूनें आपलें अर्धें राज्य दोस्तांस द्यावें.

(२) खर्चाबद्दल तीन कोट रुपये द्यावेत.

(३) व या अटी पाळीपर्यंत आपले दोन पुत्र ओलीस ठेवावेत.

या अटींप्रमाणें मराठ्यांचे वाट्यास एक कोट रुपये व सावनूर संस्थानापर्यंतचा प्रदेश आला. म्हणजे पुन्हा कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील जवळ जवळ सर्व प्रदेशावर मराठ्यांची मालकी झाली. इंग्रजांशीं युद्ध चालू असतां मराठ्यांचा दक्षिणेकडील जो प्रदेश हैदरनें घेतला तेवढा जवळ जवळ त्यांनीं परत मिळविला. एकंदरींत या युद्धांत इंग्रजांनीं मराठ्यांस किंवा निजामास विशेष प्रबळ न होऊं देतां टिपूस हतबल करण्याचा डाव साधून घेतला.

**६ इंग्रजांचा तटस्थपणा :**—टिपूशीं युद्ध झाल्यानंतर लवकरच लॉर्ड

कॉर्नवॉलीस हा गव्हर्नर जनरल विलायतेस गेला व सर जॉन शोअर त्याचे जागीं आला. या वेळीं कंपनीसरकारनें तटस्थ वृत्तीनें राहावयाचें, देशी संस्थानिकांच्या भांडणांत व कटकटींत पडावयाचें नाहीं, असें धोरण ठरविलें होतें. परंतु या धोरणापासून त्यांना फायद्यापेक्षां तोटाच जास्त होता. कारण सर्व हिंदुस्थानभर इंग्रज, मराठे, टिपू व निजाम यांच्यामध्यें एक प्रकारची चढाओढ लागून राहिलेली होती व फरेंच व त्यांचे धंदेवाईक सैनिक हे ठिकठिकाणीं इंग्रजांविरुद्ध मदत देण्यास टपले होते. टिपू हा नुकताच हतबल झालेला होता. निजाम इंग्रजांचे कह्यांत होता. तेव्हां बाकी राहिले मराठे व इंग्रज. यांच्यांत इंग्रज तटस्थ राहातात असें दिसल्याबरोबर मराठ्यांनीं त्या गोष्टीचा लवकरच फायदा घेतला.

**७ निजाम व मराठे :**—राक्षसभुवनच्या लढाईत मराठ्यांनीं निजामास नामोहरम केलें होतें. परंतु पुढें त्याचें प्रस्थ वाढलें. तेव्हां निजामानें कबूल केलेला मुलूख मराठ्यांस दिला नाहीं. मध्यंतरीं मराठेशाहीस संकटानें घेरलें असल्यामुळें नानानें निजामास दुखविलें नाहीं. निजाम हा दक्षिणचा सुभेदार. त्याच्या ६ सुभ्यावर चौथाई गोळा करण्याचा हक्क मराठ्यांचा पूर्वापारचा होता. निजाम तो धुडकावून लावण्याचा यत्न करी. मराठे तो संधि मिळेल तसा बजावून घेत, म्हणून मराठे व निजाम यांचा हिशेबाचा वाद नेहमीं चाले. त्याप्रमाणें इ. स. १७९४ त नानानें निजामाकडे किती येणें निघतें याची याद करून ती त्याजकडे पाठविली. परंतु नुकतेच महादजी व हरिपंत फडके वारले होते, तेव्हां मराठ्यांचा पूर्वीचा जोर दिसणार नाहीं असें त्यास वाटलें व त्यानें नानांच्या यादीस बेपर्वाईचें उत्तर दिलें. निजामाचा दिवाण मशीरउल्मुल्क यानें तर 'पेशव्यास आम्ही लंगोटी नेसून लोटा घेऊन काशीस जावयास लावूं' अशी धमकी दिली. यामुळें प्रकरण चिरडीस गेलें व युद्ध उपस्थित झालें.

**८ खर्ड्याची लढाई :**—निजामास इंग्रज आपल्याला मदत करतील असा भरंवसा होता व त्या मदतीचे जोरावरच तो या सर्व मोठमोठ्या गोष्टी बोलत होता. पण सर जॉन शोअरनें सर्व मराठे सरदारांची एकी पाहून दूरदर्शीपणानें आयत्या वेळीं निजामास मदत करण्याचें नाकारलें ! किंबहुना इ. स. १७८२ च्या साल्बाईच्या तहाप्रमाणें वागावयाचें तर त्याला मराठ्यांशीं

निष्कारण युद्ध उपस्थितही करतां येत नव्हतें. नानानें मात्र कडेकोट तयारी केली. या लढाईत दौलतराव शिंदे, तुकोजी होळकर हे प्रसिद्ध सरदार होते; नेहमीं चुकवाचुकवी करणारे गायकवाड व भोसले हेही होते. दक्षिणचे पेशव्यांचे विश्वासू सरदार पटवर्धन आदिकरून मंडळीही होती. एकंदर फौज ऐंशी हजार झाली. परशुरामभाऊ हा मुख्य सेनापति होता. दोन्ही सैन्यांच्या चकमकी प्रथम परिंडें गांवाजवळ झाल्या. तींत निजामची सरशी होती, परंतु पुढें लवकरच निजामाची फौज खर्डे या गांवांत कोंडली गेली व त्यामुळें निजामाचा नाइलाज होऊन तो शरण आला. मराठ्यांनीं त्याजपासून परिंड्यापासून उत्तरेस तापी नदीपर्यंतचा मुलुख घेतला व युद्धाचे खर्चाबद्दल तीन कोटी रुपये मिळावेत असें ठरलें.

९ **मराठ्यांचें दुर्दैव** :—याप्रमाणें उत्तरेचे मुसलमान व रजपूत, दक्षिणचा टिपू व पूर्वेकडील निजाम हे मराठ्यांपुढें हतबल झाले व मराठी सत्तेचें तेज पानिपतपूर्वीच्या दिवसांप्रमाणें तळपूं लागलें, कांहीं काळ इंग्रजांचें मुळींच तेज पडेना अशी स्थिति झाली. परंतु विधिघटना निराळीच होती. व्यक्तीप्रमाणें राष्ट्राच्याही पाठीमागें दुर्दैव हात धुवून कित्येक वेळां लागत असतें. राष्ट्रास कठिण प्रसंगांतून बचावून नेण्यास थोर व कर्तबगार व्यक्तींची जरूरी लागते. अशा वेळीं त्यांना मृत्यूनें ओढून नेणें यासारखें दुसरें दुर्दैव कोणतें? इ. स. १७९४ ते १८०० या सात वर्षांत महाराष्ट्रांतील कित्येक थोर व्यक्ती मृत्युमुखीं पडल्या. पैकीं महादजी शिंदे व हरिपंत फडके या वीरांचा प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे.

१० **अहल्याबाई होळकर** :—तिसरी थोर व्यक्ति म्हणजे अहल्याबाई होळकर ही होय. मराठ्यांच्या इतिहासांत अहल्याबाई हें एक स्वतःच्या निष्कलंक तेजानें चमकणारें अद्वितीय रत्न आहे. महादजीचा पराक्रम सूर्यप्रकाशाप्रमाणें इतरांस दिपविणारा आहे. परंतु अहल्याबाईचें चरित्र चंद्रप्रकाशाप्रमाणें अल्हाददायक आहे. ही मल्हारराव होळकराची सून व त्याचा मुलगा खंडेराव याची बायको. हिचा जन्म इ. १७२५ सालीं एका गरीब घराण्यांत झाला. खंडेराव हा कुंभेरीच्या प्रसिद्ध वेढ्यांत इ. स. १७५४ सालीं गोळी लागून मेला व वृद्ध मल्हारराव हा इ. स. १७६६ सालीं मृत्यु पावला. सासऱ्याचे मृत्यूनंतर ती स्वतःच आपल्या राज्याचा कारभार पाहूं

लागली व तिनें तो पुढें २८ वर्षेंपर्यंत मोठ्या दक्षतेनें हांकला. अहल्याबाई आचरणांत पवित्र, नेमस्त व धर्मशील होती. निजाम व टिपू यांसारखे मराठ्यांचे शत्रूदेखील तिला फार मान देत असत. राज्यकारभारांतही तिची चांगलीच हुषारी दिसून आली. दरबारांत बसून ती अनेक जबाबदारीचीं कामें झपाट्यानें निकालांत काढी. तिच्या राज्यांत विंध्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून भिल्ल लोक दंगा करीत असत, परंतु तिनें मोठ्या युक्तीनें त्याच दऱ्याखोऱ्यांच्या रक्षणांची जबाबदारी त्यांजवर टाकली व त्यांना तेथून जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूंपासून हक्कानें कर वसूल करण्यास परवानगी दिली. पेशव्यांचा तिनें कधींही अपमान केला नाहीं व त्यांच्याविरुद्ध कारस्थानांत ती सामील झाली नाहीं. पण त्याबरोबरच तिच्या कारभारांत कोणी निष्कारण ढवळाढवळ केल्यास तिला खपत नसे. एकदां रघुनाथरावाच्या मनांत तिला दत्तक घ्यावयास लावावयाचें होतें (इ. स. १७६६), व त्याकरितां तो सैन्य घेऊन आला. परंतु तिनें ती गोष्ट साफ नाकारली व सांगितलें कीं, माझा पराभव झाल्यास मी तर बोलून चालून स्त्रीच आहे, परंतु जर कां बाजू उलटली तर अटकेपार झेंडा रोविणाऱ्या राघोबाला मात्र तें अपमानास्पद होईल. इतकें बोलूनच ती थांबली नाहीं. तिनें स्त्रियांची कांहीं पलटणें युद्धास तयार केलीं. तें पाहून राघोबा परतला. लालसोटच्या अपयशानंतर महादजी अगदीं कठीण प्रसंगांत होता. अशा वेळीं तिनें कोणतीही अट न घालतां त्यास ३० लक्ष रुपये दिले. यावरून तिचा निष्कपटी व निर्मत्सरी स्वभाव व्यक्त होतो[१]. ती इ. स. १७९५ त मृत्यु पावली. अहल्याबाई आचरणानें पवित्र, स्वभावानें स्वाभिमानी, राज्यकारभारांत दक्ष व आपल्या धन्याशीं इमानानें वागणारी होती. जगाच्या इतिहासांत अहल्याबाईची बरोबरी फारच थोड्या स्त्रिया करूं शकतील. तिच्यानंतर

---

१ टीप:—अलीकडील संशोधनानें उपलब्ध झालेल्या माहितीवरून अहल्याबाईवर असा एक आक्षेप घेतला जातो कीं, ज्या वेळेस सैन्य उभारून तें उत्तरेंत लढविण्याची जरूरी होती, त्या वेळीं अहल्याबाई आपला वेळ व पैसा धर्मकार्यांत व दानधर्मांत खर्चीत राहिली. यामुळें महादजीला ऐन वेळीं लालसोटच्या लढाईसारख्या प्रसंगीं पुरेशी मदत झाली नाहीं.

दोन वर्षांनीं तिचा सेनापती तुकोजी होळकर हाही मृत्यु पावला व लवकरच सर्व होळकर घराण्याची सत्ता यशवंतराव होळकर याचे हातीं गेली.

**११ सवाई माधवराव :**—अहल्याबाईच्या पाठोपाठ मराठेशाही सवाई माधवरावाला अंतरली. माधवराव या वेळीं एकवीस वर्षांचा होता व नानानें त्यास लहानपणापासून जिवापलीकडे जपलें असल्यामुळें त्यास माधवरावाची फार आशा होती. परंतु योगायोग फार विलक्षण होता. रघुनाथराव इ. स. १७८३ त मृत्यु पावल्यावर त्याच्या कुटुंबास नानानें शिवनेरी किल्यावर बंदोबस्तानें ठेविलें. रघुनाथरावाचा थोरला मुलगा बाजीराव हा जवळजवळ माधवरावाच्या वयाचा होता. तो बोलण्यांत मोठा मोहक असून दुसऱ्यावर छाप बसविण्यांत मोठा पटाईत होता. त्याचा व सवाई माधवरावाचा गुप्त पत्रव्यवहार सुरू झाला व सवाई माधवरावाचे मनांत त्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें. ही गोष्ट नानास समजली, तेव्हां नानानें त्याचा निषेध केला. परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. इ. स. १७९५ च्या सप्टेंबर महिन्यांत (भाद्रपदांत) माधवराव आजारी पडला. तेव्हांपासून त्याची प्रकृति नीट झाली नाहींच. त्यास मधून मधून वायूची लहर येई. दसऱ्याचे दिवशीं सीमोल्लंघनास स्वारी निघाली असतां माधवरावानें अंबारींतूनच उडी मारण्याचा यत्न केला. परंतु त्यास तसेंच धरून ठेविलें. नंतर दोनच दिवसांनीं सवाई माधवरावानें शनवारवाड्याच्या गणपतीमहालांतून कारंजावर उडी टाकली व त्यामुळें असाध्य जखम होऊन तींतच शेवटीं त्याचा अंत झाला. सवाई माधवरावानें नानाच्या जुलमास त्रासून आत्महत्या केली असें म्हणतात. परंतु असें म्हणण्यास पुरेसा पुरावा नाहीं. मराठ्यांच्या दरबारच्या इंग्रज वकिलानें आपल्या वरिष्ठास लिहिलेल्या पत्रांत 'माधवरावानें वायूच्या झटक्यांत उडी मारली' असेंच लिहिलें आहे. शिवाय नानाची शिस्त कडक असली तरी तो मोठा धोरणी होता. या वेळीं घाशीराम नांवाचा एक पुण्याचा कोतवाल होता, त्याजवर नानाचा फार विश्वास असे व त्यामुळेंच घाशीराम शेफारून फार जुलूम करीत असे. तेव्हां लोकांनीं यासंबंधींची कागाळी पेशव्याचे कानावर घातली. तेव्हां माधवरावानें घाशीरामास देहांत प्रायश्चित्त देवविलें. त्यास नानानें विरोध केला नाहीं. माधवराव लहान असतांना मिरवणुकीचे प्रसंगीं नानाचा हत्ती पेशव्यांचे बरोबरीनें जाई

परंतु जेव्हां पेशव्यास समजूं लागलें, तेव्हां पेशव्याचे ध्यानांत ही गोष्ट आली. त्याबरोबर नानानें तो प्रघात बंद केला, हीं उदाहरणें लक्षांत ठेवण्यासारखी आहेत. शिवाय नाना व महादजी यांच्या भांडणांत पेशव्यानें कृतज्ञताबुद्धीनें नानाची बाजू घेतली यावरून नानाचा पेशव्यावर असह्य जाच नसावा, असें अनुमान निघतें. कांहींही असो, सवाई माधवरावाचे मृत्यूनें नाना उघडा पडला खरा. आजपर्यंत त्यास सर्व सूत्रें पेशव्यांचे नांवावर हालवितां येत होतीं. त्यामुळें त्याच्या शब्दास पेशव्याच्या शब्दाचा मान असे. परंतु सवाई माधवरावाच्या मृत्यूनें पेशवाईचें सूत्रचालकत्व नानाकडे राहणें कठिण झालें. सवाई माधवरावाचा मृत्यु म्हणजे नानाच्या सत्तेचा शेवटच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

## भाग १६ वा

# स्वातंत्र्याची आहुति

## (इ. स. १७९५–१८०५)

**१ बाजीरावाची गादीवर स्थापना:**—इ. स. १७९५ सालीं झालेली खर्ड्याची लढाई हीच मराठ्यांनीं जिंकलेली अशी शेवटची लढाई होय. या लढाईंत इंग्रज निजामास मदत करते तर त्याच वेळीं इंग्रज–मराठ्यांचें युद्ध सुरू झालें असतें व तें मराठ्यांच्या दृष्टीनें पुष्कळच बरें झालें असतें. कारण सर्व मराठे सरदार त्या वेळीं फौजबंद होते व त्यांच्यांत फूट पडलेली नव्हती. टिपूचा अद्याप पाडाव व्हावयाचा होता. तो बहुतांशीं मराठ्यांस मिळाला असता. सवाई माधवरावाच्या मृत्यूनें जी संकटपरंपरा महाराष्ट्रावर कोसळली व जिच्यामुळें मराठी सत्ता इतकी दुर्बल झाली ती कदाचित् इंग्रजांच्या युद्धामुळें वाढत गेली नसती व नानासारख्या धोरणी मुत्सद्याच्या हातीं मुख्य

सूत्रें राहिलीं असतीं. परंतु दुर्दैवानें तसें घडून आलें नाहीं. सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर नानाचे बेत जागच्याजागीं जिरल्यासारखे झाले, परंतु तो धीराचा पुरुष डगमगला नाहीं. त्यानें माधवरावाची स्त्री यशोदाबाई हिचे मांडीवर दत्तक देऊन बारभाईचें कारस्थान उभारण्याचा बेत केला. कारण रघुनाथरावाचा मुलगा बाजीराव याचे हातीं सत्ता गेल्यास पेशवाईचें वाटोळें होईल अशी त्यास धास्ती होती. परंतु त्याचें हें नवें कारस्थान हातीं घेण्यास कोणी फौजबंद सरदार तयार नव्हता. राज्यांत दौलतराव शिंदे याची सत्ता फार प्रबळ होती. त्याच्या कारभाऱ्यांनीं मोठें कारस्थान रचून बाजीरावास गादीवर बसविण्याचा बेत केला. ही बातमी नानास समजली, तेव्हां शिंद्यांशीं विरोध करणें बरें नव्हे हें जाणून त्यानें आपण होऊनच बाजीरावास गादीवर बसविण्याचें ठरविलें व शिंद्याचे लोक बाजीरावास आणण्यास जाण्यापूर्वीच नानानें त्यास पुण्यास आणून पेशवाईचा अधिकार दिला.

**२ अंदाधुंदी व नानाचा मृत्यु :**—परंतु बाजीरावास नाना फडणवीस हा आपल्या बापाचा कट्टा वैरी असल्यामुळें डोळ्यांसमोर नको होता. म्हणून त्यानें शिंद्याकडून त्यास कैद करविलें. शिदे या कामगिरीबद्दल सैन्याच्या खर्चाबद्दल पैसा मागूं लागला, तेव्हां त्यानें पुण्याच्या नागरिकांजवळून पैसे उकळण्याची त्यास सूचना केली. त्याबरोर शिंद्याचा सासरा घाटगे यानें पुण्याच्या लोकांवर जुलुमाचा कहर केला. शिंदे लवकरच उत्तरेस जाईल व मग आपणास निर्वेध राज्य करण्यास मिळेल असें बाजीरावास वाटत होतें. परंतु शिंद्यास पुण्याचा कारभार करण्याची हाव होती व तो जाण्याची गोष्ट बोलेना. हें पाहून बाजीरावानें शिंद्यास पकडण्याचा गुप्त कट केला व बाजीरावानें नीट प्रसंगावधान राखलें असतें तर तो सिद्धीसही गेला असता. पण आयत्या वेळीं बाजीरावाचा धीर सुटला व कटाची बातमी मात्र बाहेर फुटली ! दौलतरावानें बाजीराव आपणाविरुद्ध कारस्थानें करतो हें पाहून त्याजवर शह ठेवण्याकरितां नाना फडणविसास कैदेंतून सोडविलें. त्याबरोबर बाजीरावानें लगेच पगडी फिरवून तुम्हांस कैद करण्यास मूळ कारण शिंदे असें नानास भासविलें व त्याला मोठ्या नम्रतेनें कारभार पाहाण्यास विनंति केली. परंतु या विपत्तींत नाना फार दिवस जगला नाहीं. तो लवकरच मृत्यु

पावला ( ता. १३ मार्च १८०० ). त्याचे अगोदरच कांहीं दिवस परशुराम-भाऊ पटवर्धन मृत्यु पावला होता.

**३ नानाची योग्यता:**—परशुरामभाऊ व नाना यांच्या मृत्यूनें पेशवाईं-तील शेवटले कर्तबगार पुरुष नाहींसे झाले. 'नानाच्या मृत्यूनें पेशवाईतील शहाणपण लयास गेलें' असें इंग्रज वकील कर्नल पामर यानें म्हटलें आहे, तें खरें आहे. थोरल्या माधवरावाच्या मृत्यूनंतर "मनसुबीची तलवार गाजवून राज्य राखणारा मर्द" नाना फडणवीसच होय. इ. स. १७७५ सालीं सवाई माधवरावाचा जन्म होऊन त्याच्या ४० व्या दिवशीं त्यास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. या बालपेशव्यास लहानाचें मोठें करून त्याबरोबरच अनेक स्वकीय व परकीय कारस्थानें करणारांशीं टक्कर देणारा हाच पुरुष होय. हिशेबाचे कामांत याचा हात धरणारा कोणी नसे. याच्या चोख कारभारामुळें फडण-विसाच्या जागेस फार महत्त्व आलें. पेशवाईचें ज्यांत हित तें आपलें हित अशी नानाची दृष्टि होती. पेशवाईचें रक्षण करण्याकरितां त्यानें स्वतःचा अधिकार सोडून तो मोरोबास दिला व आपला हाडवैरी राघोबा याच्या मुलास गादीवर बसविलें. यावरून नाना फडणविसास 'पेशवाईतील थोर स्वामिभक्त मुत्सद्दी' असें नांव देणें योग्य होईल. वेलस्लीच्या तैनाती फौजेचें मर्म नानास नीट कळलें होतें. नाना वांचता तर मराठेशाहीचा अपमृत्यु टळला असता कीं नाहीं हें सांगणें कठीण आहे. पण तो मेल्यावर तिचा अपमृत्यु निश्चित झाला एवढें मात्र खरें; असो.

**४ बाजीरावाचे उद्योग :**—नानाच्या मृत्यूनंतर बाजीरावास शिंद्याचे तंत्रानें राहाणें भाग पडलें व त्यानें मोठ्या काकुळतीनें शिंद्यास उत्तरेस जाण्यास विनंति केली. शिंदेही थोडी रक्कम घेऊन पुणें सोडून उत्तरेस जाण्यास निघाला. कारण उत्तरेस तुकोजी होळकर याचा दासीपुत्र यशवंतराव होळ-कर यानें शिंद्याचें उज्जयिनी शहर लुटल्याची बातमी आली होती. नाना व शिंदे दोघेही पुण्याहून नाहींसे झाल्यावर बाजीरावास स्वस्थता मिळाली. परंतु तिचा योग्य उपयोग करण्याऐवजीं तो आपल्या बापाच्या शत्रूंचा सूड उगवूं लागला. त्यांत त्यानें यशवंतरावाचा भाऊ विठूजी होळकर यास हत्तीच्या पायांखालीं देऊन ठार मारलें. ही बातमी यशवंतराव यास पोहोंच-तांच तो त्वेषानें पुण्यावर चाल करून आला. शिंद्यांची फौज अद्याप फार

दूर गेली नव्हती, ती व पेशव्यांची फौज एकत्र झाली व तिची होळकरांच्या फौजेशीं गांठ पडली, पण तींत होळकरांचा जय झाला. बाजीराव ही लढाई सिंहगडावरून दुर्बिण लावून पाहात होता. त्यानें आपल्या फौजेचा पराभव झालेला पाहून पळ काढला. होळकरानें त्यास परत बोलाविलें, परंतु बाजीराव जितका खुनशी तितकाच भित्रा होता. त्यास होळकराचा विश्वास येईना. शेवटीं यशवंतरावानें पुण्यास रघुनाथरावाचा दत्तक पुत्र अमृतराव याची पेशवाईवर स्थापना केली. राघोबास जी पेशवाई मिळाली नाहीं ती अशा रीतीनें त्याच्या मुलांना आळीपाळीनें मिळाली !

**५ वसईचा तह :**—इकडे बाजीराव पळून वसईस गेला. तेथें त्यानें पुण्याचा रेसिडेंट कर्नल क्लोज याचे मार्फत इंग्रजांशीं तह केला (३१ डिसेंबर १८०२). त्यांत इंग्रजांनीं बाजीरावास गादीवर बसण्यास मदत करावी, त्याच्या तैनातीस ६००० फौज द्यावी व बाजीरावानें तिचे खर्चाबद्दल सव्वीस लक्षांचा मुलूख तोडून द्यावा, हीं कलमें मुख्य होतीं. याखेरीज १. देशी संस्थानिकांनीं स्वतःचे संरक्षणार्थ ब्रिटिशांची फौज आपले पदरीं बाळगावी. २. तिचा खर्च भागेल एवढ्या वसुलाचा प्रांत ब्रिटिशांस तोडून द्यावा. ३. ब्रिटिशांचा रेसिडेंट त्यांचे दरबारीं रहावा. ४. इंग्रजांच्या मध्यस्तीशिवाय दुसऱ्या कोणत्याही सत्तेशीं युद्ध किंवा तह करूं नये. ५. इतर संस्थानिकांबरोबर झालेले वाद इंग्रजांच्या मध्यस्थीनें तोडावेत. ६. इंग्रजाशिवाय इतर युरोपियन राष्ट्राचे लोकांस संस्थानिकांनीं आश्रय देऊं नये. अशा अटी होत्या. अशा प्रकारच्या तहास तैनाती पद्धतीचा तह असें म्हणतात. तत्कालीन गव्हर्नर जनरल लॉर्ड वेलस्ली यानें असे तह घडवून आणून इंग्रजांची सत्ता वाढविण्यास सुरुवात केली.

**६ टीका :**—वरील अटी इतक्या स्पष्ट आहेत कीं त्यावर निराळी टीका करण्याचें कारणच नाहीं. वेलस्लीची तैनाती फौजेची पद्धत व मराठ्यांची चौथाई सरदेशमुखीची पद्धत या दोहोंत तत्त्वतः कांहीं फरक नाहीं. मराठे बादशाही मुलुखाच्या संरक्षणार्थ चौथाई मागत व वेलस्लीनें मुलूख तोडून मागितला. साम्राज्यसत्ता प्रस्थापित करूं पाहणारीं राष्ट्रें असलें कोणतें तरी तत्त्व पुढें करतात व आपली सत्ता वाढवितात. खुद्द देशी संस्थानिकांच्या दृष्टीनें या अटींचा अर्थ हाच कीं त्यांनीं अमोल स्वातं-

ऱ्याची किंमत देऊन बेगडी सुरक्षितपणाचा उपभोग घ्यावा. बेगडी म्हणण्याचें कारण असें कीं एकदां संस्थानिकावरील आपल्या संस्थानचें रक्षण करण्याची जबावदारी नाहींशी झाली म्हणजे तो बेफिकीर बनतो, व राज्यांत अव्यवस्था माजते. ही अव्यवस्था मोडण्यास जास्त बंदोबस्त करावा लागतो. त्याकरितां तैनाती फौजेची तात जास्त घट्ट बसते व त्यामुळें तो संस्थानिक अधिकच बेफिकीर बनतो. अशा रीतीनें तैनाती फौजेमुळें बेफिकिरी, बेफिकिरीमुळे अव्यवस्था व अव्यवस्थेमुळें वाढती तैनाती फौज अशी चढत्या श्रेणीची परंपरा सुरू होते.

७ **युद्धाची तयारी**:—सारांश, वसईच्या तहाचें थोडक्यांत वर्णन करावयाचें तर "मराठ्यांच्या स्वातंत्र्यसौभाग्याचा कुंकुमतिलक तिच्याच त्या नादान पोरानें त्या तहाच्या चिटोऱ्यानें पुसून टाकिला.[१]" या तहाप्रमाणें गव्हर्नरजनरलचा भाऊ सर आर्थर वेलस्ली यानें बाजीरावास पुण्यास आणून गादीवर बसविलें. बाजीरावानें आपणास न विचारतां तह केला ही गोष्ट मराठमंडळास आवडली नाहीं. त्यांनीं तो तह मान्य केला नाहीं. शिद्यानें तर जणूं काय तह झालाच नाहीं अशा दृष्टीनें बाजीरावाच्या संरक्षणार्थ सैन्य जमविलें. याच्या उलट गव्हर्नर जनरल शिंदे, होळकर व भोसले इत्यादि मराठे सरदारांस असें म्हणूं लागला कीं, मराठेशाहीचा प्रमुख बाजीराव यानें केलेला तह तुम्हां प्रत्येकावर बंधनकारक आहे, त्याअर्थी तुम्ही तो पाळला पाहिजे. मराठे सरदारांनीं अर्थातच तें कबूल केलें नाही व उभयपक्षीं युद्धाची तयारी झाली. शिंदे भोसले एक झाले, परंतु दुर्दैवानें होळकर मात्र शिद्याशी त्याचें वैर असल्यानें तटस्थ राहिला. दोघांचें मिळून दक्षिणेंत एक लाखावर सैन्य जमलें. परंतु त्यांतील फक्त तीस हजार कवायती सैन्य होतें. इंग्रजांनींदेखील पंचावन्न हजार सैन्य तयार केलें. उत्तरेस जनरल लेक व दक्षिणेंत सर आर्थर वेलस्ली हे इंग्रजांचे सेनापती होते.

८ **असईची लढाई**:—वेलस्लीनें शिद्यास दक्षिणेंतून सैन्य परत नेण्याविषयीं सांगितलें व त्यानें तसें करण्याचें नाकारतांच युद्धास सुरवात झाली. प्रथम वेलस्लीनें निजामच्या सरहद्दीवरील शिंद्याच्या ताब्यांतील अहमद-

१ टीप:—वासुदेवशास्त्री खरे यांची 'मराठे व इंग्रज'–प्रस्तावना.

नगरचा किल्ला काबीज केला (ऑगस्ट १८०३). नंतर वेलस्लीची शिंदे व भोसले यांच्या सैन्याशीं असई येथें गांठ पडली व निकराचें युद्ध झालें; परंतु शेवटीं मराठ्यांचा पराभव झाला. इतकें झाल्यावर शिंद्याची फौज दक्षिणेंत लढली नाहीं, परंतु भोसल्याबरोबर मात्र वेलस्लीस आणखी दोन तीन ठिकाणीं युद्ध करावें लागवें. आडगांव येथें मोठी लढाई झाली. तींत भोसल्याचा पराभव झाला. शेवटीं त्याचा गाविलगड किल्लाही गेल्यावर त्यानें तहाचें बोलणें लावलें. त्या तहास देवगांवचा तह म्हणतात. त्या-अन्वयें त्यानें कटक व बालासोर हे प्रांत इंग्रजांस दिले. वऱ्हाड प्रांत (वर्धा नदीच्या पश्चिमेकडील मुलूख) निजामास मिळाला व इंग्रजांचा रेसिडेंट आपल्या दरबारीं ठेवून घेतला. या तहांतील बहुतेक कलमें तैनाती पद्धतीचे तत्त्वावर आहेत.

९ **लासवारीची लढाई :**—उत्तरेस जनरल लेकनेंही शिंद्याचे फौजेवर विजय मिळविले. शिंद्याचा फरेंच जनरल डिबॉईन हा इ. स. १७९३ त नोकरी सोडून गेला होता. त्याचे जागी पेरन हा काम करीत होता. इंग्रजांशीं युद्ध उपस्थित झालेलें पाहून अनेक युरोपियन अधिकाऱ्यांनीं शिंद्याच्या फौजेंतून राजीनामा दिला. जनरल लेकनें अलिगड कावीज केल्यावर पेरन हाही निघून गेला ! यामुळे त्या शिस्तीच्या सैन्यास स्वतःचे अधिकारी राहिले नाहींत. परकीय अधिकाऱ्यांवर विसंबल्याचा हा परिणाम ! रजपुतांनींही या युद्धांत इंग्रजांस साहाय्य केलें ! लेकनें दिल्ली काबीज केली व तेथील दुर्दैवी बादशहास आपल्या ताब्यांत घेतलें. नंतर लासवारी येथें मोठी लढाई झाली. तींत लेकचा जय झाला. तेव्हां शिंद्यानें तहाचें बोलणें लावलें. युद्ध ऑगस्टांत सुरू होऊन डिसेंबरांत म्हणजे अवघ्या पांच महिन्यांत आवरलें (इ. स. १८०३). शिंद्याशीं झालेल्या तहास 'सुर्जी अंजनगांवचा तह' म्हणतात. या तहान्वयें गंगा व यमुना या नद्यांमधील प्रदेश, ग्वाल्हेर, गोहद व बुंदेल-खंडाचा कांहीं भाग शिंद्यानें इंग्रजांस दिला. तसेंच दिल्लीचा बादशहा, निजाम, पेशवा इत्यादिकांवरील त्याचे हक्क त्यानें सोडून द्यावेत असें ठरलें. इतर कलमें भोसल्यांशीं झालेल्या तहाबरहुकूम होतीं, शिंदे व भोसले यांचेकडे त्यांच्या जहागिरीचा तेवढा मुलूख ठेवून त्यांना इतरांच्या मुलुखांत ढवळा-ढवळ करूं द्यावयाची नाहीं; व इंग्रजांचे नजरेखालीं स्वतंत्र रीतीनें राज्य

करूं द्यावयाचें असें या तहाचें धोरण होतें. या युद्धानें मराठ्यांच्या साम्राज्यसत्तेचा लय झाला; मराठी राज्यें मात्र राहिलीं.

**१० होळकराशीं युद्ध :**—शिंदे व भोसले यांची वाट लागल्यावर होळकरास इंग्रजांविरुद्ध उठण्याची बुद्धि झाली! त्याची लढण्याची पद्धत गनिमी काव्याची असल्यानें त्यानें इंग्रजांविरुद्ध बराच टिकाव धरला. उत्तरेंतून जनरल लेक, दक्षिणेंतून वेलस्ली व पश्चिमेकडे गुजराथेंतून कर्नल मरे या सर्वांनीं मिळून होळकराच्या सैन्यास घेरण्याचा यत्न केला. पावसाळ्याचे सुमारास जनरल लेकनें मॉन्सन यास होळकराचे पाळतीवर पाठविलें व त्यास मरेनें येऊन मिळावें असें ठरलें होतें. परंतु तत्पूर्वीच होळकरानें मॉन्सनचा पराभव केला. इंग्रजांचा पराभव झाला हें पाहून शिंद्यानें फिरून युद्धाची तयारी केली व भरतपूरच्या राजानें होळकरास साहाय्य केलें. परंतु पुढें लवकरच दीग येथें होळकराच्या सैन्याचा पराभव झाला व फरुकाबाद येथें युद्ध होऊन स्वतः तो पळून पंजाबांत शीखांकडे गेला. नंतर जनरल लेकनें भरतपुरास वेढा घातला. हा किल्ला मोठा बळकट होता. जनरल लेकनें त्यावर एकसारखे चार हल्ले केले परंतु चारही वेळां त्याचा पराभव झाला!

**११ शिंदेहोळकरांशीं फेरतह :**—मराठ्यांशीं चालू असलेलें युद्ध विलायतेंत पसंत पडलें नाहीं. मॉन्सनचा व लेकचा पराभव झालेला पाहून विलायतेंतील लोकांस भीति पडली व त्यांनीं वेलस्लीस परत बोलाविलें व त्याचे जागीं वृद्ध कॉर्नवॉलीसची नेमणूक केली. परंतु तो येथें आल्यावर लवकरच मृत्यु पावला. तेव्हां कौन्सिलचा सभासद बार्लो हाच गव्हर्नर जनरल बनला. मराठ्यांशीं चाललेलें युद्ध बंद करून शिंदेहोळकरांशीं सलोख्याचें धोरण ठेवावें असा विलायतेहून हुकूम आलेला होता. त्या हुकुमाप्रमाणें बार्लोनें इ. स. १८०५ मध्यें शिंदे, होळकर व भरतपूरचा जाट यांच्याशीं तैनाती तत्त्वावर तह न करतां केवळ बरोबरीच्या नात्याचे मित्रत्वाचे तह केले.

**१२ शेवट :**—अशा रीतीनें लॉर्ड वेलस्लीनें इंग्रजांच्या राज्याचें साम्राज्य बनविलें. लखनौ, हैद्राबाद, म्हैसूर व पुणें येथील सत्ताधीश त्याच्या हातांतील बाहुलीं बनलीं. मराठी साम्राज्याचे तुकडे झाले व इ. स. १७०७ पासून म्हणजे औरंगजेबाच्या मृत्यूपासून उपस्थित झालेला जो प्रश्न, कीं हिंदुस्थानचें

साम्राज्य कोणाचें ? मुसलमानांचें ? मराठ्यांचें ? कीं इंग्रजांचें ? त्याचा आतां कायमचा निकाल लागला.

**१३ मोगल साम्राज्याचा शेवटः**—तसेंच ह्या युद्धानें मोगलांच्या बादशाही सत्तेचाही शेवट झाला. पानिपतच्या युद्धापासून दिल्लीच्या बादशहाची सत्ता जवळजवळ नामधारी असे. परंतु ह्या नामधारी सत्तेचें दर्शनी महत्त्व फार असे. कारण बादशहास हाताशीं धरून कोणासही प्रबळ होण्याचा राजरोस प्रयत्न करतां येई व स्वतःच्या कृत्यावर साम्राज्यसत्तेच्या पसंतीचा शिक्कामोर्तब करून घेतां येत असे. ही गोष्ट मराठ्यांच्या तर्फे महादजी शिंदे यांचे बादशहाशीं जे व्यवहारझाले त्यावरून स्पष्ट होते. इ. स. १८०३ मध्यें शिंद्याचा पराभव झाल्यावर इंग्रजांनीं बादशहास आपल्या ताब्यांत घेऊन त्याचा सर्व अधिकार काढून घेतला व त्यास नेमणूक करून दिली. शहाअलम इ. स. १८०६ त मरण पावला. पुढें त्याचा मुलगा अकबरशहा हा नेमणूक घेऊन राहिला. तो इ. स. १८३७ त मरण पावल्यावर ती नेमणूक त्याचा मुलगा बहादूरशहा याजकडे आली. इ. स. १८५७ सालीं तो बंडांत सामील झाला, म्हणून इंग्रजांनीं त्याच्या दोन्ही मुलांस ठार मारिलें व त्यास कैदेंत टाकिलें. तेथें तो इ. स. १८६२ त मरण पावला. अशा रीतीनें मोगल बादशाहीच्या अवशिष्ट धाग्याचा शेवट झाला.

---

# भाग १७ वा

# मराठी राज्याचा शेवट

**१ साम्राज्यांचे अस्तोदयः**—सवाई माधवरावाच्या मृत्यूनंतर मराठ्यांच्या दरबारीं किती कारस्थानांचा सुळसुळाट माजला होता व स्वार्थी लोकांच्या महत्त्वाकांक्षेमुळें कशी बेबंदशाही झाली होती हें पाहिलें म्हणजे मराठ्यांचें राज्य वेलस्लीच्या कारस्थानास बळी पडलें असें म्हणण्यापेक्षां तें स्वतःच्याच कमकुवतपणामुळें नष्ट झालें हेंच म्हणणें योग्य होईल. पुढील दहा वर्षांत

इंग्रजांनीं हिंदुस्थानच्या अंतर्व्यवस्थेंत हात घातला नाहीं व साम्राज्यसत्तेची जबाबदारी अंगावर घेतली नाहीं. साम्राज्यांच्या अस्तोदयाचा हा संधिकाल होता. एक साम्राज्य नष्ट झालें होतें व दुसरें अद्याप पूर्णपणें प्रस्थापित व्हावयाचें होतें. अशा वेळीं दुर्बळ सत्ताधीशांस त्राता नव्हता व दंगेखोरांस शास्ता नव्हता. मध्य हिंदुस्थानांत त्या वेळीं पेंढारी लोकांचा सुळसुळाट झाला होता. शिंद्यांचा व भोंसल्यांचा पाडाव झाल्यावर त्यांनीं बऱ्याच मोठ्या सैन्यास रजा दिली. ते लोकही लुटालूट करण्याच्या आशेनें पेंढाऱ्यांस येऊन मिळाले. ह्या सर्वांची संख्या अजमासें वीस ते तीस हजार असावी. त्यांच्यांत सर्व धर्मांचे लोक असत. परंतु पुढारी बहुधा मुसलमान असत. छट्टू, करीमखान, वसील महंमद, अमीरखान वगैरे नांवें त्यांत प्रमुख आहेत. ते क्रूर असत व त्यांच्या स्त्रिया त्यांच्याहीपेक्षां क्रूर असत असें वर्णन आहे. तापलेल्या राखेचे तोबरे नाकातोंडावर बांधून ते आपल्या हातांत सांपडलेल्या लोकांचे प्राण घेत. ते एका दिवसांत ४० ते ५० मैलांच्या मजला मारीत. लहान लहान सत्ताधीशांस तर ते खुशाल लुबाडीत. शिंदे, होळकर ह्या सर्व प्रकारांकडे दुर्लक्ष करीत. किंबहुना अशीच बेबंदशाही माजून आपलें साम्राज्य मिळविण्याची संधि पुन्हां प्राप्त झाल्यास त्यांना ती नको होती असें नाहीं. अशा स्थितींत इंग्रजांशिवाय त्यांचा बंदोबस्त करणारा कोणी नव्हता व ते तर तटस्थ वृत्तीचें धोरण धरून होते. शेवटीं युरोपांत इंग्रजांचें नेपोलियन बोनापार्टशीं इ. स. १७९३ पासून एकसारखें चालू असलेलें युद्ध संपलें (१८१५). नंतर इंग्रजांनीं हिंदुस्थानांत पुन्हां चढाईचें धोरण स्वीकारलें.

**२ बाजीरावाचे चाळे** (१८०५ ते १८१५) :—या शांततेच्या दहा वर्षांत बाजीरावानें आपलें राज्य नीट संभाळून पदरच्या सरदारांचीं मनें नीट राखावयाचें सोडून तो त्यांच्याशीं कलागती करून तैनाती फौजेच्या जोरावर त्यांच्या जहागिरी बळकावूं लागला. त्यानें प्रतिनिधींची बहुतेक जहागीर खालसा केली.[१] त्याचप्रमाणें रास्ते, पटवर्धन इत्यादि थोर सर-

---

१ **टीप** :—या कामीं बाजीरावानें आपला सरदार बापू गोखले याची योजना केली होती. त्यानें प्रतिनिधींचा पराभव केला. पण प्रतिनिधीजवळ ताई तेलीण नांवाची स्त्री होती तिनें प्रतिनिधींचा वासोटा हा किल्ला बापू गोखल्याविरुद्ध आठ महिने लढविला.

दारांस छळलें. सदाशिव माणकेश्वर हा एक उत्तम कीर्तनकार होता, त्यास बाजीरावानें आपला कारभारी केलें! त्याची व्यवस्था काय विचारावी? त्यानें गांवचे वसूल मक्त्यानें दिले व शुद्ध अव्यवस्था माजविली.[१] 'बाजीराव व्यसनी व धर्मभोळा होता. यामुळें त्याच्या दरबारीं एकीकडे नैतिक अनाचार व दुसरीकडे ब्राह्मणभोजन असा क्रम चालू असे'. हे सर्व प्रकार चालू असतां इंग्रजांचा रेसिडेंट एल्फिन्स्टन पुण्यास सगमावर राहात असे. त्याच्याशीं मात्र बाजीरावानें बाहेरून सलोख्याचें धोरण ठेविलें होतें. परंतु दोघेही एकमेकांस पुरते ओळखून असत. एकमेकांचे गुप्त हेर एकमेकांच्या दरबारीं असत व ते बित्तंबातम्या उभयतांस देत. बाजीराव हा वरपांगी मिठ्ठास बोलून आंतून इंग्रजांचा द्वेष करतो व त्यास आपलें गेलेलें स्वातंत्र्य परत मिळविण्याची इच्छा आहे, परंतु तो जितका कारस्थानी तितकाच नादान आहे हें एल्फिन्स्टन ओळखून होता. बाजीरावाचीं कारस्थानें त्यास कळत, परंतु तीं सिद्ध करण्याजोगा कागदोपत्री पुरावा त्याजजवळ नसल्यानें तो निमित्ताचीच वाट पाहात होता. शेवटी पुढील अनुकूल संधि आली, तिचा एल्फिन्स्टननें योग्य उपयोग करून घेतला.

३ **गंगाधरशास्त्र्यांचा खून**:—बाजीरावाची गायकवाडकडे पैशाची बरीच बाकी निघत होती. हा देण्याघेण्याचा हिशेब करण्याकरितां गायकवाडानें गंगाधरशास्त्री पटवर्धन यास पुण्यास पाठविलें. परंतु त्याच्या जिवास अपाय होणार नाहीं अशी अगोदर इंग्रजांनीं गायकवाडातर्फे बाजीरावाकडून हमी घेतली व नंतर गंगाधरशास्त्री पुण्यास गेला. गायकवाडाचा वकील म्हणून येथें येऊन त्यानें बाजीरावाशीं स्नेह सपादून त्याचा कारभारी होण्याची आकांक्षा धरली व त्याप्रमाणें स्नेहसंबंध जुळविळा. शास्त्र्याच्या ह्या वर्तनामुळें पुण्यास दरबारांत त्यास अनेक शत्रू उत्पन्न झाले. शेवटीं बाजीराव एकदां गंगाधरशास्त्र्यास घेऊन पंढरपुरास गेला असतां देवळाच्या महाद्वारासमोर गंगाधरशास्त्र्याचा खून झाला. त्याबरोबरच एल्फिन्स्टन यास आयतेंच

---

१ टीप:—यावरून 'माणकेश्वरी' म्हणजे अव्यवस्था असा शब्दार्थ मराठींत रूढ आहे.

निमित्त सांपडलें. त्र्यंबकजी डेंगळे[१] नांवाच्या एका कारस्थानी इसमावर बाजीरावाचा विश्वास असे. त्याच्या साह्यानें बाजीरावानें हा खून करविला असें एल्फिन्स्टन यास वाटून त्यानें त्र्यंबकजीस ताबडतोब आमचे हवालीं करा असा तगादा लावला. त्र्यंबकजीवर खुनाचा आरोप शाबीत होण्यापूर्वीच त्यास इंग्रजांच्या स्वाधीन करणें बाजीरावाच्या जीवावर आलें, परंतु शेवटीं प्रसंग ओळखून बाजीरावानें त्र्यंबकजीस इंग्रजांच्या स्वाधीन केलें. त्यांनीं त्यास ठाणें येथील तुरुंगांत ठेविलें. परंतु त्र्यंबकजी तेथून मोठ्या शिताफीनें निसटून बाजीरावास मिळाला. हें पाहतांच बाजीराव त्र्यंबकजीस सामील आहे असें एल्फिन्स्टन यास खात्रीनें वाटलें व त्यानें बाजीरावाचा बंदोबस्त करण्याकरितां त्याजवर इ.स. १८१७ सालीं एक नवा तह लादला. बाजीरावानें या तहावर सही केली, परंतु गुप्तपणें त्याची युद्धाची तयारी चालू होतीच.

**४ इंग्रजांची तयारी :**—इंग्रजही केव्हां तरी युद्ध होणार हें ओळखून तयारींतच होते. त्यांनीं पेंढाऱ्यांचा बंदोबस्त करण्याचें ठरविलें, तेव्हांच पेंढाऱ्यांशीं होणारें युद्ध लांबत लांबत त्याचें मराठ्यांच्या युद्धांत परिवर्तन होईल असा अंदाज होता. कारण पेंढाऱ्यांचे व मराठे सरदारांचे प्रत्यक्ष अप्रत्यक्ष संबंध इंग्रजांस माहीत होते.

**५ पेंढाऱ्यांचा पाडाव :**—इ. स. १८१७ त पेंढाऱ्यांशीं युद्ध सुरू झालें. त्यांजबरोबर लढाई म्हणजे वाऱ्याची मोट बांधण्यापैकीं काम होतें. कारण ते सहसा लढाईस उभे राहात नसत व दंगेधोपे करून मात्र त्रास देत. या गनिमी काव्याच्या पद्धतीस तोंड देण्यास त्यांना चोहोंकडून वेढून कोंडण्याशिवाय दुसरा मार्ग नव्हता. शेवटीं इंग्रज सेनापति माल्कम यानें तेंच केलें. पेंढारी चोहों बाजूंनीं घेरले गेल्यावर एकाएकीं पुढाऱ्याचा बंदोबस्त झाला. करीमखान व अमीरखान हे शरण आले. त्यांस अनुक्रमें गणेशपूर व टोंक या गांवच्या जहागिऱ्या मिळाल्या. वसील महंमद पकडला गेला. पण त्यानें

१ टीप:—त्र्यंबकजीनें हा खून करविला हें खरें असलें तरी बाजीरावाचें त्यास कितपत उत्तेजन होतें हा प्रश्न आहे. शिवाय आपल्या बापानें नारायणरावाचा वध करविला, याबद्दल एकसारखीं प्रायश्चित्तें घेणारा धर्मभोळा बाजीराव पंढरपूरसारख्या क्षेत्रांत खुनाचें कृत्य करवील हें संभवत नाहीं.

आत्महत्या केली व छट्टूचा पाठलाग होत असतां त्यास वाघानें मारलें. अशा रीतीनें पेंढाऱ्यांचा नाश झाला.

६ **बाजीरावाशीं युद्ध** :—दक्षिणेंत इंग्रजांचीं सातारकर महाराज प्रतापसिंह याजबरोबर कारस्थानें चालू होतीं व त्यांनीं सातारकरांस आपल्या बाजूस वश करून घेऊन त्याजकडून बाजीरावाविरुद्ध जाहीरनामा काढविला. त्यांत बाजीराव हा सातारकर व त्यांचे दोस्त इंग्रज यांचें निष्कारण शत्रुत्व पतकरीत आहे असें भासविण्यांत आलें. बाजीरावानें हा डाव ओळखून सर्व मोहिमांतून प्रतापसिंहास आपल्याबरोबर फिरविलें. बाजीरावाच्या सैन्याबरोबर पहिली लढाई खडकी येथें झाली. तींत मराठ्यांचा पराभव झाला हें पाहून बाजीराव पळून गेला. मागें इंग्रजी सैन्य पुण्यांत शिरलें व ता. १७ नोव्हेंबर १८१७ रोजीं सोमवारीं तिसरे प्रहरीं इंग्रजांचें निशाण शनवार वाड्यावर फडकूं लागलें! दुसरी लढाई कोरेगांव येथें झाली. तींत बापू गोखले व त्र्यंबकजी यांनीं मर्दुमकी गाजविली व त्यामुळें इंग्रजांचा बराचसा नाश झाला. परंतु इंग्रजांचें दुसरें सैन्य त्यांच्या मदतीस येत आहे हें पाहतांच मराठी फौज आग्नेय दिशेस पळाली. इंग्रजांनीं बापू गोखल्यास फितूर करण्याचा यत्न केला पण तो बाणेदार पुरुष वश झाला नाहीं. ता. २० फेब्रुवारी १८१८ रोजीं अष्टें येथें लढाई झाली. तेथें बापू गोखले धारातीर्थी पतन पावला व मराठ्यांचा पराजय झाला. हें पाहतांच सातारकर महाराज प्रतापसिंह आतां उघडपणें इंग्रजांस मिळाले व बाजीराव उत्तर हिंदुस्थानांत होळकर–भोसले मदत करतील या आशेनें तिकडे पळून गेला. परंतु माल्कम उत्तरेहून त्यास पकडण्यास आला, तेव्हां निराश होऊन तो त्याच्या स्वाधीन झाला.

७ **होळकर, भोसले व सातारकर** :—होळकर व भोसले हेही इंग्रजांविरुद्ध उठले. इ. स. १८१७ त इंग्रजांची व होळकरांच्या सैन्याची महीदपूर येथें लढाई झाली. तींत होळकराचा पराजय झाला. तेव्हां होळकरानें इंग्रजांशीं तह केला. याच सुमारास सीताबर्डी येथें इंग्रजांची भोसल्याशीं लढाई झाली. तींत त्याचा पराभव झाला. तेव्हां त्यानेंही त्यांच्याशीं तह केला. ह्या दोन्ही तहान्वयें इंग्रजांनीं भोसल्याचा व होळकराचा पुष्कळ मुलुख घेतला, त्यांचें सैन्य कमी करविलें व त्यांजवर आपली देखरेख ठेविली.

बाजीरावास इंग्रजांनीं दरसाल आठ लाखांची नेमणूक करून दिली व त्यास पेशवाईवरील हक्क सोडण्यास सांगितलें. तसेंच त्यानें त्याच्या ताब्यांतील कोणत्याही ठिकाणीं राहूं नये असें बंधन होतें, म्हणून बाजीरावानें कानपुरानजीक बिठूर ऊर्फ ब्रह्मावर्त हें ठिकाण पतकरिलें. फरान्सचा बादशहा नेपोलियन सेंट हेलिना येथें व मराठमंडळाचा प्रमुख बाजीराव ब्रह्मावर्तीं एकाच सत्तेचे समकालीन कैदी होते. पुढील आयुष्य बाजीरावानें ब्रह्मावर्तीं दानधर्म व गंगास्नानें करीत काढलें. तेथें त्यानें स्वतःचीं पांच लग्नें केलीं. तो इ. स. १८५१ त मरण पावला. प्रतापसिंहाकडे सातारचें राज्य ठेवण्यांत आलें, परंतु एका मांडलिक संस्थानाहून त्याचा विशेष दर्जा इंग्रजांनीं राखला नाहीं. प्रतापसिंहानें आपलें राज्य चांगल्या रीतीनें चालविलें. परंतु शेवटीं इंग्रजांसच त्याचा संशय येऊन त्यास त्यांनीं गादीवरून दूर केलें (इ. स. १८३९), व त्याचा भाऊ शहाजी यास गादीवर बसविलें. शहाजी इ. स. १८४८ त मरण पावला. त्यास मूल नव्हतें. त्यानें दत्तक घेतला होता. परंतु इंग्रजांनीं दत्तक नामंजूर करून सबंध राज्य खालसा केलें. याप्रमाणें इंग्रजांनीं सातारकरांस अगोदर वश करून घेऊन बाजीरावास बंडखोर ठरविलें व नंतर त्याचाही दर्जा कमी करीत करीत शेवटीं सर्व संस्थान खालसा केलें.

८ **एकीचा अभाव** :—अशा रीतीनें मराठी राज्याचा शेवट झाला. मोठें थोरलें साम्राज्य व लक्षावधि सैन्य असतांना मराठ्यांचा नाश कां झाला हें समजून घेणें बरेंच बोधप्रद आहे. या बाबतींत दोन गोष्टींचा स्वतंत्र रीतीनें विचार केला पाहिजे. एक मराठ्यांचें साम्राज्य मोडकळीस कां आलें? व दुसरें त्यांच्या सैन्याचा पराभव कां झाला? साम्राज्य मोडकळीस येण्याचें मुख्य कारण म्हणजे मराठे सरदारांमध्यें असलेला एकीचा अभाव हेंच होय! एकी दोन प्रकारांनीं राहूं शकते. एक मध्यवर्ती सत्ता बळकट असेल तर किंवा तिच्या अभावीं सर्व सरदारांत ध्येयाची एकवाक्यता असेल तर. पहिला बाजीराव किंवा थोरले माधवराव यांच्यासारख्या खंबीर सत्ताधीशांपुढें सरदारांचें कांहीं चाललें नाहीं व ते एकत्र राहिले. तसेंच संभाजीच्या वधानंतर प्रबल औरंगजेबाशीं टक्कर देतांना मराठे सरदारांत ध्येयाची एकवाक्यता असल्यामुळें त्या सर्वांचे उद्योग एकाच दिशेनें चालले. परंतु थोरल्या माधवरावांच्या मृत्यूनंतर बळकट मध्यवर्ती सत्ता नष्ट झाली. मूळचें

हिंदवी स्वराज्याचें ध्येय बाजूला राहिलें. हिंदुस्थानांत मराठ्यांची साम्राज्यसत्ता प्रस्थापित करण्याच्या विचारास गौणत्व प्राप्त होऊन निरनिराळ्या कर्तबगार व्यक्ती स्वतःच्या बडेजावीकडे लक्ष देऊं लागल्या व त्यामुळें आपआपसांतील प्राणघातक युद्धें उद्भवलीं.

९ **राष्ट्रीय भावनेचा अभावः**—मराठी राज्यांत राजारामाच्या मृत्यूनंतर अष्टप्रधानांची पद्धत लयास जाऊन जी सरंजामी पद्धत सुरू झाली तीमुळें मराठ्यांचा नाश झाला असें म्हणण्याची चाल आहे, परंतु तें खरें नाहीं. कारण एकदां स्वराज्याचें साम्राज्य झाल्यावर निरनिराळ्या प्रांतांवर मोठमोठे अधिकारी नेमणें अपरिहार्य आहे. मोगलांनीं सरंजामी सरदार न नेमतां सुभेदार नेमले पण तेही पुढें स्वतंत्र झालेच. शिवाय ‘ सवत्या सुभ्यांची आवड ’ असणें हा मराठ्यांचा देहस्वभावच होता असें मानलें तर सरंजामी पद्धत उद्भवणें अपरिहार्य ठरतें. हेच ठिकठिकाणचे सरदार पुढें आपल्या कर्तबगारीनें प्रबळ झाले. परंतु संभाजीच्या वधानंतर राष्ट्रावर आलेल्या संकटाचे प्रसंगीं ते जसे एक झाले तसे इंग्रजांच्या वाढत्या सत्तेचें भय ओळखून सर्वांनीं एकविचारानें तिचा प्रतिकार केला नाहीं, हें दुर्दैव होय. सतराव्या शतकांत महाराष्ट्रांत उदयास आलेली, उज्ज्वल ध्येयाची जागृति करून देणारी, संतसमर्थांची परंपरा अठराव्या शतकांत त्रुटित झाली व महाराष्ट्र जनतेला थोर विचारांचें खाद्य मिळेनासें झालें. व्यक्तिशः पुष्कळ सरदारांना पाश्चात्यांच्या वाढत्या सत्तेची खरी कल्पना आलेली होती, परंतु अशा वेळीं प्रत्येकानें आपआपल्या पायापुरतें पाहिलें. स्वकीय कोण, परकीय कोण-ह्याची जाणीव करून देणाऱ्या राष्ट्रीय भावनेचा लोप झाला.

१० **अव्यवस्था व दुर्दैवः**—दुही व राष्ट्रीय भावनेचा अभाव ह्यांच्या जोडीस ‘ अव्यवस्था ’ हा मराठ्यांचा राष्ट्रीय दुर्गुण आहे. साम्राज्य मिळविण्याची धमक त्यांचे अंगीं होती; परंतु त्याची व्यवस्थित घडी बसविण्याचें कौशल्य त्यांनीं कधींच प्रगट केलें नाहीं. मिळविलेल्या प्रांतांत पाय पक्का रोवावा व नंतर पुढें पाऊल टाकावें हा नेमस्तपणा त्यांच्यांत आढळून आला नाहीं. साम्राज्याचा डोलारा उभारला व आटोपणार नाहीं एवढा पसारा मांडला; पण चहूं बाजूंनीं शत्रू उत्पन्न झाले व शेवटीं डोलारा कोसळला. या सर्वांचे मदतीस आणखी दुर्दैव हेंही एक कारण गणलेंच पाहिजे. व्यक्तीच्या

काय किंवा राष्ट्राच्या काय कर्तबगारीसही न जुमानतां दैव एकादे वेळेस त्यास गोता देतें हें आपण पाहतों. एरव्हीं मराठ्यांस दोन्ही प्रसंगीं फरेंचांचें साह्य मिळण्याची अशक्यता कां व्हावी व एका दहा वर्षांचे आंत महादजी, अहल्याबाई, सवाई माधवराव, हरिपंत फडके, तुकोजी होळकर, परशुराम-भाऊ व नाना फडणवीस इतके पुरुष मृत्यु कां पावावेत, व ते वयपरत्वें मृत्यु पावले असें मानलें तरी, त्यांच्याबरोबरच महाराष्ट्राच्या कर्तृत्वाचा झरा कां आटावा याची संगति लागत नाहीं.

**११ गनिमी काव्याचें मर्यादित महत्त्वः**—मराठी सैन्याचा पराभव कां झाला ह्याबद्दलही निरनिराळीं कारणें पुढें करण्यांत येतात. होळकरास गनिमी काव्यानें लढून विजय मिळालेले पाहून कित्येकांस मराठ्यांनीं गनिमी काव्यानें लढण्याची पद्धत सोडून पाश्चिमात्यांची कवायती फौजेची पद्धत पतकरली हेंच चुकलें असें वाटतें, परंतु तें बरोबर नाहीं. एक तर कवायती फौजेची शिस्त व श्रेष्ठत्व पाहूनच मराठ्यांनीं प्रथम ती पद्धत उचलली व एकदां उचलल्यावर कवायती पद्धतीवर तयार झालेलें सैन्य चुटकीसरशी गनिमी काव्यानें लढण्यास लावावयाचें हें शक्य नाहीं. कारण गनिमी पद्धतींत घोडदळावर भिस्त असे व कवायती फौजेंत पायदळाचा भरणा मोठा असतो. दुसरें असें कीं, मराठ्यांची लढण्याची पद्धत मराठ्यांसच शक्य, इतरांस तिचें फारसें ज्ञान नव्हतें. पेशव्यांच्या व विशेषतः शिंद्यांच्या फौजेंत पुढें पुढें तर उत्तर हिंदुस्थानांतील पुरभय्ये, अरब वगैरे बकाली लोकांचा विशेष भरणा झालेला होता. शिवाय गनिमी काव्याचें महत्त्व कोठपर्यंत? शत्रूनें चोहोंकडून कोंडलें नाहीं तोंपर्यंत. होळकराच्या गनिमी काव्यास तोंड कसें द्यावें हें अगोदर इंग्रजांच्या लक्षांत आलें नाहीं, म्हणून त्यास कांहीं विजय मिळाले, परंतु शेवटीं इंग्रजांनीं त्यास घेरलेंच.

**१२ सैन्याच्या पराभवाचें खरें कारणः**—दुसरे कित्येक असें म्हणतात कीं, कवायती पद्धतीचें शिक्षण घेऊन पाश्चिमात्यांचे बरोबर लढणें म्हणजे हा केवळ गुरुशिष्यांचा सामना होय. यांत शिष्याचा पराभव झाला यांत नवल नाहीं. परंतु हेंही म्हणणें टिकूं शकणार नाहीं. कारण एक तर गुरू-पेक्षां शिष्य सवाई होणार नाहीं हेंच मत चुकीचें आहे. या जगाची एकसारखी प्रगति होत आहे व प्रत्येक पुढें येणारी पिढी मागें गेलेल्या पिढीजवळच शिक्षण

घेऊन पुढें जात आहे. मग शिष्यास गुरूपेक्षां जास्त श्रेष्ठ होण्यास काय हरकत आहे ? मग सैन्याचा पराभव होण्याचें कारण काय ? त्याचें उत्तर असें कीं, मराठ्यांनीं पाश्चिमात्यांचें अनुकरण केलें. परंतु ती विद्या त्यांनीं आत्मसात् केली नाहीं. पाश्चिमात्यांच्या लष्करी विद्येस आपल्या ताब्यांत न घेतां तेच तिचे दास बनले. महादजीच्या पदरचे परकीय अधिकारी किती शिरजोर होते हें वेळोवेळीं दाखविलेंच आहे. पाश्चिमात्यांचें शास्त्र आपण शिकून आपण आपल्या पायावर उभें राहावें अशी महत्त्वाकांक्षा धरणें जरूर होतें. परंतु मराठे महाराष्ट्रांत आपसांतील दुहीचें भूत खेळवीत असतां विलायतेंतील लोक किती धडाडीनें पुढें जात होते याची त्यांस कल्पना नव्हती. विलायतेंत घडणाऱ्या गोष्टींची बित्तंबातमी येथील त्यांच्या लोकांस कळत असे, परंतु तें ज्ञान संपादन करण्याचें महत्त्व कोणास वाटलें नाहीं. वास्तविक इंग्रजफरेंचांचें त्या काळीं एवढें वैर होतें कीं, फरेंचांनीं मोठ्या खुषीनें मराठ्यांस पाश्चिमात्य शास्त्राचें ज्ञान दिलें असतें. नाना फडणविसास आपण मुत्सद्दी म्हणतों, परंतु त्याच्या मुत्सद्दीपणाचें तेज राजकारण भांडविण्यांत जसें दिसून येतें तसें दीर्घ दृष्टीनें 'जलचरा'चें बळ कशांत आहे हें शोधून काढण्यांत दिसत नाहीं. इतकेंही करून शिंद्याच्या व भोसल्याच्या सैन्यांचा जो अगदीं पांच महिन्यांत पाडाव झाला तसा झाला नसता; परंतु त्या काळीं लढाई अंगलट येते हें पाहिल्याबरोबर सैन्याचा नाश न होऊं देतां पद्धतशीर माघार घ्यावी व पुन्हां तयारीनें कसें यावें ही गोष्ट माहीत नसावी. नाहीं तर एक एक लढाईंत मराठ्यांनीं जो सोक्षमोक्ष करून घेतला तो घेतला नसता.

**१३ मराठ्यांचें कार्य** :—याप्रमाणें दुही, राष्ट्रीय भावनेचा अभाव, अव्यवस्था व दुर्दैव यांमुळें मराठी साम्राज्य मोडकळीस आलें व पाश्चिमात्यांच्या शास्त्रांवर पुरतें स्वामित्व न मिळविल्यानें त्यांच्या सैन्याचा नाश झाला. बाकी, मराठ्यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासांत अभिमान धरण्याजोगी चिरस्मरणीय कामगिरी केली. मुसलमानी संस्कृतीची लाट परतविण्याचें कार्य रजपूत, शीख, विजयनगरचें हिंदु राज्य व मराठे यांनीं केलें. त्यांत रजपुतांस मुसलमानांपुढें हार खावी लागली. विजयनगरचा नाश झाला. शीखांनीं तोंड दिलें, परंतु हिंदुत्वाचें रक्षण करण्याऐवजीं त्यांनीं निराळाच धर्म स्थापन केला. मराठ्यांनीं मात्र हिंदुत्वाचें रक्षण करून इस्लामी संस्कृतीची लाट

परतवून लाविली. उन्नतीचे व अवनतीचे फेरे सर्वांवरच येतात, परंतु मराठ्यांचा उज्ज्वल इतिहास त्यांना भविष्यकालाच्या भाग्योदयाचा विसार देऊन गेलेला आहे यांत शंका नाहीं.

---

## भाग १८ वा

# दिवा विजण्यापूर्वी

## धोंडोपंत ऊर्फ नानासाहेब

ब्रह्मावर्ती स्नानसंध्या व दानधर्म करीत कालक्रमणा करणारा दुसरा बाजीराव इ. स. १८५१ सालीं आपल्या वयाच्या ७६ व्या वर्षी मरण पावला. त्याचा दत्तक पुत्र धोंडोपंत ऊर्फ नानासाहेब यानें इंग्रजांकडे बाजीरावास चालू असलेल्या ८ लक्ष रुपयांच्या पेन्शनची मागणी केली; पण या वेळीं दत्तकवारस नामंजूर करण्याचें इंग्रजांचें धोरण असल्यानें गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसी यानें ती मागणी अमान्य केली. या योगानें तो असंतुष्ट झाला व पुढें इ. स. १८५७ सालीं जें शिपायांचें बंड उत्पन्न झालें त्यांत तो सामील झाला. दिल्ली येथें बंडवाल्यांस इंग्रजी फौजेनें वेढा घातला असतां इकडे कानपुरास धोंडोपंतानें तेथील रेसिडेन्सीवर हल्ला चालू केला. तेथील गोऱ्या लोकांनीं जूनच्या ६ व्या तारखेपासून २५ व्या तारखेपर्यंत टिकाव धरला. परंतु बंडवाल्यांच्या संख्येपुढें इलाज चालत नाहीं असें पाहून बायकामुलांचें नीट रक्षण व्हावें अशा हेतूनें ते शस्त्रें खालीं ठेवून नानासाहेबास शरण गेले व आपल्या बायकामुलांस त्याच्या स्वाधीन केलें व गंगा नदींतून खालीं अलाहाबादेकडे जाण्यास निघाले. परंतु ते बोटींत पाय ठेवतात तोंच बंडवाल्यांनीं त्यांच्यावर गोळ्यांचा वर्षाव केला. बहुतेक लोक मरण पावले व फक्त चारच अलाहाबादेस पोहोंचले. या

कृत्यास नानासाहेब जबाबदार नव्हता असें म्हणतात. कानपूर येथील भयंकर वृत्त ऐकून इंग्रज सेनापति हॅवलॉक जुलै ७ रोजीं अलाहाबादेहून कानपुरास त्वरेनें निघाला. वाटेंत त्याचें बंडवाल्यांशीं ठिकठिकाणीं युद्ध झालें. त्यांना तोंड देत देत तो जुलै २५ रोजीं कानपुरास आला. परंतु हॅव-लॉक आला हें कळतांच, बंडवाल्यांनीं कैदेंतील बायकामुलांस ठार मारिलें व त्या सर्वांस विहिरींत टाकून दिलें. यानंतर जें मोठें युद्ध झालें त्यांत हॅवलॉकपुढें आपलें कांहीं चालत नाहीं असें पाहून नानासाहेब पळून गेला. मागें हॅवलॉकनें कानपूर सर केलें. नानासाहेब फिरून हातीं लागला नाहीं तो पुढें नेपाळांत मृत्यु पावला असें म्हणतात.

* * * *

## झांशीची शूर राणी लक्ष्मीबाई

सत्तावन्न सालच्या बंडांत चमकलेली दुसरी व्यक्ति म्हणजे झांशीची राणी लक्ष्मीबाई ही होय. मराठ्यांच्या इतिहासांत तिच्यासारखी शूर स्त्री दुसरी झाली नाहीं. हिंदुस्थानच्या इतिहासांत फार तर चांदबिबी काय ती तिची बरोबरी करूं शकेल. राणी लक्ष्मीबाईवर १८५७ सालच्या बंडांत भाग घेण्याचा प्रसंग कसा आला तें पाहूं.

झांशीस पूर्वीं पेशव्यांचे तर्फे नेवाळकर हे कारभारी असत. पुढें पेशवाईचा शेवट झाल्यावर इंग्रजांनीं झांशीचा कारभार त्याजकडेच ठेविला. तेथील संस्थानिक इंग्रजांशीं फार चांगलें वर्तन करीत. ह्या घराण्यांतील पुरुष गंगाधरराव हा इ. स. १८३७ पासून राज्य करूं लागला. काशीस दुसऱ्या बाजीरावाचा भाऊ चिमणाजी आप्पा होता. त्याच्याजवळ मोरोपंत तांबे नांवाचा कारभारी होता, त्याची मुलगी मनुबाई ही गंगाधररावाला दिलेली होती. हिला पेशव्यांच्या सहवासामुळें घोड्यावर बसणें, दांडपट्टा खेळणें, असलें मर्दानी शिक्षण मिळालें होतें. हीच प्रसिद्ध झांशीची राणी लक्ष्मीबाई होय. हिला एक मुलगा झाला होता, परंतु तो लवकरच वारला. तेव्हां गंगाधररावानें दत्तक घेतला व त्याचें नांव दामोदरपंत असें ठेविलें. पुढें गंगाधरपंत इ. स. १८५३ त वारला.

तेव्हां डलहौसीनें दामोदरपंताचें दत्तविधान नामंजूर करून संस्थान खालसा करण्याचा हुकूम दिला. हा हुकूम ऐकतांच लक्ष्मीबाई हिनें ‘मेरी झांशी नही देऊंगी’ असे पाणीदार उद्‌गार काढले. परंतु डलहौसीनें आपला हट्ट सोडला नाहीं; तेव्हां राणीनें सत्तावन्न सालच्या बंडांत निकराचा यत्न करून पाहण्याचें ठरविलें. त्या वर्षाचे अखेरीस ग्वालेर येथील शिंद्यांची तैनाती फौज तात्या टोपे याच्या नेतृत्वाखालीं बंड करून उठली, ही संधि साधून राणीनें उठावणी केली. हें पाहून सर ह्यू रोज यानें २० मार्च १८५८ रोजीं झांशीस वेढा दिला. झांशींतील स्त्रियाही या वेळीं युद्धास मदत करीत होत्या. तात्या टोपी राणीस बाहेरून मदत करीत होता. शेवटीं फितुरीमुळें इंग्रज झांशी सर करणार हें पाहिल्यावर राणी आपल्या घोड्यावर स्वार होऊन पाठीशीं आपल्या दत्तक पुत्रास घेऊन तीनशें निवडक स्वारांनिशीं सर ह्यू रोजच्या छावणींतून फळी फोडून निघाली व एकसारखी १०२ मैलांची दौड करून काल्पी येथें येऊन पेशव्यास मिळाली. परंतु तेथेंही मेच्या २४ तारखेस ह्यू रोजच्या सैन्यानें सर्वांस गांठलें व युद्ध झालें. त्यांत पेशव्याचा पराभव झाला. तेव्हां सर्वांनीं मिळून ग्वालेरकडे जावें असें राणीनें सुचविलें. असें करण्यांत शिंद्याची खाजगी फौज व साधल्यास खुद्द शिंदे या दोघांनाही बंडांत सामील करून घ्यावें असा राणीचा डाव होता. तिच्या कल्पनेप्रमाणें फौज सामील झाली, परंतु शिंदे मात्र मिळाला नाहीं. उलट तो सर्वांशीं लढला, परंतु त्याचाच पराभव होऊन त्यास इंग्रजांकडे आश्रयार्थ पळून जावें लागलें. पुन्हां ग्वालेर येथें युद्ध झालें. ग्वालेरही इंग्रजांच्या ताब्यांत जाणार असा रंग दिसूं लागला. तेव्हां राणीनें पुन्हां फळी फोडून निसटून जाण्याचा यत्न केला. त्या वेळीं हातघाईची मारामारी होऊन राणी रणांगणीं पडली. लवकरच ग्वालेर इंग्रजांच्या हातांत आलें व बंडाचा शेवट झाला. तात्या टोपी हा पळून गेला. परंतु पुढें इ. स. १८५९ त तो सांपडला. तेव्हां इंग्रजांनीं त्यास फांशीं दिलें. नानासाहेब मात्र शेवटपर्यंत सांपडला नाहीं. झांशीच्या राणीसारख्या शूर स्त्रिया उत्तर मराठेशाहीच्या आणीबाणीच्या कालांत चमकल्या नाहींत, व तिचें शौर्य अखेरचा निर्वाणीचा यत्न करण्यांत खर्ची पडावें हें दुर्दैव होय!

---

# भाग १९ वा

# मराठ्यांची राज्यव्यवस्था

१ **लष्कर :**—मराठी अंमलांत प्रारंभीं किल्ल्यांचें महत्त्व फार होतें व ते लढविण्यास फौज ठेविलेली असे. डोंगराळ मुलुखांत राज्य स्थापन करतांना घोडेस्वारांपेक्षां पायदळाचें महत्त्व विशेष होतें. कोंकणचे हेटकरी व देशावरचे मावळे यांचा पायदळांत मुख्यतः भरणा होता. पुढें पेशवाईत चौथाईच्या मिषानें स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर होऊं लागल्यावर पायदळाचें महत्त्व उत्तरोत्तर कमी होऊन घोडेस्वारांचें वाढत गेलें. घोडेस्वारांत शिलेदार व बारगीर असे दोन भेद असत. शिलेदारांचीं घोडीं व हत्यारें स्वतःचीं असत व त्यांस सरकारांतून स्वारीचे प्रसंगीं स्वतःची पोटगी व घोड्याचा खर्च मिळून दरमहा ३५ रुपये पगार मिळत असे. कित्येक वेळां शिलेदार हे सरकारजवळ ठराविक घोडेस्वार पुरविण्याचा करार करीत व पदरीं घोड्यांच्या पागा बाळगून राहात. बारगिरांस घोडीं व हत्यारें सरकारांतून मिळत व त्यांस दरमहा ८।१० रुपये पगार मिळे. बारगीर हे सरकारवर अवलंबून असल्यामुळें ते जास्त भरंवशाचे असत. परंतु बारगीर ठेवणें खर्चाचें असल्यामुळें मराठे अगदीं जरूरीपुरतेच बारगीर बाळगीत. घोड्यावर बसण्यांत मराठे वाकबगार होते ‘ दारांत घोडें नाहीं असें घर नाहीं व घोड्यावर बसतां येत नाहीं असा मनुष्य नाहीं ’ अशी महाराष्ट्रांत एके काळीं स्थिति होती. हेच घोडेस्वार गनिमी काव्यानें लढण्यांत फार पटाईत असत व आपल्यापेक्षां बळानें भारी शत्रूंसही हे दाद देत नसत. मराठेशाहीच्या उत्तर काळांत मराठ्यांनीं पाश्चिमात्यांच्या कवायती फौजेची पद्धत उचलली व तोफखान्याचें महत्त्व वाढलें, तसतसें किल्ल्यांचें महत्त्व उत्तरोत्तर कमी होऊन त्यांचा राजकीय कैदी ठेवण्याकरितां तुरुंगासारखा उपयोग होऊं लागला. घोडेस्वारांचें महत्त्व कमी होऊन पायदळाचें महत्त्व वाढलें. मराठ्यांचा स्वभाव शिस्तप्रिय नसल्यानें पुढें पुढें या पायदळांत परकीय अरब, पुरभय्ये वगैरेचा समावेश झाला. निजामाच्या दरबारीं बुसीच्या हाताखालीं तयार झालेले

गार्डस् (गारदी) मराठ्यांनीं चाकरीस ठेवले. यामुळें सैन्याचें राष्ट्रीयत्व कमी झालें व पदरीं ठेवलेल्या पगारी फौजेची वाढ झाली. एकंदरींत नवी उचललेली कवायती फौजेची पद्धत मराठ्यांना मानवली नाहीं.

**२ आरमार :**—जहाजांतून दूरदूर देशीं जाऊन त्यांच्याशीं व्यापार करावा ही आवड मराठ्यांत कधींच दिसून आली नाहीं. मराठी आरमाराचा मुख्य उद्देश कोंकणकिनारा ताब्यांत ठेवून परकीयांपासून संरक्षण करणें व किनाऱ्या-वरील व्यापार सुरळीत चालू देणें एवढाच होता. "परसांतलें दार आपण साधारण जितक्या सावधगिरीनें राखतों तितकें मराठ्यांचें आरमाराकडे लक्ष होतें." शिवाजीमहाराजांनीं आरमाराचें महत्त्व ओळखलें होतें. त्यांनीं पश्चिम किनाऱ्यावर अनेक जंजिरे (पाण्यांतील किल्ले) बांधिले. त्यांतील मालवणचा सिंधुदुर्ग हा किल्ला प्रसिद्ध आहे. सिद्दी, फिरंगी (पोर्तुगीज), इंग्रज व मोगल या सर्वांवर त्यांनीं आपला वचक बसविला. व त्यांचा अनेक जलयुद्धांत पराभव केला. मराठ्यांच्या आरमारांत चाळीसपासून पन्नास-पर्यंत लहानमोठीं जहाजें असत. मोठ्या जहाजास 'पाल' किंवा 'गुराब' म्हणत. रत्नागिरी व अंजनवेल येथें जहाजें बांधण्याचें काम होत असे. जहाजा-वर हशम व दर्यावर्दी असे दोन प्रकारचे लोक असत. हशम म्हणजे लढाऊ लोक. दर्यावर्दी लोकांत सारंग, तांडेल, पांजरी व खलाशी असे वर्ग असत. याशिवाय तोफा डागणारे गोलंदाज व नेम मारणारे बरकंदाज हेही असत. तसेंच प्रत्येक जहाजावर 'मालमी' म्हणजे होकायंत्र, वालुकायंत्र व दुर्बिण हीं असत व विद्युत्प्रकाशाचें काम त्या वेळीं चंद्रज्योतीच्या साह्यानें करीत. सर्वांत मोठ्या लढाऊ जहाजावर २८ तोफा, २५० हशम व शिवाय दर्यावर्दी इतके राहूं शकत.

**३ वसुलाची व्यवस्था :**—खेडेगांव हें सर्व राज्यव्यवस्थेचें मुख्य घटक होतें. तेथें पाटील हा सरकारचा नोकर व गांवकऱ्यांचा प्रतिनिधि अशीं दोन्ही दर्जाचीं कामें करी. खेडेगांवच्या दप्तराचें व हिशेबाचें काम सांभाळण्यास कुळकर्णी असे. त्याच्याजवळ सर्व खेड्याचें दप्तर असे. त्यांत खेड्यांतील लोकांसंबंधीं व तेथील जमिनीसंबंधीं अगदीं खडान्खडा माहिती असे. महार हा खेडेगांवच्या पोलिसाचें काम करीत असे. व याशिवाय प्रत्येक खेड्यांत बारा बलुतीं असत. त्यांचीं नांवें—सुतार, लोहार, चांभार, महार, मांग,

कुंभार, न्हावी, धोबी, गुरव, जोशी, भाट व मुसलमान मुल्ला (मुलाणा). प्रांताप्रांतांतून यांच्यांत फरक होई व त्यांची संख्या कधीं कधीं बारांहून कमी अधिक होत असे. खेडेगांवांत ग्रामसंस्था असे व त्यांत पांच पंच प्रमुख असत. हे अनेक वेळां आपसांतील तंटयांचा निकाल करीत. अशा रीतीनें प्रत्येक खेडे-गांव आपआपल्यापरी स्वतंत्र असे; एकवार सरकारदेणें देऊन टाकलें म्हणजे सरकारकडून त्यास फारसा उपसर्ग पोहोंचत नसे. सरकारचाही कल एकं-दरींत ग्रामव्यवस्थेंत शक्यतोंवर ढवळाढवळ करावयाची नाहीं असा असे.

शेतकऱ्यांत मिरासदार व उपरी असे दोन वर्ग असत. परंतु मिरासदारांची संख्या मोठी असे. उपरी हे दुसऱ्यांचीं शेतें नांगरीत. सरकारनें रयतेची जमिनीवरील मालकी मान्य केलेली होती. जमिनीचा सारा मलिकंबरानें घालून दिलेल्या पद्धतीवर कायमचा ठरवून दिलेला होता. त्यास तनखा म्हणत. परंतु पुढें पुढें प्रांतांत शांतता नांदूं लागल्यावर रयतेनें जमिनींत बरीच सुधारणा केली. तेव्हां सदाशिवरावभाऊनें 'कमाल' म्हणून एक नवीन पद्धत घालून दिली. दरवर्षीं तनखा गोळा करावयाचा परंतु एकाद्या वर्षीं सरकारास जरूर पडल्यास 'कमाल' वसूल घ्यावयाचा. दुष्काळामुळें किंवा स्वारीमुळें नासाडी झाली असल्यास याची सूट मिळत असे. प्रत्यक्ष जमा झालेल्या वसुलास 'ऐन जमा' म्हणत. साधारणतः बींबियाणें व मोलमजुरीचा खर्च वजा जाऊन निव्वळ उत्पन्नापैकीं निम्यापेक्षां 'ऐनजमा' कधींही जास्त नसे. गतवर्षींच्या वसुलास 'आकार' असें म्हणत. वर्षाचे प्रारंभीं मामलेदार हा पाटलाला बोलावून आणून अंदाजी वसूल किती येईल असें विचारी. यास 'जमाबंदीपट्टी' म्हणतात. नंतर पाटील पिकाची लावणी करण्याबद्दल खेडे-गांवांत व्यवस्था करी व कोणास अडचण असल्यास जमीन लागवडीस आणण्यास 'तगाई' कर्ज देववी. पिकाची लावणी झाल्यावर पाटील मामलेदाराकडे 'कबूल कतबा' पाठवी. यामध्यें 'जमाबंदीपट्टी' मधील अंदाजापेक्षां जास्त बिनचूक माहिती असे. ही माहिती कित्येक वेळां मामलेदार आपले लोक पाठवूनही मिळवीत असत. शेवटीं ऐनजमा रबी, खरीफ व तुसार या तीन पिकांच्या वेळीं तीन हप्त्यांनीं वसूल होई. जमिनीवरील वसुलाशिवाय इतर कर थोडे असत. त्यांत महारमहारकी, इनामपट्टी, विहीरहुंडा, मोहतर्फा (बाजारावरील कर), वटछप्पन्नी (वजनावरील कर), लग्नटिक्का, घर-

पट्टी वगैरे प्रमुख आहेत. यांशिवाय वनचराई, गुन्हेगारी, बकरेपट्टी, म्हैसपट्टी, देवस्थान हींही नांवें ठिकठिकाणीं आढळतात.

पांचसहा खेड्यांचा समूह मिळून 'तर्फ' होई व त्यावर शेखदार म्हणून अंमलदार असे. तर्फाहून मोठा विभाग म्हणजे परगणा किंवा महाल होय. यावर मामलेदार प्रमुख असे. पूर्वीं मुसलमानी अंमलांत देशमूख व देशपांडे हे वतनदार अधिकारी खेडेगांवांतील पाटीलकुळकर्ण्याप्रमाणें महालाचा अधिकार पाहात असत. परंतु शिवाजीनें या वतनदारांचें महत्त्व कमी करण्या-करितां म्हणून पगारी मामलेदार नेमले व त्यांवर दाब राहावा म्हणून देशमुखांचा दर्जा कायम राखण्यांत आला. अशा रीतीनें वतनदार लोकांना शिरजोर होऊं न देतां त्यांचा त्यानें मान राखिला. मामलेदारास आपल्या परगण्याच्या वसुलाचा अर्धा भरणा सालाच्या प्रारंभीं आगाऊ करावा लागे व सर्व वसुलाचा भरणा वर्ष पुरें होण्यापूर्वींच होई. आपल्या वसुलाची मुख्य सरकारकडे समजावणी करतां यावी म्हणून प्रत्येक मामलेदार आपला एक इसम सरकारदरबारीं ठेवीत असे. वर्षाचे शेवटीं मामलेदार सह्या घेऊन महालाचा हिशेब मुख्य सरकारकडे रवाना करी. मामलेदारास मदत करण्यास एक दिवाण, एक फडणवीस व एक पोतनीस असे. हे लोक मुख्य सरकारच्या कचेरींतून तयार होऊन आलेले असत व मामलेदारास त्यांच्या हातून काम करून घ्यावें लागत असे. सर्व व्यवस्था परस्परावलंबी व एक-मेकांच्या हिताची गुंतागुंत करून ठेवावी अशी होती. हेतु हा कीं, एकाचें हिताहित तेंच दुसऱ्याचें अशी भावना उत्पन्न व्हावी. महालापेक्षां मोठा विभाग सुभा होय. यावर सुभेदार मुख्य असे. दक्षिणेंतील मराठी राज्याचे पेशवाईंत १५ सुभे व २७४ महाल होते. मामलेदाराप्रमाणेंच सुभेदाराचे मदतीस दिवाण, फडणवीस वगैरे अनेक मदतनीस असत.

४ **न्यायव्यवस्था**:—न्यायखात्याचे फौजदारी व दिवाणी असे दोन विभाग पडतात. पैकीं खेडेगांवच्या बाबतींत पाटलास लहान लहान गुन्हे तोडण्याचे फौजदारी अधिकार असत. गांवांत चोरी झाल्यास ती महारास धरून द्यावी लागे किंवा चोराचा तलास पुढील गांवापर्यंत लावणें भाग तडे. नंतर चोरीचा तपास करण्याची जबाबदारी त्या खेडेगांवच्या महारावर येई. शेवटीं चोरी न सांपडल्यास त्या गांवास चोरीची रक्कम भरून द्यावी लागे. कधीं कधीं

ह्या कामांत हयगय झाल्यास पाटलास शिक्षा होई. पाटलाप्रमाणें मामलेदारासही फौजदारी अधिकार असत. पेशव्यांच्या सरदारांस आपापल्या जहागिरींतील मुलुखांत वाटेल ती शिक्षा देण्याचा अधिकार असे. शिक्षा देतांना पक्षपात होई. ब्राह्मणास इतर जातीपेक्षां कमी शिक्षा होई. सरकारपर्यंत तक्रार येईतों सरकार तिकडे लक्ष देत नसे व लोकांनीं परस्पर एकमेकांवर सूड उगविल्यास सरकार मध्यें पडत नसे.

दिवाणी फिर्यादींचा निकाल करण्याचें काम खेडेगांवांतील पंचांकडे असे. पंच गांवपंचायतींत फुकट काम करीत. पंच निवडून येणें बहुमानाचें समजत असत. जातीच्या तंटयांत त्या जातीचेच पंच असत. पंचांच्या निकालांस 'निवाडपत्र' व जातीच्या निकालांस 'गोतमहजर' असें म्हणतात. दोन गृहस्थांमध्यें तंटा उत्पन्न झाल्यास ते तो पाटलास कळवीत. तो प्रथम मध्यस्थांमार्फत तंटा मिटविण्याचा यत्न करी व तें शक्य न झाल्यास गांवसभा बोलावून दोन्ही पक्षांस पसंत असे पंच नेमण्यांत येत. हे पंच दोन्ही पक्षांकडून 'पंचांचा निकाल मान्य करूं' असें लिहून घेत, त्यास 'राजीनामा' म्हणत. नंतर वादी व प्रतिवादी आपलें म्हणणें सांगत. वकिलाची जरूर लागत नसे. नंतर साक्षिदाराचे पुरावे घेत व सांगितलेल्या हकीकतीस प्रत्यक्ष पुरावा नसल्यास दिव्य करून दाखवावें लागे. त्यानंतर पंच थोडक्यांत खटल्याच्या बाबी लिहून काढीत. यास 'सारांश' म्हणत व त्यावर कायद्यांत सांगितल्याप्रमाणें निकाल व शिक्षा देत. सर्व खटल्याचे निकाल पेशव्यांच्या नांवानें होत. शिक्षेची अंमलबजावणी करणें मामलेदाराचे हातांत असे. ज्याच्यासारखा निकाल झाला असेल त्यानें 'हरकी' द्यावी व ज्याच्या विरुद्ध झाला. त्यानें 'गुन्हेगारी' द्यावी अशी पद्धत होती. गुन्हेगारीची रक्कम हरकीच्या दुप्पट होती व गुन्हेगारी खटल्याच्या रकमेच्या शेंकडा १५ हून जास्त नसे. पंचायत मान्य न झाल्यास खटले परस्पर मामलेदाराकडे जात. खटल्याचे प्रश्न साधारणतः वाटणी, वारसाहक्क, शेताच्या बांधासंबंधीं तंटे वगैरेसंबंधींचे असत. दोन्ही पक्षांची मान्यता मिळाल्यास वाटेल त्या पद्धतीनें खटल्याचे निकाल केल्यास चालत असे. एकंदरींत ही ग्रामव्यवस्थेंतील न्यायदानाची पद्धति शास्त्रीय काटेकोरपणाच्या दृष्टीनें निर्दोष नसली तरी आजच्या मानानें कमी खर्चाची व कामें झटपट निकालांत काढणारी अशी होती.

**५ वरिष्ठ सरकार :**—वरिष्ठ सरकारचें सर्व लक्ष सामान्यतः परराष्ट्रीय राजकारण व स्वकीय सरदारांशीं घडून येणारे संबंध यांकडे असे. रयतेच्या रोजच्या दिनक्रमांत शक्यतोंवर ढवळाढवळ करावयाची नाहीं, या धोरणामुळें रयत टपाल, शिक्षण, वाहतूक, व्यापार वगैरे बाबतींत सरकारवर अवलंबून राहात नसे. सरकारासही राज्य चालविण्यास हल्लींप्रमाणें मोठा खर्च लागत नसे व त्यामुळें करांचें ओझें हल्लींहून निःसंशय हलकें होतें. चौथाई व सरदेशमुखीच्या रूपानें पैशाचा ओघ महाराष्ट्राकडे सतत शंभर वर्षें वहात असल्यानें महाराष्ट्रांत आबादानी होती. परंतु जहागिरीच्या रूपानें बऱ्याच मोठ्या प्रदेशाची वाटणी झाल्यामुळें मध्यवर्ती सरकारची स्थिति हलाखीची असे. पहिल्या बाजीरावानें व थोरल्या माधवरावानें कर्जासंबंधीं काढलेले उद्‌गार वाचले म्हणजे याची चांगली कल्पना येते. जहागिरदारांनीं मध्यवर्ती सरकारकडे करावयाचा भरणा ते नियमितपणें करीत नसत व सरकारास स्वारीवर निघतांना कर्ज काढावें लागे. कर्जास कित्येक वेळां दरसाल दर शेंकडा २४ एवढें व कदाचित् जास्तही व्याज पडे. यामुळें मराठी राज्यांत सावकारांचें फार प्रस्थ असे. चौथाईच्या बाबतींत मराठ्यांचा अव्यवस्थितपणा हा दुर्गुण पदोपदीं दृष्टीस पडतो. तैनाती फौज ठेवून तिचे खर्चाबद्दल नियमित रीतीनें पैसा वसूल करण्यांत किंवा मुलूख तोडून घेण्यांत जो काटेकोरपणा वेलस्लीनें दाखविला, तो मराठ्यांत कधींच दिसून आला नाहीं.

**६ विद्या, धर्म, सामाजिक सुधारणा वगैरे :**—विद्येच्या बाबतींत मराठ्यांनीं नांव घेण्यासारखें कांहींच केलें नाहीं. "डोळे उघडून चोहोंकडे दूरवर पाहण्याची त्यांना इच्छाच झाली नाहीं, हा त्यांचा दोषच असें म्हणण्यास हरकत नाहीं." पेशवाईत ब्राह्मणांस दक्षिणा देऊन वेदविद्येस उत्तेजन मिळे; परंतु पुढें पुढें त्याचा दुरुपयोग होऊन ब्राह्मण म्हटला कीं, त्यास दक्षिणा मिळे अशी स्थिति आली. केवळ धर्माचरण करून शिष्यास शिकविणारा वर्ग त्या वेळीं मोठा असे हें विसरतां कामा नये. लोकांचा त्या काळीं भुतेंखेतें, चेटकें यांवर विश्वास असे. पण मराठी राज्यांत हिंदुसमाजाची, सावकाशपणें उन्नति होऊन बिकट सामाजिक प्रश्न हलके हलके सुटण्याचे मार्गास लागले होते. उदाहरणार्थ, प्रभूंना वेदोक्ताचा अधिकार मिळाला होता. सोनारांना स्वतःच्या जातींतील भिक्षुकांकडून काम करून घेण्याची पर-

वानगी होती. ब्राह्मणांतील पोटभेद सावकाश लयास जात होते. खुद्द नानासाहेब पेशव्यानें देशस्थ गृहस्थ वाखरे यांच्या मुलीशीं लग्न केलें होतें. हुंड्यावर व सतीच्या बाबतींत सक्ति करण्याविरुद्ध निर्बंध घातले होते. पतित-परावर्तन म्हणजे परधर्मांत गेलेल्यांस पुन्हां हिंदु करून घेणें चालू होतें. वसई प्रांतांत पोर्तुगीजांनीं सक्तीनें ख्रिश्चन केलेल्या लोकांना परत हिंदु धर्मांत घेण्याबद्दल स्थानिक ग्रामजोशांना पेशव्यांकडून हुकूम गेले होते. लढाईत यशस्वी होऊन आलेल्या मराठे सरदारांकडे मेजवान्या होत तेव्हां पेशवे भोजनास जात. स्वारीशिकारीचे प्रसंगीं जातिभेदाचे निर्बंध साहजिकच ढिले पडत. ही हिंदुसमाजाची सावकाश होत असलेली प्रगति ब्रिटिशांचें राज्य प्रस्थापित झाल्यावर बंद पडली. पुढें विद्येच्या प्रसारामुळें या प्रश्नास पुनः चालना मिळाली आहे.

**७ व्यक्तिनिष्ठ राज्यपद्धति :**—महाराष्ट्रांतील सर्व गोष्टी व्यक्तिनिष्ठ आहेत. तेजस्वी व्यक्ती नियम घालून देतात, सुधारणा करतात, परंतु त्यांची परंपरा पाळणारे पुरुष ज्या शाळेंत तयार होतात अशा संस्था महाराष्ट्रांत निर्माण झाल्या नाहींत. एका बाजूस कर्तृत्ववान् गव्हर्नरांची परंपरा कायम ठेवून त्याच्यावरही दाब ठेवणारी इंग्रजी सत्ता व दुसऱ्या बाजूस वंशपरंपरा-गत व्यक्तीचा अधिकार निमूटपणें मान्य करणारें मराठी राज्य यांच्या सामन्यांत व्यक्तिनिष्ठ मराठी राज्य नाहीसें व्हावें हें क्रमप्राप्तच होतें. तेजस्वी ताऱ्यांच्या प्रकाशांत महाराष्ट्रानें स्वातंत्र्याचें सौख्य भोगलें. त्यांची परंपरा निर्माण करणाऱ्या संस्था महाराष्ट्रांत नसल्यानें त्यांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्राचें स्वातंत्र्य नष्ट झालें.

---

# उदयोन्मुख महाराष्ट्र

एकोणिसाव्या शतकाचे पूर्वार्धांत मराठी राज्य गेलें व ब्रिटिशांचें राज्य सुरू झालें व त्याच शतकाचे उत्तरार्धांत महाराष्ट्रांत जागृतीचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं. एकोणिसाव्या शतकाचे उत्तरार्धांत उदय पावलेल्या विचार-जागृतीनें विसाव्या शतकांतील विद्यमान नवभारताचा जन्म झालेला आहे. ही विचारजागृति मुख्यतः तीन प्रकारची आहे.

प्रखर बुद्धिनिष्ठा हा एक प्रकार. महाराष्ट्रांत कै. गोपाळ गणेश आगरकर हे याचे मोठे पुरस्कर्ते होऊन गेले. बुद्धीस पटेल तें गृहीत धरावयाचें. पूर्वजांच्या मोठेपणाला किंवा कुणा उपदेश करणाऱ्याच्या विद्वत्तेला दबून न जातां कठोर तर्काला पटेल तेंच कबूल करावयाचें व तसें बोलून दाख-वावयाचें हें यांचें तत्त्व. सोळाव्या शतकांत युरोपांत मार्टिन ल्यूथरनें केलेलें कार्य या थोर पुरुषानें महाराष्ट्रांत केलें.

समता व बंधुभाव हा दुसरा प्रकार. महाराष्ट्रांत न्या. मू. रानडे हे याचे मोठे पुरस्कर्ते होऊन गेले. जन्मानें कोणी उच्चनीच नाहीं. जातीवर लहानमोठेपण अवलंबून नाहीं. समाजांतील सर्व माणसें परमेश्वराचीं लेकरें. त्यांना आपली उन्नति करून घेण्यास सारखीच संधि असली पाहिजे. स्त्रिया, अस्पृश्य या वर्गांना मागें ठेवणें बरोबर नाहीं ही कै. रानडे यांची शिकवण असे. प्राचीन संतांच्या शिकवणीवर युरोपीय समतेचें कलम चातुर्यानें लावून सांधा जुळविण्याचें कार्य या थोर पुरुषानें केलें.

देशाभिमान हा तिसरा प्रकार. कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं या विषयाची शिकवण महाराष्ट्राला दिली. आपली भाषा, आपला धर्म, आपला देश यांबद्दल उत्कट अभिमान धरला पाहिजे व त्या तिहींसाठीं आपण कष्ट करून त्यांचे उतराई झाले पाहिजे. याच विचाराचा जबरदस्त पुरस्कार कै. लो. टिळक यांनीं केला. यांच्या शिकवणीमुळें स्वदेशीचा इतिहास, स्वतःचा धर्म, प्राचीन विद्या यांचें संशोधन सुरू झालें, धका-धकीची तयारी झाली व स्वदेशीचा पुरस्कार झाला. इंग्रजींत या त्रिविध

विचारजागृतीचें स्वरूप रॅशनॅलिझम्, लिबरॅलिझम् व नॅशनॅलिझम् या तीन शब्दांत सांगतां येईल.

कै. ना. गोखले यांनीं देशसेवेस व सार्वजनिक कार्यास धर्माचें स्वरूप देऊन पुण्यास फर्ग्युसन टेकडीच्या पायथ्याशीं सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी या नांवानें देशसेवकांचा मठ स्थापन केला.

या सर्व थोर पुरुषांच्या पावलांवर पाऊल टाकून स्वसामर्थ्यानुरूप काम करणाऱ्या अनेक संस्था महाराष्ट्रांत स्थापन झाल्या आहेत व त्यांतून महर्षि आण्णासाहेब कर्वे, श्री. विठ्ठराव शिंदे, डॉ. कूर्तकोटी, श्री. तात्यासाहेब केळकर, श्री. लक्ष्मणराव किर्लोस्कर, इत्यादि व्यक्ती काम करीत आहेत.

बुद्धिनिष्ठा, बंधुभाव व देशाभिमान या त्रयीच्या जोरावर नवभारताच्या पुनर्घटनेंत तरुण महाराष्ट्रानें उत्साहानें भाग घ्यावा असा दिवंगत थोर पुरुषांचा महाराष्ट्रास संदेश आहे.

---

# मराठी अंमलांतील मराठी वाङ्मय

मराठी रियासतीच्या काळांत महाराष्ट्रांत मराठी वाङ्मय पुष्कळच निर्माण झालें, परंतु एका रामदासांच्या वाङमयाखेरीज इतरत्र सामान्यतः तत्कालीन राजकीय परिस्थितीची बरीवाईट जाणीव असलेली आढळत नाहीं. बारकाईनें पाहूं जाणारास महाराष्ट्रांतील साहित्यप्रवाह व साम्राज्य-संवर्धनाचा यत्न यांत कांहीं सूक्ष्म संबंध सापडतील, नाहीं असें नाहीं, परंतु महाराष्ट्रांतील संत व कवि आपापल्या चिंत्य विषयांत इतके तद्रूप झालेले दिसतात कीं त्यांस बाह्य जगाचा विसर पडावा हें स्वाभाविक होय. असें असलें तरी त्यांनीं मागें ठेवलेलें वाङमय मराठ्यांस

काय मानू मी या संतांचे उपकार।
मज निरंतर जागवीती ॥

असें म्हणावयास लावणारें आहे. मराठी साम्राज्य आलें आणि गेलें, पण ज्ञानोबा, तुकाराम महाराष्ट्रांतील घरोघर व पंढरपूरच्या वाळवंटांत जिवंत आहेत. यांतील ठळक संत, कवी व लेखकांची त्रोटक नामावलि मात्र येथें देऊन ठेवतों.

| काल | नांव | कार्य |
|---|---|---|
| इ. स. ११८८ | मुकुंदराज | विवेकसिंधु |
| इ. स. १२९८ | ज्ञानेश्वर | ज्ञानेश्वरी |
| १३ वें शतक | केशवराज व्यास | पंचतंत्र |
| १४ वें शतक | नामदेव | अभंग |
| १६ वें शतक | एकनाथ | एकनाथी भागवत |
| **शिवकाल** | | |
| १७ वें शतक | तुकाराम | अभंग |
| १७ वें शतक | फादर स्टीफन्स | ख्रिस्तपुराण |
| | रामदास | दासबोध |
| | वामनपंडित | यथार्थदीपिका सीतास्वयंवर, |
| | मुक्तेश्वर | महाभारत वगैरे |
| | कृष्णाजी अनंत | सभासदी बखर |
| **पेशवाईचा काळ** | | |
| १८ वें शतक | रामचंद्रपंत अमात्य | राजनीती |
| | कविवर्य मोरोपंत | आर्याभारत, १०८ रामायणें इ. |
| | श्रीधर | पांडवप्रताप, शिवलीलामृत वगैरे. |
| | महिपति | भक्तिविजय |
| १८ व्या शतकाची अखेर व १९ व्या शतकाचा प्रारंभ | अनंतफंदी | माधवग्रंथ, कटाव, फटके व लावण्या |
| | रामजोशी | लावण्या |
| | होनाजी बाळ | पोवाडे व लावण्या |
| | प्रभाकर | ,, ,, |
| | सगनभाऊ | ,, ,, |

# इतिहासाचे आधार



[ पुढें दिलेल्या पत्रांतील अनोळखी भाषेनें बिचकून जाण्याचें कारण नाहीं. दोनतीनशें वर्षांपूर्वींचे लोक ह्या पत्रांतून आपणांशीं बोलत आहेत व ज्यांचा इतिहास आज आपण शिकत आहोंत ते आपल्या हालचाली व कल्पना स्वमुखानें आपणास सांगत आहेत. उदाहरणार्थ, श्री समर्थ रामदास त्या वेळच्या देशस्थितीचें पुढीलप्रमाणें वर्णन करतात. ]

## शिवपूर्वकालीन अस्मानी सुलतानी

पदार्थ मात्र तितुका गेला । नुस्ता देशचि उरला ।
येणें करितां बहुताला । संकट जालें ॥ १ ॥
लोकें स्थानभ्रष्ट जालीं । कितेक तेथेंचि मेलीं ।
उरलीं तें मराया आलीं । गांवावरी ॥ २ ॥
माणसा खावया धान्य नाहीं । आंथरूण पांघरूण तेंहि नाहीं ।
घर कराया सामग्री नाहीं । काये करिती ॥ ३ ॥
पुढें आला प्रजन्य काळ । धान्य महर्ग दुःकाळ ।
शाकार नाहीं भळभळ । रिचवे पाणी ॥ ४ ॥
कितेक अनाचारी पडिलीं । कितेक यातिभ्रष्ट जालीं ।
कितेक ते आक्रंदलीं । मुलें बाळें ॥ ५ ॥
कितेक विषें घेतलीं । कितेक जळीं बुडालीं ।
जाळिलीं ना पुरिलीं । किती येक ॥ ६ ॥
ऐसें जालें वर्तमान । पुढें हि अवघा अनमान ।
सदा दुश्चीत अवघे जन । उद्वेगरूपी ॥ ७ ॥
कांहींच पाहातां धड नाहीं । विचार सुचेना कांहीं ।
अखंड चिंतेचा प्रवाहीं । पडिले लोक ॥ ८ ॥

येक म्हणती कोठे जावें । येक म्हणती काये करावे ।
विदेशा जाउनि काये खावे । वेच नाहीं ॥ ९ ॥
तथापि मार्गेचि चालेना । भिक्षा मागतां भिळेना ।
अवघे भिकारी च जना । काये म्हणावें ॥ १० ॥
प्राणीमात्र जाले दुखी । पाहातां कोण्ही नाहीं सुखी ।
कठिण काळे वोळखी । धरीनात कोण्ही ॥ ११ ॥

रामदास—इतिहासमंजरी पृ. २२-२३

## राज्यस्थापनेची पूर्वतयारी

### मावळांत जमवाजमव

[ राज्यस्थापनेपूर्वी मावळांत जमवाजमव करणाऱ्या लोकांच्या राज्य-स्थापनेच्या काय कल्पना होत्या तें या उताऱ्यावरून कळून येतें. या उताऱ्यांत 'मऱ्हास्टराज्य' हा महत्त्वाचा शब्द आहे. ]

त्यावरी राजश्री स्वामींनी[1] हुकूम केला की वरकड मावळचे देशमुख व तुम्ही येके जागा बैसोन त्यांचा मुदा मनास आणवणे त्यावरी कान्होजी[2]ना व अवघे मावळचे देशमुख येके जागा बैसले तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार काये तो सांगणे तेव्हा बोलिले की आम्ही राजश्री स्वामीच्या पायासी इमान धरून वतनास देखील पाणी सोडिले आम्ही व आपले लेक देखील राजश्री स्वामीपुढे खस्त होवे यैसा आमचा दृढ विचार आहे तुमचा मुदा काये तो बोलणे मुसलमान बेइमान आहे कार्य जालियावरी नस्ते निमित्य ठेऊन नाश करील हे मऱ्हाष्ट राज्य आहे अवघियानी हिमत धरून जमाव घेऊन राजश्री स्वामी संनिध राहोन येकनिष्ठेने शेवा करावी

---

१ मोकळी जागा 'शिवाजी' साठीं सोडली आहे. बहुमानार्थी नांव न घेतां पत्रांत मोकळी जागा सोडण्याची चाल असे. २ कान्होजी जेधे.

यैश्या हिमतीच्या गोष्टी सांगितल्या तेव्हा अवघे देशमुख बोलिले की तुमचा विचार तोच आमचा विचार इमान पुरस्कर आहे यैसे बोलिले तेव्हा अवघे देशमुख घेऊन राजश्री स्वामीसंनिध आले अवघ्यानी शफत केली मग केली मग अवघ्यास भोजनास घातले त्यावरी अगदी मावलचा जमाव केला.

जेधेकरीना—शिवचरित्रप्रदीप पृ. ४३-४४

## शिवाजीचें फौजेच्या अधिकाऱ्यास पत्र

आपल्या सैन्यापासून प्रजेस त्रास होऊं नये याबद्दल शिवाजी फारच जपत असे, हें निराळें सांगण्याची जरूरी नाहीं. एकदां शिवाजीच्या कांहीं फौजेची छावणी कोंकणांत होती. त्या फौजेच्या अधिकाऱ्यांस शिवाजीनें एक पत्र लिहिलें; तें पुढीलप्रमाणें आहेः—

**श्रीभवानीशंकर.**

वैशाख शु. ॥ १५, शके १५९६. ९ मे सन १६७४.

१ मशरुल अनाम राजश्री २ जुमलेदारानी व हवालदारानी व कारकुनानी ३दिमत पायगो मुक्काम मौजे हलवर्ण ४ तो॰ चिपळूण ५ मामले दाभोळ प्रति राजेश्री शिवाजी राजे ६ सु॥ ७ अर्बा सबैन व अलफ. कसबे चिपळुणीं साहेबीं लष्कराची ८ विले केली आणि या उपरि घाटावरि कटक जावें ऐसा मान नाहीं म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळुणीं कटकाचा मुक्काम होता याकरितां दाभोळच्या सुबेयांत

१ लोकप्रसिद्ध, 'राजमान्य राजश्री'प्रमाणें फारसी मायना. २ जुमलेदार, हवालदार व कारकून यांचीं प्रथमेचीं अनेकवचनें. ३ पायगो=पायगा=पागा; दिमत=संबंधीं; पागेकडील. ४ तरफ. ५मामलत. ६सु॥=सुहूरसन, ७ 'अर्बा'=४, सबैन = ७०, अलफ = १०००; अर्बा सबैन व अलफ = १०७४. ८ व्यवस्था.

पावसाळ्याकारणें पागेस ९ सामा व दाणा व वरकड केला होता तो कित्येक खर्च होऊन गेला व चिपळुणाआसपास १० विलातींत लष्कराची ११ तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां १२ हाल कांहीं उरला नाहीं. ऐसें असतां वैशाखाचे दिवस, उन्हाळा, हेही पागेस अधिक बैठी पडली. परंतु जरूर जालें त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडी गल्ला असेल तो देवऊनच जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास तुम्ही मनांस माने ऐसा दाणा, १३ रातीब, गवत मागाल. असेल तोंवरी धुंदी करून चाराल. नाहींसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाहीं. उपास पडतील, घोडी मरावयास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हींच मारिलीं ऐसें होईल. व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचे एथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटे, कोण्ही भाजी, कोण्ही पाले, ऐसें करूं लागलेंत म्हणजे जीं कुणबीं घर धरून जीवमात्र घेऊन राहिलीं आहेत तेहि जाऊं लागतील. कित्येक उपाशीं मरायला लागतील. म्हणजे त्यांला ऐसें होईल कीं मोंगल मुलकांत आले त्याहूनहि अधिक तुम्ही ! ऐसा तळतळाट होईल ! तेव्हां रयतीची व घोड्यांची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हें तुम्हीं बरें जाणून, सिपाई हो अगर १४ पावखलक हो, बहुत १५ यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगांव राहिले असाल त्यांणीं रयतेस काडीचा १६ अजार द्यावयाची गरज नाहीं. आपल्या राहिल्या जागांतून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबीं खजानांतून वांटणिया पदरीं घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरें ढोरें वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें, भाजीपाले व वरकड विकावया येईल तें १७ रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें. कोण्हावरी जुलूम अगर १८ ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाहीं. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजवीजीनें दाणा रातीब कारकून देत जातील

---

९ सामान,सामुग्री. १० विलायत = प्रदेश ११ त्रास, उपसर्ग. १२ आतां. १३ ठराविक प्रमाण. १४ पायदळांतील सैनिक. १५ काळजीपूर्वक. १६ त्रास. १७ घाऊक. १८ बळजबरी.

तेणेंप्रमाणेंच घेत जाणें; कीं उपास न पडतां रोजबरोज खायला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी घसपस कराया, अगर अमकेंच द्या तमकेंच द्या ऐसें म्हणाया, धुंदी करून १९ खासदारकोठींत, कोठारांत शिरून लुटाया गरज नाहीं. व हल्लीं उन्हाळचाला आहे तइसें खलक पागेचे आहेत, २० खण धरून राहिले असतील व राहातील, कोण्ही आगटचा करतील कोण्ही भलतेच जागा चुली २१ रंधनाला करितील, कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिलें साहे ऐसे अगर वारें २२ लागलें आहे ऐसें मनास न आणिता म्हणजे २३ अविस्राच एकादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या २४ लहळचास कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळ्या आहेत तितक्या एकएक जाळों जातील. तेव्हां मग कांहीं कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनास ताकीद करावी तैसी केली तऱ्ही कांहीं खण कराया एक लाकूड मिळणार नाहीं, एक खण होणार नाहीं; हें तों अवघियाला कळतें. याकारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेशा फिरत जाऊन, रंधनें करिता, आगटचा जाळिता, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्राच उंदीर वात नेईल, ते गोष्टी न हो. खण, गवत वांचेल तें करणें. म्हणजे पावसाळा घोडीं वाचलीं. नाहीं तर मग, घोडीं बांधावीं नलगेत, खायास घालावें नलगे, पागाच बुडाली. तुम्ही २५ निसूर जालेत !! ऐसें होईल. याकारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार, हवालदार, कारकून आहां तितके हा २६ रोखा तपशिलें ऐकणें, आणि हुशार राहणें. वरचेवरी रोजाचा रोज, खबर घेऊन, ताकीद करून, येणेंप्रमाणें वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल, ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल त्यास–मराठियाची तो इज्जत वाचणार नाहीं, मग रोजगार कैसा,

---

१९ खासकोठींत. २० झोपडी, घर. २१ स्वयंपाकाला. २२ सुरू झालें, सुटलें. २३ अकस्मात. २४ पेंढया ? २५ निष्काळजी. २६ हुकूम.

२७ खळक २८ समजों २९ ज्यास्ती केल्यावेगळें सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें. ऽ छ. १२+सफर.*

—मुलांचा महाराष्ट्र पृ. ६८–७१

## शिवाजीकडून अधिकाऱ्याची खरमरीत कानउघाडणी

एकदां मामले प्रभावळीचा सुभेदार जिवाजी विनायक यानें आरमारास ऐवज व गल्ला नेमल्याप्रमाणें पावता केला नाहीं. ही गोष्ट शिवाजीच्या कानावर गेली, तेव्हां त्याला अत्यंत राग आला व त्यानें सुभेदारास एक खरमरीत पत्र लिहिलें. त्या पत्रावरून शिवाजीची आरमाराबद्दल दक्षता व सुभेदारावरील जरब चांगली व्यक्त होते. तें पत्र येणेंप्रमाणें:—

" राजश्री जिवाजी विनायक सुभेदार व कारकून सुभे मामले प्रभावळी, प्रती राजश्री शिवाजीराजे दंडवत. दौलतखान व दरिया सारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वराता सुभे मजकुरावरी दिधल्या. त्यास तुम्हीं कांहीं पाठविलें नाहीं म्हणोन कळोन आलें. त्यावरून अजब वाटलें कीं, ऐसे नादान थोडे असतील ! तुम्हांस समजलें कीं याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या (जंजिरा) उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी, पाणी फाटी आदिकरून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील ; आणि तुम्हीं ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल ! एवढी हरामखोरी तुम्हीं कराल ; आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाला, त्यावरी साहेब

---

२७ क्षुद्र, नीच. २८ समजून. २९ कडकशिक्षा केल्यावांचून. ऽ चंद्र बारावा = शु.॥ द्वादशी. + सफर महिना.* म. इ. सा. खंड ८, लेखांक २८.

रिझतील कीं काय ? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय न कळे कीं हबशियांनीं कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील ! त्याकरितां ऐसी बुद्धि केली असेल ! तरी असल्या चाकरास ठीकठीक केले पाहिजेत ! **ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो ?** याउपरी तऱ्ही त्यांला ऐवज गल्ला राजश्री मोरोपंतांनी देविला असेल तो देवितील. तो खजाना रसद पाविलियाहून अधिक जाणून तेणेंप्रमाणें आदा करणें कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. याउपरी बोभाट आलियाउपरी तुमचा मुलाहिजा करणार नाही. गनिमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हांस पावेल. ताकीद असे. रवाना छ. २ *जिल्काद "

—मुलांचा महाराष्ट्र पृ. ८३

## मराठिया लोकांचें बरें करावें

### शिवाजीचें आदिलशहाचे पदरीं असलेल्या मालोजी घोरपड्यांस पत्र

[ पुढील उताऱ्यांत शिवाजी दक्षिणेंतील मुसलमानांशीं कशी वळणें बांधीत होता तें दिसून येईल. मराठ्यांचें हित साधावें, दक्षिणी मुसलमानांशीं सख्य करावें व 'दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें' असा शिवाजीचा मनसुबा होता.]

ऐशियास, दक्षणचे पादशाहीस पठाण जाला, हे गोष्टी बरी नव्हे ! पठाण बळवला म्हणजे एका उपरि एक कुली दक्षिणियांची घरें बुडवील, कोण्हास तगो देणार नाहीं, ऐसें आम्हीं समजोन हजरत कुतुबशाहा पादशहा यांसी पहिलेपासून रुजुवात राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशाहांनीं मेहरवानी करून 'हुजूर भेटीस' येणें म्हणून दस्तखत मुबारक व दस्तपंजियानसी फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशाहाची भेटी घेतली. भेटीचे समई पादशाही आदब[1] आहे कीं शिरभोई

---

* मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ८, लेखांक ३१; (माघ शु।। ३ शके १५९६, १८।१।१६७५.) १ दरबारी पद्धत.

धरावी, तसलीम[२] करावी. परंतु आम्ही आपणावरी छत्र धरिलें असें ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन शिरभोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशाहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशाहांनीं बहुतच इज्जती होऊन, गळ्यास गळा लाऊन भेटले. आम्हास हातीं धरून नेऊन जवळीं बैसविलें. कितीएक मेहेरवानी जाहीर केली आणि कुतुबशहाचा व आपला घटीं बरेपणा करून घेतला. याउपरी राजकारण विषईं हजरत कुतुबशहांनीं महादण्णापंतांस व आम्हांस एकचित करून ऐसा तह केला कीं, जो काय उभयवर्गीं तह द्यावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे कीं, 'आपली पादशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढवणें, पठाणाची नस्तनाबूद करणें; दक्षणची पादशाही आम्हा दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें' म्हणून. त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हातास आलियाउपरि आम्हीं हाच विचार केला कीं जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती ते आपले कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रुजुवात करावी, दौलत देवावी, त्यांचें हातें पादशाही काम घेऊन पादशाहाची पादशाही दराज[३] करावी, आणि तुम्हा लोकांच्या दौलताहि चालेत, घरें राहेत, तें करावें. आपल्या जातीच्या मराठिया लोकांचें बरें करावें हें आपणास उचित आहे ऐसें मनावरी आणून तुमचा आमचा वडिलापासून दावा वाढत आला तो आम्ही मनांतून टाकून, निःकपट होऊन, तुम्ही मराठे लोक, कामाचे, तुमचें बरें करावें ऐसें मनीं धरून, हजरत कुतुबशाहासी बहुत रीती बोलोन, तुम्हांस हजरत कुतुबशाहाचा कौलाचा फर्मान घेऊन पाठविला आहे.

—इतिहासमंजरी पृ. ९८–९९

## शिवाजीसंबंधीं उठणाऱ्या बातम्या

[शिवाजीचा उदय होत असतां समुद्रकिनाऱ्यावर सुरत, मुंबई, कारवार वगैरे ठिकाणीं इंग्रज कंपनीचे व्यापारी असत. ते एकमेकांस जीं पत्रें लिहीत तीं उपलब्ध असून पुढील पांच पत्रें त्यांपैकीं आहेत.]

---

२ लवून सलाम. ३ वाढवावी.

इं. फॅ. ११ } { श. १५८६ आषाढ शु. १३
पृ. ३४५ इ. } { इ. १६६४ जून २६

सुरत–कारवार ( १४ मेच्या पत्रास उत्तर)

विलक्षण धाडसी असा दरवडेखोर म्हणून शिवाजीची इतकी ख्याती झाली आहे कीं, लोकांनीं '**त्याचें शरीर हवामय असून त्याला पंखहि आहेत**' असें उठविलें आहे. एरव्हीं तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं प्रगट होतो ह्या बातम्या शक्य तरी कशा होतात? आज तो एका ठिकाणीं आहे असें खात्रीलायक समजावें, तर एकदोन दिवसांत तो दुसऱ्याच ठिकाणीं आहे असें कळतें. तर लगेच दूर दूर असलेल्या पांचसहा ठिकाणीं एकामागून एक अशा तऱ्हेनें अप्रतिहतपणें लुटालूट व जाळपोळ करतांना तो आढळतो! यामुळें त्याचें नांव सर्वतोमुखी झालें असून त्याला भीमाचें (हर्क्युलिस) सामर्थ्य आहे असें लोक मानतात. सुमारें ६० एक गलबतें (कांहीं नवीं बांधून व सज्ज करून) घेऊन तो ह्या बंदरावर (सुरतेवर) अचानक हल्ला करून इराण व बसरा इकडून परत येणारीं गलबतें लुटणार आहे अशी हूल उठल्यामुळें आमचे तोंडचें पाणी पळालें आहे! कित्येक लोकांच्या मतें शिवाजी एवढी तयारी करून खंबायत नदींतून जाऊन सुरतेप्रमाणेंच अहमदाबादची जाळपोळ व लूट करणार आहे! तो गोव्याला वेढा देईल हें आम्हांला मुळींच संभवनीय वाटत नाहीं. एकादा सक्त वेढा चालवीत बसण्याचें त्याच्या मनांतहि नाहीं. कारण, त्यांत त्याला कांहीं लाभ होणार नाहीं बिनतटबंदीचीं नगरें धावतांपळतांना जाळून लुटावीं; असा अनायासें मिळणारा लाभ त्याला नेहमीं पाहिजे असतो. तुमच्या येथपर्यंत तो येणार नाहीं. कारण पावसाळ्यांत घोडा किंवा मनुष्य यांना तिकडील प्रवास सुखाचा होणार नाहीं; आणि दुसरें असें कीं, विजापूरच्या शहानें त्याच्यावर सैन्य पाठविलें तर त्याला रिकामा वेळ फावणार नाहीं. तथापि आपण सुरक्षित आहों या विश्वासावर विसंबू नका. शिवाजीच्या पाळतीवर असा; आणि वेळ येतांच सुरक्षित ठिकाणीं जातां येईल अशा तयारीनें रहा. हाच आमचा सल्ला आहे. हुबळी हें ठिकाण आम्हांला सुरक्षित वाटतें. तरी कंपनीची सर्व मालमत्ता तिकडे नेण्याची तजवीज करा.

—शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्रमांक ९९६

इं. फॅ. ११ } कारवार-सुरत(२६जूनचे पत्रास उत्तर) } श. १५८६श्रावण व. १२
पृ. ३४७इ. } } इ. १६६४ ऑगस्ट ८

**शिवाजीची इतकी दहशत** बसली आहे, हें वाचून खेद होतो; आणखी कित्येक दिवस ही परिस्थिति अशीच रहाणार! कारण त्याच्यावर पाठविलेले **औरंजेबाचें सैन्य आतां परतलें** असल्यानें त्याला सर्वत्र स्वैरसंचार करावयाला मोकळीक झाली आहे.

--शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्रमांक १००३

फॅ. रे. मुंबई } सुरत–मुंबई } श. १६०२ वैशाख व. ४
भा. १९ पृ. २९ इ. } } इ. १६८० मे ७

शिवाजीच्या मृत्यूबद्दल[1] सर्व बाजूंनीं बातमी येत आहे. तथापि **कित्येकांना अजून संशय** आहेच. एकादा मोठा प्रयत्न करण्याचे पूर्वी अशीच बातमी त्याच्याबद्दल पसरविली जाते. तेव्हां अधिक खात्री होईपर्यंत विश्वास येत नाहीं.

—शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्रमांक २२५८

फॅ. रे. फो. सें. जॉर्ज } सुरत–फो. सें. जॉर्ज } श. १६०२ ज्ये. शु. ३
भा. २८पृ. १००–१०१ इ. } } इ. १६८० मे. २०

शिवाजी मेल्याची विश्वसनीय बातमी आली होती. परंतु आतां ती खोटी आहे असें म्हणत आहेत. **संभाजी राजा**, त्याचा जेष्ठ पुत्र, ह्याच्यावर तो फारच रागावला होता. त्याला **पकडण्यासाठीं ही युक्ती** त्यानें केली आहे असें लोकांना वाटतें

—शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्रमांक २२६०

फॅ. रे. सुरत भा. १०८ } मुंबई–सुरत } श. १६०२ ज्येष्ठ व. १
पृ. ९७ इ. } } इ. १६८० जून ३

शिवाजी मेला हें अगदीं खरें असून **संभाजीला बापाच्या सर्वस्वाच ताबा** मिळाला. तो अद्यापि पन्हाळ्याला आहे.

—शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्रमांक २२६१

---

१ शिवाजीचा मृत्यु ५ एप्रिल १६८० रोजीं झाला होता ही गोष्ट हीं पत्रें वाचतांना लक्षांत ठेवावी.

# टोपीकर वरकड सावकारासारखे नव्हेत

[ हें राजनीतिविषयक प्रकरण कोल्हापूरकर संभाजी राजे यांचे अमात्य रामचंद्रपंत बावडेकर यांनीं लिहिलें होतें. या राजनीतींत अनुभवाच्या व व्यवहाराच्या कसोटीस उतरणारे बरेच नियम दिलेले आहेत व एकंदर प्रकरण चांगलें वाचनीय व विचारणीय आहे. रामचंद्रपंतानें शिवाजी महाराजापासून तीन पिढ्यांपर्यंतच्या राजकीय घडामोडी पाहिल्या होत्या व त्यांत प्रामुख्यानें भागहि घेतला होता. यामुळें राजनीतीचे नियम सांगण्यास तो सर्वतोपरीं अधिकारी होता. याचीं एकंदर नऊ प्रकरणें आहेत; पैकी येथें पांचवें प्रकरण दिलें आहे. ]

साहुकार म्हणजे राज्याची व राजेश्रीची शोभा. साहुकाराच्या योगानें राज्य अवादान होतें. न मिळे त्या वस्तुजात राज्यांत येतात. तें राज्य श्रीमंत होतें. पडलें संकटप्रसंगीं पाहिजे तें कर्जवाम मिळतें. तेणेंकरून आलें संकट परिहार होतें. साहुकाराचे संरक्षणामध्यें बहुत फायदा आहे. याकरितां साहुकाराचा बहुमान चालवावा. कोणेविषयीं त्याजवर जलाल अथवा त्याचा अपमान होऊं न द्यावा. पेठांत दुकानें, वखारा घालवून हत्ती, घोडे, जरमिना, पशमी आदिकरून वस्त्रजात, रत्नें, शस्त्रें आदिकरून अशेष वस्तुजात यांचा उदीम चालवावा. हुजूर बाजारामध्यें हि थोर थोर साहुकार आणून ठेवावे. वर्षसंबंधें तसें च लग्नादि महोत्साही हि त्यांचे त्यांचे योग्यतेनुरूप प्रतिष्ठेनें बोलावून आणून वस्त्रपात्र देऊन समाधान करीत जावें. परमुलखीं जे जे सावकार असतील त्यांचीं समाधानें करून आणावें. त्यास अनुकूल न पडे च तर असतील तेथें च त्यांचें समाधान रक्षून आपली माया लावून त्यांचे मुतालीक आणवून त्यांस अनुकूल जागा दुकानें देऊन ठेवावे. तसें च दर्यावर्दी सावकार यांस हि बंदरोबंदरीं कौल पाठवून आमदरफ्ती करावी. साहुकारामध्यें फिरंगी व इंग्रज व वलंदेज व फराशीस व डिंगमारादि टोपीकर हे हि लोक साहुकारी करितात, परंतु ते वरकड सावकारासारखे नव्हेत. यांचे खावंद प्रत्येक प्रत्येक राज्य च करीत आहेत. त्यांचे हुकुमानें त्यांचे होत्साते हे लोक या प्रांतीं साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थळलोभ नाहीं असें काय घडों पाहतें ?

तथापि टोपीकरास या प्रांतीं प्रवेश करावा, राज्य वाढवावें, स्वमतें प्रतिष्ठावी हा पूर्णाभिमान. तदनुरूप स्थळोस्थळीं कृतकार्य हि जाले आहेत. त्यास ही हट्टी जात; हातास आलें स्थळ मेल्यानें सोडावयाचे नव्हेत. यांची आमदरफ्ती आले गेले इतकी च असू द्यावी. त्यास केवळ नेहमीं जागा कधीं हि देऊं नये. जंजिऱ्यासमीप तों या लोकांचें येणें जाणें सहसा होऊं देऊं नये. कदाचित वखारीस जागा देणें जाली तर खाडीचे मोबारी समुद्रतीरीं न द्यावी. तसें च ठिकाणीं जागा दिल्यानें जोंपर्यंत आपले मर्यादेनें आहेत तों आहेत. नाहीं ते समयीं आरमार, तोफा, दारूगोळी हेंच त्यांचें बळ. आरमार पाठीशीं देऊन त्याचे बळें त्या बंदरीं नूतन किल्ला च निर्माण करणार. तेव्हां इतकें स्थळ राज्यांतून गेलें. याकरितां जागा देणें च तर लांब खाडी गांव दोन गांवें राजापुरी सारखी असेल तेथें फराशिसास जागा दिल्हा होता त्या न्यायें दोन च्यार नामांकित थोर शहरें असतील त्यामध्यें जागा द्यावा. तो असा कीं तीच जागा शहराचे अहारीं, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारा घालाव्या. त्यास इमारतीचें घर बांधूं देऊं नये. याप्रकारें राहिले तर बरें. नाहीं तर याविणें प्रयोजन नाहीं. आले गेले असून त्यांचे वाटे आपण न जावें; आपले वाटे त्यांणीं न जावें इतकें च पुरे. गनीमाचे मुलखांतील—गनीमाचा मुलूख मारिले यामुळें अथवा दर्यावर्दीमुळें—साहुकार सापडले तर अवसर पाहून त्यांशीं खंड करावा. खंडाचा वसूल घेणें तो हि त्यास राखून घ्यावा. खंड फारीक जाल्यावर थोडी बहुत त्यांशी मेहेमानी करून बहुमानें त्यास त्यांचें स्थळास पाववून द्यावें. गनीमाकडील सेवक लोकांस जें शासन आहे तें सावकार लोकांस उचित नाहीं.

—इतिहासमंजरी पृ. १३९–१४१

## ‘रयतांनीं झाडें लेंकरासारखीं वाढविलीं’

“आरमारास तक्ते, सोंट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लांकडें असावीं लागतात. आपले राज्यांत अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत

त्यांचें जें अनुकूल पडेल ते हुजूरचे परवानगीनें तोडून न्यावें. याविरहित जें लागेल तें परमुलुखींहून खरेदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे, फणस आदिकरून हेही लांकडें आरमाराच्या प्रयोजनाचीं; परंतु त्यांस हात लावूं देऊं नये. काय म्हणोन कीं, हीं झाडें वर्षा दोन वर्षांनीं होतात असें नाहीं. रयतांनीं हीं झाडें लावून लेंकरांसारखीं बहुत काळ जतन करून वाढविलीं. तीं झाडें तोडिल्यावर त्यांचे दुःखास पारावार काय ? एकास दुःख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारास हित स्वल्प काळचें बुडोन नाहींसेंच होतें, किंबहुना धनियाचे पदरीं प्रजापीडनाचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभावें हानिही होत्ये. याकरितां हे गोष्टी सर्वथैव होऊं न द्यावी. कदाचित् एखादें जें झाड बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असलें तरी त्याचे धन्यास राजी करून घेऊन द्रव्य देऊन त्याचे संतोषें तोडून न्यावें. बलात्कार सर्वथैव न करावा. "

—अमात्यकृत राजनीति

## शिंदे होळकरांचा पराक्रम

### बाळाजी बाजीरावाचें जयाजी शिंदे यांस पत्र

श्री. १६७३ ज्येष्ठ शु. ९

तुम्हीं जयनगराहून निघालियावर एक पत्र आलें. त्या आलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तुमची व नबाब[१] वजीर यांची भेटी जाली, यमुना पार होऊन कादरगंजाजवळ दहा हजार पठाण सरदारसुद्धा बुडविला; तेंहि वर्तमान परभारेंच येऊन पोहोंचलें. तदोत्तर अहमदखा पठाण बंगस प्रयागास म्हासरा[२] करून होता तो उठवून फरोखाबादेस येऊन लढाईस नमूद जाहाला. त्याची तुमची लढाई सुरू जाहली. अहमदखा बंगशांनीं फरोकाबाद गंगातीरास बेहडा[३] अडचण जागा पाहून आराबा[४] रचून त्याची तुमची

१ अयोध्येचा नबाब सफदरजंग. २ आसरा (?). ३ नाल्याच्या प्रवाहामुळें झालेली खोल भेग. ४ तोफखाना.

नित्य लढाई होऊ लागली. तथापि वर्तमान लिहिलें नाहीं. याजवरून अपूर्वता, आश्चर्य वाटलें. प्रस्तुत राजेश्री दामोदर[५] महादेव यांचें पत्र छ७ जमा दिलावरचें छ ५ रजबीं येऊन पावलें कीं "अहमदखा बंगस बहादूरखा रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा बारा हजार स्वारप्यादे यांशी कुमकेस आणिलें. सरदाराची[६] फौज व जाटाची[७] फौज व नबाब वजीराची फौज गंगापार होऊन छ ३ जमादिलाखरीं लढाई जाली. बहादुरखा रोहिला बुडविला. हजारों घोडीं घेतलीं. हत्ती पाडाव[८] केले. हें वर्तमान बंगसांनीं ऐकून घाबरा जाला. दुसरे दिवशीं पळून गंगापार गेला. लष्कराच्या लोकांनीं घोडीं पाडाव आणलीं तोफखाना पाडाव केला." म्हणोन लिहिलें. तें श्रवण होऊन संतोषाच्या[९] कोटी जाहल्या. शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी रूस्तुमीची[१०] ! व शाबास लोकांची. आमच्या दक्षिणच्या फौजांनी यमुना गंगापार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हें कर्म लहान सामान्य न जालें ! तुम्ही एकनिष्ट, कृतकर्मे सेवक; या दौलतीचे स्तंब आहां ! जे चित्तावर धरितां ते घडून येतात. पहिलीं यशावह कर्मे संपादिलीत ततोभ्यधिक हें यश संपादिलेंत. या यशास जोडाच नाहीं. परंतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत नाहीं ऐसें नसावें. सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहित जाणें. तेणें करून संतोष होत जाईल. मोठा मनसबा कठिण होता. नाना प्रकारचीं येथें वर्तमानें उठतात. तुमचें पत्र तों येत नाहीं. याजमुळें चित्त चिंतेंत होते. इराण, तुराण, पावेतों लौकिक जाला कीं वजीर मोडला, पळाला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर[११] बसविला, याजहून यश कोणतें अधिक आहे ? या उपरि तेथील रंग भरून, स्वकार्य साधून, आपले मुलुखांत येणें योग्य आहे[१२]. छ ७ रजब बहुत काय लिहिणें. लेखनसीमा.

[का. इ. सं. पत्रें ले. १६२ ]

—इतिहासमंजरी पृ. २३९–२४१

५ हिंगणें. ६ शिंदेहोळकरांची. ७ सुरजमल जाट. ८ धरलें. ९ अतिआनंद. १० धरिष्टाची व पराक्रमाची. ११ सफदरजंगास पठाण लोकांनीं पदच्युत केलें होतें त्यास पुनः वजीरी दिली. १२ काव्येतिहाससंग्रहकार या पत्रासंबंधीं म्हणतात "हें पत्र वाचून हल्लीच्या हतवीर्य लोकांसहि क्षणभर स्फुरण येईल. तेव्हां ज्यांनीं असे पराक्रम केले त्या लोकांस हा स्वामिगौरव अमृताहून गोड लागून शरीर दुणावलें असेल."

# गोविंदराव काळे यांचें पत्र

[ गोविंदराव काळे हा सवाई माधवरावाचे पेशवाईंत निजामाचे दरबारीं पेशव्यांचा वकील होता. त्याला महादजीच्या पराक्रमाचें वर्णन कळल्यावर पेशवाईच्या वाढत्या वैभवाचें त्यानें पुढीलप्रमाणें अंतःकरणपूर्वक वर्णन केलें आहे. पत्रांत लिहिल्याप्रमाणें या वैभवास लवकरच दृष्ट लागावी असा योग होता ! ]

त्या दिवसांत कैलासवासी शिवाजीमहाराज **शककर्ते** व **धर्मराखते** निघाले. त्यांनीं किंचित् कोन्यांत धर्मसंरक्षण केलें. पुढ कैलासवासी नानासाहेब, भाऊसाहेब **प्रचंड प्रतापसूर्य** असे जाले कीं, असें कधीं झालें नाहीं. अमुक ब्राह्मणांनीं राज्य केलें असें शास्त्रीं पुराणीं वर्णन नाहीं. परशुराम–अवतारीं काय असेल तें असो. त्या गोष्टी यांस शिंदे होळकर दोन बाजू होऊन प्राप्त जाल्या. हल्लीं श्रीमंतांचे पुण्य-प्रतापेंकडून व राजश्री पाटीलबावांचे बुद्धि व तरवारेच्या पराक्रमेंकडून सर्व घरास आलें. परंतु जालें कसें ? प्राप्त जालें तेणेंकडून सुलभता वाटली. अगर मुसलमान कोणी असे, तरी मोठे मोठे तवारीखनामे [१] जाले असते. यवनाच्या जातींत तिळाइतकी चांगली गोष्ट जाल्यास गगनाबराबर करून शोभवावी; आमचे हिंदूंत गगनाइतकी जाली असतां उच्चार न करावा हे चाल आहे. असो. अलभ्य गोष्टी घडल्या. उग्याच दौलती पुसत घरास आल्या. यांचें संरक्षण करणें परम कठिण ! दोस्त दुष्मन फार. यवनांचे मनांत कीं [२]काफरशाही जाली हें बोलतात.

लेकीन[३] ज्यांनीं हिंदुस्थानांत शिरें उचललीं, त्यांचीं शिरें पाटीलबावांनीं फोडिलीं. कोणाच्याही मनांत हे वहाडले, तें शेवटास जाऊं नये. यास्तव, नाना स्वरूपें व युक्तींकडून नाश करावे ऐसे आहेत. न लाभाव्या त्या गोष्टी लाभल्या. त्यांचा बंदाबस्त शककर्त्याप्रमाणें होऊन उपभोग घ्यावे हें पुढेंच आहे. कोठें पुण्याईत उणें पडेल आणि काय **दृष्ट लागेल** न कळे. झाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्य प्राप्त, इतकेंच नाहीं, तरी **वेद-**

---

१ बखरी. २ लबाड लोकांची बादशाही. ३ परंतु.

शास्त्ररक्षण, धर्मसंस्थापन, गोब्राह्मणप्रतिपालन, सार्वभौमत्व, हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे नगारे वाजणें, इतक्या गोष्टी आहेत. हे [४]किमया संभाळणें हक्क आपला व पाटीलबावांचा ! यांत वेत्यास पडला कीं, दोस्त दुष्मन मजबूद. **संशय दूर जाले, हें अति चांगलें ! अति चांगलें !** याउपरी हे जमाव व या फौजा लाहोरच्या मेदानांत असाव्या. त्यांचे मनसबे दौडावे, वेत्यास पडावे, तमाशे पहावे, असें जन जे आहेत ते उशापायथ्यास लागून आहेत. चैन नव्हते. आतां आपण लिहिल्यावरून स्वस्थ जालें. जितकें लिहिलें इतक्याचें उगेच मनन व्हावें. खरें कीं लटकें हें समजावें. रवाना छ ११ जिल्काद हे विनंती[५]" (आषाढ शु।। १३ शके १७१४, २।७।१७९२).

—मुलांचा महाराष्ट्र पृ. ४९६–४९७

४ अद्भुत कृति. ५ इतिहाससंग्रह, ऐतिहासिक टिपणें भाग १, टिपण १३.

परिशिष्ट १ लें

# वंशावळी

## (१) छत्रपति भोसले वंश




खुणांचें स्पष्टीकरण
= लग्न
ज. – जन्म
मृ. – मृत्यु
द. – दत्तक

इतर आकडे कारकीर्दीचे सन दर्शवितात.

## (२) पेशवे


भट्टवंश
बाळाजी विश्वनाथ
(१७१३–२०)
बाजीराव
(१७२०–४०)
चिमाजीआप्पा
सदाशिवरावभाऊ
मृ. १७६१
रघुनाथराव
बाळाजी बाजीराव
ऊर्फ नानासाहेब
(१७४०–६१)
बाजीराव दुसरा
१७९५–१८१८
चिमाजी
आप्पा
अमृतराव
(दत्तक)
विश्वासराव
मृ. १७६१
माधवराव
१७६१–७२
नारायणराव
१७७२–७३
सवाई माधवराव
१७७४–९५

## (३) शिंदे




## (४) नागपूरकर भोसले

१ परसोजी

२ कान्होजी

३ रघोजी
(मृ. १७५३)

४ जानोजी
(मृ. १७७३)

५ मुधाजी
(मृ. १७८८)

६ रघोजी
(मृ. १८१६)

७ मुधाजी ऊर्फ आप्पासाहेब

## (५) होळकर

मल्हारराव होळकर (मृ. १७६६)
|
खंडेराव (मृ. १७५४) = अहल्याबाई (१७६६–९५)
तुकोजी (१७९५–९७)
|
यशवंतराव (१७९७–१८११)

## (६) गायकवाड

दमाजी (मृ. १७२०)
|
पिलाजी १७२०–३२
|
दमाजी १७३२–६८
|
गोविंदराव १७९२–१८०० | सयाजीराव १७६८–९२

गोविंदराव यांचे पुत्र:
आनंदराव १८००–१९ | सयाजीराव १८१९–४७

# परिशिष्ट २ रें

## सनावळी

१०६– १३० गौतमीपुत्र शालिवाहन. आंध्र
१३०– १५८ पुलुमायी शालिवाहन. आंध्र
६०८– ६४२ पुलकेशी दुसरा. चालुक्य
७५३– ९७३ राष्ट्रकूट
९७३–११९० दुसरे चालुक्य
११८७–१३१८ देवगिरीचे यादव
१२९० ज्ञानेश्वरीची रचना
१२९४ अल्लाउद्दिनाची देवगिरीवर स्वारी
१३०७,१३०९ मलिक काफूरच्या स्वाऱ्या
१३३६ विजयनगरची स्थापना
१३४६ बहामनी राज्याची स्थापना
१४८१ महमद गवानचा मृत्यु
१५०९–१५३० कृष्णदेवराय
१५६५ राक्षस तंगडीची लढाई
१५९४ शहाजीचा जन्म
१६०७ मालोजीचा मृत्यु
१६२७ मलिकंबरचा मृत्यु
१६२९ लखुजी जाधवाचा खून
१६३० शिवाजीचा जन्म
१६३६ निजामशाहीचा शेवट
१६४३ शिवाजीच्या राजमुद्रेचा उपयोग
१६४७ दादोजी कोंडदेवचा मृत्यु
१६५९ अफझलखानाचा वध
१६६२ आदिलशहाशीं तह
१६६३ शाइस्तेखानावर हल्ला
१६६६ आग्ऱ्याहून सुटका
१६७० सिंहगड सर, तानाजीचा मृत्यु
१६७२ साल्हेरचें युद्ध
१६७० राज्याभिषेक
१६७७ कर्नाटकांत स्वारी
१६७९ विजापूरकरांस साह्य
१६८० शिवाजीचा मृत्यु
१६८१ समर्थांचें प्रयाण
१६८९ संभाजीचा मृत्यु
१६९० रायगड सर झाला

१६९८ जिंजी काबीज
१७०० राजारामाचा मृत्यु
१७०७ औरंगजेबाचा मृत्यु
१७०८ शाहू छत्रपति झाला
१७१३ बाळाजीस पेशवाईची प्राप्ति
१७१९ फर्रुखसियरचा खून
१७२० बाळाजीचा मृत्यु
१७२४ हैद्राबाद येथें निजामशाहीची स्थापना
१७२९ डभईची लढाई
१७३१ छत्रसालचा मृत्यु
१७३९ नादिरशहाची स्वारी
१७४० बाजीरावाचा मृत्यु
१७४५ राणोजीचा मृत्यु
१७४९ शाहूचा मृत्यु
१७५८ भगवा झेंडा अटकेवर फडकतो
१७६० उद्गीरची लढाई
१७६० हैदरचा उदय
१७६१ पानिपतची लढाई
१७६३ राक्षसभुवनची लढाई
१७६६ मल्हाररावाचा मृत्यु
१७७२ माधवरावाचा मृत्यु
१७७३ नारायणरावाचा खून
१७७५ सवाई माधवरावाचा जन्म
१७७९ वडगांवास इंग्रजांचा पराभव
१७८२ हैदरचा मृत्यु
१७८२ सालबाईचा तह
१७९० महादजीचें बादशाहीवर वर्चस्व
१७९२ श्रीरंगपट्टणावरील त्रिवर्गाची मोहीम
१७९४ महादजीचा मृत्यु
१७९४ हरिपंत फडके यांचा मृत्यु
१७९५ खडर्याची लढाई
१७९५ अहल्याबाई होळकरचा मृत्यु
१७९५ सवाई माधवरावाचा मृत्यु
१८०० नाना फडणविसाचा मृत्यु
१८०२ वसईचा तह
१८०३ असई, लासवारी, अडगांव या लढाया
१८०३ सुर्जी अंजनगांवचा तह
१८०५ भरतपूरचा वेढा
१८१७ पेशवाईचा शेवट
१८१८ अष्टे येथील लढाई
१८१८ बापू गोखले याचा मृत्यु
१८३९ प्रतापसिंह पदच्युत
१८४८ शहाजीचा मृत्यु
१८५१ बाजीरावाचा मृत्यु
१८५८ राणी लक्ष्मीबाईचा मृत्यु